प्रकाशक–

श्री. ष. ब्र. बसवलिंगस्वामी देशिकेंद्र
मठ संस्थान डोणगाव, उदगीर



लेखक व मुद्रक–
श्री. पुराणरत्न– बसवलिंग शास्त्री
श्री नटराज मुद्रणालय
भालपुर ( हणेगाव )

सर्व हक्क लेखकाचे स्वाधीन

प्रथमावृत्ति प्रति– १०००

किंमत १० रुपये

सूचना– चौथ्या अध्यायाचे शेवटी एकोत्तर शत स्थलांत इष्ट प्राणाच्या जागी भावलिंग वाचावें इष्टप्राण भाव शेवटी. आणीक सातव्या अध्यायांत पान ११५ हे डावीकडे उलटून वाचावे तसेच उकार रफार नसेल तर शुद्ध वाचावे हे विनंती.

– कांडाचे नियम –

प्रथम अध्याय– ३, ५, ९ शेवटी ११ वाला ५ कांड शक्यनुसार जंगमार्चन करावे.

॥ ॐ ॥

## श्रीगुरु हावगीलिंग स्वामी यांची आरती

जय जय गुरु हावगिलिंग देव मंगलांगा । शिव आज्ञा घेऊनी । स्कंद गणप वीरानी । रंभापुरी सोमनाथ । लिंगोद्भव जाहले । केलं पावन जग योगी भले ॥१॥
रंभापुरी निज प्रांत । संचारुनि अविश्रांत । उद्धरिले शरणागत । करुनि शिवदीक्षा । शिक्षा । देती निजमोक्षा ॥२॥
निडुमामिडि सुस्थळात । यति करिबसवेश राहत । नागलिंग मानुरांत । ब्रम्हराक्षसा प्रति । शिक्षिति । शिव सुखात राहती ॥३॥
दक्षिण देशाप्रति । येती विरूपाक्ष यति । द्रोणापुरी उत्तरेस । भक्तमुडि वनवासी । निराशी । योगी सुविलासी ॥४॥
एरंडळ पुरवरेंद्र । चन्नमल्ल देशिकेंद्र । विरुपाक्ष, शिवगणेंद्र । गुरुवरासी पाहिला । ध्यायिला । शिव सुखासी पावला ॥५॥
एरंडळ निज ग्रामी । भिक्षाटण करि स्वामी । येति भक्त सदनासी । पति वियोगे कष्टली । तुष्टली । गुरु भिक्षा वाढिली ॥६॥
अष्टपुत्र सौभाग्य । माये तू पावसी गे । ऐकोनि गुरु अमृत वचन । हंसमुख सति बोले । नेले सौभाग्या काळे ॥७॥
गुरु अंतर्गृंहि येऊनि । धड्ढारे ऊठ म्हणूनी । पादोदक मुखी घालुनि । सौभाग्या रक्षिले । धावले । सतिपति, पदि लागले ॥८॥
भाळपुरिचा म्हाळप्पय्या । तोहि प्राणशिष्य तया । नित्य भालपुराहुनी । येत गुरु दर्शना । भाषणा । अघ भव भय नाशना ॥९॥
चन्नमल्ल म्हणती मनी । आता नको वासजनी । पादुकास विसर्जुनी । गुरु निजपद पावले । जाहले । जगी हावगिलिंग भले ॥१०॥
योगी गुरु विरुपाक्ष । त्यागि म्हाळप्पय्या शिष्य । वार्ता ऐकूनी विशेष । धरि म्हणे गुरु पाया । व्हावया । लिंगैक्या या समय. ॥११॥
रुंडेहाळि हावगिलिंग । द्रोणापुरी गुरुलिंग । म्हाळप्पय्या भक्तमुडींत । स्थिर गुरुपदि राहिला । गायिला । बसवलिंग आरतिला ।
जय जय गुरु हावगिलिंग देव मंगलांगा ॥१२॥

**आरति–** आरती निजपद सुख संगा गुणातीत गुरु हावगिलिंगा । आदि मठ द्रोणापूर धामा । पट्टाधीश स्वामी सुगुण प्रेमा । सदाचार क्रिया स्वधर्मा । लिंग पूजीयल्ली नित्य नेम ॥धृ०॥
सदा ज्ञान भक्ती वैराग्य । महात्म रोळगे नी योग्य । विपुल सौभाग्य भक्त जन हृदद अंतरंगा, गुणातीत ॥१॥
सकल पुराण शास्त्र नोडी । नीगमआगमके कोंडाडी । भक्त जन रुद्धारव माडी । अहर्निश संचारव माडी ।
अन्न छत्रवु नडिवुदु सदा । लिंग गुरुपदा । जंगम रोळग भेद । माडुवे भक्ति मार्गा, गुणातीत गुरु ॥२॥
देश ग्राम पट्टणव तिरगी । भक्त जन उद्धर शिवयोगी । लिंग जंगमके प्राण वागो । गुरुपद शाश्वत सुख भोगी ।
चालः– धरियोळु उदगीरी वाशा । पट्टाधीश कर्तु जगदीश । हावगीलिंगेश निजपदा वास वेडूवे निज सुख सत्संगा । गुणातीत गुरु हावगिलिंगा ॥३॥

— गणपतिअप्पा कावळगांवकर

॥ आर्या ॥ जाउनिया कैलासी पार्वति पतिसी नमूनि अजतनय। उद्धरिजे मर्त्यांसी प्रार्थुनि बोले प्रभूसि तो विनये ॥१॥ श्रीगुरुदेवा सच्चिदानंदा। श्रीगुरुदेवा, आनंदकंदा ॥ श्रीगुरुदेव, मुनिजन वृंदा। सदा सर्वदा वंद्य जो ॥२॥ ॐ नमोजी गुरुवर्या। ॐ नमो जी भव-भया। हरुनी शरणांगता स्वकीया। निजरुपी मेळविसी ॥३॥ ॐ नमोजी दीक्षागुरु। ॐ नमोजी शिक्षागुरू। ॐ नमोजी मोक्षागुरू भवसागरी तारु तूच की ॥४॥ मोक्षरूपी अक्षय धन। देता न विचारिसी थोर सान। ऐसा दाता आहे कवण। समान सर्व भूतासी ॥५॥ पात्र पाहुनि दान द्यावे। ऐसे म्हणती आघवे। परी भेदाभेद स्वभावे। नाही ठावे तुजलागी ॥६॥ जैसे गंगाजळ पवित्र वाहे। न्हावे धुवावे प्यावे। नाही नको म्हणावे। कवण कवणा ॥७॥ तैसा तू ज्ञान गंगेचा झरा। वाहत आहेसी सैरावैरा। अज्ञान अंधासी तुझा थारा। न गमेचि कालत्रयी ॥८॥ धन्य धन्य गुरु माउली। तुझिया कृपेची साउली। जया प्राण्यासी न भेटली। तो एक जाण दुर्दैवी ॥९॥ शिष्य दीक्षादि कारण। आलासी मर्त्यलोका जाण। पंचमुखे दशभुज त्यजोन। एक मुख द्विभुजाने ॥१०॥ जय जयाजी हावगिलिंगा। जय जयाजी भव भय भंगा। जय जयाजी करुणांतरंगा। लिंगा अंगा समरसी ॥११॥ जय जयाजी सद्गुरू। जय जयाजी निःसंसारू। शरणांगत उद्धारू। पावन चरित्र हावगिलिंगा ॥१२ मी पामर अतीत। तव द्वारी राहिलो तिष्ठत। तुज एक भिक्षा मागत। आहे ओरडत दिवस भरी ॥१३॥ तरी कां नये दीनाची कींव। महादाता म्हणती सर्व। मज विषईच दातृभाव। पालटला का गुरुवर्या ॥१४॥ नगुरोरधिक नगुरोरधिक। वेदशास्त्रे बोलती निशंक। मोक्ष साम्राज्य देण्या उच्छुक। शरणांगता तत्काळ ॥१५॥ तरी कां मजसी अबोला। सद्गुरुराया तुम्हीं धरिला। भिऊ नका भिऊ नका आला। बसवलिंग म्हणोनी ॥१६॥ तुमच्या उच्छिष्टाचा वारसदार। तुमच्या पदधुळींत लोळणार। शिरी पादुका वाहणार। डांगोरा देणार कीर्तिचा ॥१७॥ तुमचाच आहे चाकर। नको मज धनधान्य परिकर। परी एक मात्र मागणार। ऐका साचार गुरुदेवा ॥१८॥ डोळा भरो तुझी मूर्ति। जिव्हेने गाईन तुझी कीर्ति। करकमळीं पूजोन चरणा प्रति। एवढी आरती पूर्ण करा ॥१९॥ जया म्हणती सकळ निष्कळ। द्विविध रूपासी तूचि मूळ। म्हणुनिया सकळ निष्कळ। तूचि जाण आदि लिंगा ॥२०॥ जयाची पीठिका पृथ्वी। जल धरचि कलश पाही। आकाशचि मूर्ध्नि तेवी। नक्षत्रे जाणा पुष्पमाला ॥२१॥ कुसुमे झाली ग्रहगण। रवि शशि वन्हि ज्याचे नयन। सप्त समुद्रें कुक्षि जाण। भुजा महान् गिरि शिखरे ॥२२॥ सप्त पाताळेचि पदकमले। वेदचि जयाचे वक्त्र झाले। षटशास्त्रें षडंग भले। दशदिशा तें वसनपै ॥२३॥ ऐसा तू अनादि दिव्य लिंग। तूंचि करकमळीचा इष्टलिंग। अंतरंगी

झालासी प्राणलिंग । तूचि भावलिंग भाव गम्य ॥२४॥ तूचि आचार गुरुलिंग । शिवलिंग आणि चरलिंग । प्रसादलिंग महालिंग । षडविध-लिंग तूचिगा ॥२५॥ तूचि त्रिविध, षड्विध । मिळूनिया नवविध । भक्तांच्या सर्वांगी विशद । होऊनिया राहिलासी ॥२६॥ सर्वांतर्यामी ज्योतिर्लिंगा । इष्टार्थदाता इष्टलिंगा । सुमति देई भवभंगा । शिवयोगी चरित्र वर्णावया ॥२७॥ आता नमू जंगमलिंग । अतिथि रूपे करी भवभंग । संचरोनिया भूभाग । म्हणवीतसे चरमूर्ति ॥२८॥ सहज मागोनिया भिक्षा । सद्भक्ता देसीं मोक्षा । अनपेक्षित कर्तव्यदक्षा । शिक्षा दीक्षा कर्तृ जो ॥२९॥ शिवयोगीनामे प्रसिद्ध । शिवचि जगीं प्रकटोनी विशुद्ध । भक्तिभिक्षा मागोनि अविरोध । उद्धरित शरणां-गता ॥३०॥ ऐसा तू गुरु लिंग जंगम । त्रिविध रूपे एकचि जाण । जैसे त्रिवेणी संगम । पवित्रपावन अभेद ॥३१॥ ऐसीया त्रिमूर्तीसी । साष्टांग प्रणिपात सद्भावेसी । करुनिया ग्रंथारंभासी । उद्युक्त होईन तुमच्या कृपे ॥३२॥ सप्त सागर पर्यंत । तीर्थ स्नाने जे फल प्राप्त । गुर्वंघ्रि जलबिंदु प्रत । सहस्रांशा समत्व न पावतीं ॥३३॥ गुरु जंगम पादतीर्थ । लिंग मज्जन करूनि सद्भक्त । सप्रेम भावे स्वीकारीत । तरि तो सद्योन्मुक्त जाणावा ॥३४॥ ऐसीया श्रेष्ठ पादोदकासी । करोनि सहस्र प्रणामासी । सेवोनि सद्योन्मुक्तोंसी । वरिलो म्हणणे आश्चर्य ॥३५॥ त्रिविध प्रसाद पावन । त्रिविध प्रसाद जीवन । प्रसाद हेचि कारण । मोक्ष साम्राज्य साधण्या ॥३६॥ शुद्ध असे गुरु प्रसाद । सिद्ध जाणा लिंगप्रसाद । प्रसिद्ध पहा हो जंगम प्रसाद । मुक्ति लागी देण्यासी ॥३७॥ ऐसे हे त्रिविध प्रसाद । जाणोनिया उत्तरोत्तर भेद । सेविती शिवभक्त निर्विवाद । जीवन्मुक्त जाणावे ॥३८॥ तिलषोडश भागासम । तृणाग्रांबु कणोपम । पादोदक प्रसाद सप्रेम । सेविता मोक्षचि निश्चये ॥३९॥ ऐसिया पादोदक प्रसादासी । शरणांगत अनन्य भावेसी । सेवोनिया निश्चयेसी । बसवलिंग झाला कृतार्थ ॥४०॥ सकल कर्मासीं करी दहन । विधि दुर्लिखित निवारण । भस्म हे त्रिलोक पावन । स्वयं ज्योति स्वरूप ॥४१॥ पादोदकाने भरला । शिव मंत्रे श्रृंगारिला । ऐसिया भस्माचा त्रिपुंड्र लाविला । तो जाणा मुकला जन्ममरणा ॥४२॥ नमोनिया ऐशा भस्मासीं । धारण करोनि अहर्निशी । पावनपावन निश्चयेसीं । झालो संशय किमर्थ ॥४३॥ श्री रुद्राचे अक्ष । म्हणोनिया तया नाम रुद्राक्ष । धारण करी जो मुमुक्ष । करतळी मोक्ष तयाच्या ॥४४॥ आता नमू मंत्रराज । षडक्षर पंचाक्षर सतेज । जे गुरुमुखे प्राप्त निजबीज । जपता सहज मंत्रमूर्ति ॥४५॥ सप्त कोटी मंत्रामाजी । पंचाक्षरचि श्रेष्ठ जाणाजी । जपता मोक्ष साम्राज्यी । अक्षय वसेजी सद्भक्त ॥४६॥ ऐसे हे अष्टावरण । मज झाले श्रेष्ठ आभरण । मी मुक्तांगना परम पावन । शिवशरणांच्या सद्वंशी ॥४७॥ नमितो तुजला महेश्वरा । अर्ध नारी नटेश्वरा । जगदादि बीजांकुरा । शिवशक्ति स्वरूपा ॥४८॥ जो असे शिवगणांचा पति । म्हणोनी तयाचे नाम गणपति । अंगुष्ठ गणपति पाताळ कंद[illegible] । ऐसीया

गणपतीसी नमो नमो ॥४९॥ माझिया आर्ष काव्यासी । निर्विघ्ने पार न्यावयासी । सविनये प्रार्थितो आपणासी । अविघ्नमस्तु गणपते ॥५०॥ जगदंबा म्हणे बाळा तुजसी । विवाह करू सुंदर स्त्रीसी । स्त्रियां कैसे असती म्हणे मातेसीं । बाळा मज सारिखे असती रे ॥५१॥ स्त्रियां जव तुज सम असती । तरि त्या माताचिगे मज प्रती । म्हणोनि निघे विरक्त स्थिति । क्रौंच दरींत रिघाला ॥५२॥ ऐसिया विरक्त षण्मुख देवा । नमुनीं मागतो अभय द्यावा । मंदमतीसी ज्ञानामृत पाजवा । श्री गुरु चरित्र वर्णावया ॥५३॥ जो दक्षाध्वर विनाशक । भूतावळी घेऊनि आला निर्भीक । यज्ञमंटपीं रिघोनि निःशंक । दक्षाचा शिरच्छेदिला ॥५४॥ तव येती भर्गो देव । आक्रंदोनि प्रसूति धरि पाय । निवारण कराजी वैधव्य । कामांतका त्रिपुरारे ॥५५॥ वीरासी म्हणे भोळा चक्रवर्ति । देई देई शिराप्रति । केव्हांचि रगडिलो पायातळी निश्चिति । निंदकाचे कृष्णमुख ॥५६॥ ऐशा निर्भीड वीरभद्रा । भद्र काळीवरा, करुणा समुद्रा । अभय द्याजी अघोरभद्रा । प्रळयरुद्रा कथेसीं ॥५७॥ नित्य येवोनि सभांगणा । हास्य विनोद करितो नाना । त्रिचरणे करितसे नर्तना । त्रिपुरारिसी नमीतसे ॥५८॥ अंबेसी करीना नमस्कार । जगदंबेसीं आला राग फार । कैसाहो हा निर्बुद्ध पोर । लाडका फार तुमचा हा ॥५९॥ मज न साहे हे उर्मटपण । केला वाटते जन्माचा पण । माझे मज देई अस्थि सोडून । मेदमांस मज्जादि ॥६०॥ मांस त्वचा सिरा काढिला । तात्काळ देवीकडे फेंकिला । हाडांचा सांपळा अधिकचि नटला । हास्य विनोदे नाचतसे ॥६१॥ गारचि झाली त्रिभुवन सुंदरी । ऐसा निर्माय भृंगी परोपरी । कथेसीं स्फूर्ति देई झडकरीं । म्हणोनिया विनवितो ॥६२॥ आता नमू आनंद कंद । द्वितीय शंभु लिंगानंद । जो वाहन झाला नित्यानंद । शंभु-लिंगा कारणे ॥६३॥ ऐसा जो शिव वाहन नंदीश । कलियुगी अवतरोनि सर्वेश । शिवधर्म स्थापिला निर्दोष । महिमा विशेष न वर्णवे ॥६४॥ शिवधर्म स्थापना कारणे । मर्त्य लोकासीं झाले येणे । कल्याणामाजी राहोन । जगत्कल्याण साधिले ॥६५॥ तया द्वितीय शंभु संगन बसवासी । साष्टांगे प्रणिपात सहृदयेसीं । अभय द्यावे अण्णा मत्कृतीसी । विजयी होवो म्हणोनी ॥६६॥ गुरु संगमाच्या लडिवाळ बाळा । गंगांबा हृदय कमळ परिमळा । भक्ति भंडारी जंगमलोला । अगाध लीला न वर्णवे ॥६७॥ आता नमूं प्रभुलिंग जंगम । तव लीला असे अगम्य । श्रींच्या कृतीसी सुगम । शैली मजसीं दान द्या ॥६८॥ षटस्थल सारा । षटस्थल धीरा । षटस्थल वीरा षटस्थल पूरा । नागमांबा किशोरचंद्रा । चन्नबसवा तुज नमो ॥६९॥ वीरमडिवाळ माचिदेवा । सिद्धराम अमित वैभवा । किन्नरि ब्रम्हय्या आय-दक्कि मारय्या । शिवलिंगैय्या अजगण्णा ॥७०॥ मुदनूर दासिमय्या । नुलकी चंदय्या डोहर कक्कैय्या । चर्मकार हरळैय्या । मादर चन्नय्या तुज नमो ॥७१॥ पुत्र दानी शिरियाळा । सति दानी सिंधुबल्लाळा । लिंग प्राणी अवलीळा । चिक्कलिंग देवय्या ॥७२॥ ऐसे जे का अनंत

शरण । दीनासी होवोनि प्रसन्न । गुरु लीलेसी अभयदान । वारंवार मागतो ॥७३॥ चांगुणा नेल्लूरु निबव्वा । धिरडे दासोही पिट्टव्वा । सूत कातणारी रेम्मव्वा । मत्कृतीसीं अभय द्या ॥७४॥ वीर विरागिणीं अक्क महादेवी । तुमचिया वैराग्या पार नाहीं । धिःकारोनि वैभव सर्वही । बाल विरागी दिगंबरी ॥७५॥ बसवराज अर्धांगी । नीलांबा प्राण लिंगसंगी । माझिया काव्य व्यासंगी । नमितो सुमति प्रदाना ॥७६॥ कलबुर्गी शरण बसवेशा । बावगीच्या भद्रेशा । अंकलगीच्या अडवेशा । मम काव्यासी अभय द्या ॥७७॥ मुचकुंदपुर वरकवि मडिवाळ । बोरळ बसवेशाचा लडिवाळ । महांतम्माचा हृदय कमळ । वासरमणी झालाजो ॥७८॥ बोरळ बसवेशा आराधना करोनि । प्रसन्न केले सतिपतींनी । सत्यवती महंतम्मा लागोनी । पुत्र रूपे अवतरले ॥७९॥ तेचि बसवावतारी बसवलिंगस्वामी । मुचकुंदवासीं भक्तजन प्रेमी । लक्ष षण्णवति सहस्र जंगमार्चनी । तनुमनधन अर्पिले ॥८०॥ कूपोदका घृत केले । जंगमांसीं तृप्त केले । शरणांगतासीं उद्धरिले । वास केले बदरिकाश्रमीं ॥८१॥ जय जयाजी बसवलिंगा । शरणांगत पाप विभंगा । हावगिलिंगाच्या अभंगा । अक्षय अभंग कीजेजी ॥८२॥ आता कन्नड शिवकवीना । करोनिया साष्टांग प्रणामा । हावगिस्वामीच्या मराठी कवना । स्फूर्ति द्यावी म्हणोनीं ॥८३॥ हरिहर देव राघवांक । सोमनाराध्य भीमकवि देख । श्रृंगिराज मलुहण पुष्पदंत प्रमुख । हरदत्ताचार्य शिवकवी ॥८४॥ गुब्बि मल्लणार्य षडक्षर देव । निजगुणाराध्य मायिदेव । ज्यांच्या कृतीचा वैभव । कर्नाटकी विराजतो ॥८५॥ महाराष्ट्र कवीं शिवदास गोमा । आणीक शिवदासाचा शिंगणापुरी प्रेमा । शिवराज मन्मथ स्वामी जाणा । सकल संत नोवरा ॥८६॥ शिवदास बसवलिंग । लिंगेश्वर लक्ष्मणाचे अभंग । मन्मथ स्वामींची प्रभावळ सुरंग । महाराष्ट्री प्रसिद्ध ॥८७॥ वडांगळाकर गंगाधर स्वामी । शिष्य बाळाबुवा गुरुभक्त प्रेमी । महादेव प्रभु गुरुदास नामी । साखोळकर जाणिजे ॥८८॥ बसव पुराण कर्ता शंभु तुकाराम । सिद्धराम चरित्रकार निःसीम । शिवगुरुदास बसवदास नामे । मत्पिता गुरू जाणिजे ॥८९॥ बसव जन्म चरित्र । बसव गाथा पवित्र । भारुडादि द्विसहस्र । बसव महिमा वर्णिले ॥९०॥ तयांच्या चरणी । साष्टांग प्रणिपात करोनी । दीनाच्या बाल भाषे लागुनी । अभय दीजे कृपाळुवा ॥९१॥ मुचकुंद बसवलिंग स्वामींची माता । कवइत्री महंतम्मा पतिव्रता । भावंडी रुद्रमा जयदेवी तत्वता । बारसींचे गंगांबा ॥९२॥ नमितो जननी गंगा मातेसी । पिता रामलिंग स्वामीसी । मज बाळपणी केले परदेशी । सेवा कैंची घडली मज ॥९३॥ पिता तोचि गुरु साचार । सांगे शिवलीलेंत श्रीधर । हा योग घडला सुकृते निर्धार । हा काव्य विचार त्यांचीं कृपा ॥९४॥ नमू ऐशा पवित्र माता पितयासी । गुरुवर्य नावदगीं रेवप्पा यांसीं । ज्यांच्या कृपे षटस्थल ज्ञानासी । प्राप्त झालो निश्चये ॥९५॥ तयांची लीला अगाध । जंगमदासोही जगीं प्रसिद्ध । तयांचा चरित्र कानडींत विशुद्ध । संग्रह केला दासाने ॥९६॥

तया महादानी शिवयोगीसी । करोनि साष्टांग प्रणिपातासी । श्री हावगिलिंगाच्या कृतींसी । अभय कर दींजे दयानिधे ॥९७॥ ऐसे शिवकवी कवइत्रींना । करूनि सद्भावे नमना । माझ्या स्वामींच्या कवना । स्फूर्ति दीजे म्हणोनी ॥९८॥ मागे झाले पुढे होणार । वर्तमानी प्रकाशणार । समस्त कवींना नमस्कार । करोनि ग्रंथ प्रारंभू ॥९९॥ शिवदेवाच्या आज्ञेने । मर्त्यलोकी झाले येणे । ते रेणुकादि शिवगणे । वीर शिंव्हासन आरूढले ॥१००॥ वैराग्य शिंव्हासन त्यजोनी । संचार केले अवनी । अनंत महिमा दाखवोनी । जगी प्रसिद्ध जाहले ॥१०१॥ ऐसिया गुरुवर्यांचे चरित्र । श्रवण करिता श्रवण पवित्र । पापराशि अपवित्र । क्षणमात्रे दग्ध होती ॥१०२॥ वटपुरी गुरुलिंग जंगम दासोही । गुरु कृपे भवतरले पाही । शिवमत उद्धारा लवलाही । अवतरले जिही मर्त्यलोकी ॥१०३॥ पंचवक्त्र गणाचे अंशज । वाणिज सुकर्मीं बसवलिंग सतेज । मौक्तिक दीर्घ श्रंगीपुरीचे महाराज । पट्टचरवर्य घनलिंगी ॥१०४॥ गुरु बसवलिंग स्वामी । पूर्वजांचिया महत्व श्रवणी । सद्भिलापा दाखवोनी । ग्रंथ रचना करविले ॥१०५॥ ऐसिया गुरुवर्यांचे चरित्र । उरग पतिही वर्णावया अपात्र । तेथे मीं पामर किंचिन्मात्र । कैसे वर्णू गुरु लीला ॥१०६॥ तरी गुरु माउलींचे कृपेने । वदवील तैसा वदणे । जैसी माता शिकवी बोलणे । बाळा लागी सप्रेमे ॥१०७॥ मिश्रण क्षीर नीराचे । जाणोनि स्वीकारी हंस साचे । हे अभिनवरीत दुग्ध सेवनाचे । कैसे काक जाणेल ॥१०८॥ कर्दमांतील खेंकडा । शर्करेची गोडी न जाणे बापुडा । पौर्णिमेच्या ज्योत्स्नेचा आनंद रोकडा । उपभोगिती चकोर ॥१०९॥ चंद्रकांतासी परिकर । पाझरतोकी अमृतकर । येर कांच परि शुभ्र । चंद्रकिरणे न शोषिती ॥११०॥ पौर्णिमेच्या अमृत कळा । पाहोनि सागर उचंबळला । परि तोचि ओहळा । असंबंध लौकिकी ॥१११॥ तैसे माझिया काव्यासीं । विमल मति सुकवि जाणती साहसीं । कुकवी जाणती ना कृतीसीं । काय त्यांच्यासीं मज काज ॥११२॥ धारण केले शंकरे । चंद्रकलेसीं शिरावर । जैसे रविकिरण प्रखर । उलूकासीं न भावे ॥११३॥ तैसे ज्ञानी मानेल मम काव्य । अज्ञानिया काय सोय । रोगिया षड्रसान्न पाहे । कटु विष वाटेल ११४॥ पर शिवाची ज्ञान कला । कोल्लीपाकी सोमनाथोद्भव अवलीला । रेवणसिद्ध नामे उदय पावला । तयाचा सूनू घनलिंगरुद्र ॥११५॥ रुद्रमुनि कर कंजसंजात । महंतार्य नामे विख्यात । तेचि शासन गुरु परंपरेंत । अलदी हिरे मठ गणाचार्य ॥११६॥ महंतेश चरपट्टाधिकारी । रचिले श्रीकृतीसीं निर्धारी । बाळकाचे बोबडे बोल परी । प्राज्ञ सुविचारी हर्षती ॥११७॥ आढळता कांहीं शब्द दोष । माते परी मानावे संतोष । बोबड्या बोलाचें अर्थ प्रकाश । सुज्ञ जनी करूनि घ्या ॥११८॥ मी ही कृती लिहीन । म्हणणे मज वाटे अज्ञान । गुरु महंतेश हृदयांतुन । बोलवतो म्हणोनि बोलिलो ॥११९॥ मीं लिहितो करितो म्हणणे । फुकाचें नोहे बोलणें । श्रीगुरु कृपेविणें । सर्व कांहीं असाध्य ॥१२०॥ कवीचीं मति असेल किंचित । तरि

का धाकुटे असती पशुपति सुत । चरित्र नायकाचे बळे अद्भुत । काव्य रचना करीतसे ॥१२१॥ ऐसे म्हणती कन्नड कविवर्य । अलदी हिरे मठ महंतार्य । स्वामी महिमा माधुर्य । कन्नडिगाना चाखविले ॥१२२॥ महाराष्ट्रांतील शिष्य मंडळी । गुरु लीलांमृता भुकेजली । म्हणोनि देशिकेंद्र बसवलिंग माउली । मज दीनासी अज्ञापिले ॥१२३॥ तेचि कन्नड काव्य वाग्झरी । महाराष्ट्रांत वाहवोनि निर्धारी । उद्धार होऊ झडकरी । म्हणोनि आज्ञा वंदिलो ॥१२४॥ परी कविता असावी कैसी । न जाणे छंदालंकार व्याकरणासी । स्वामींचि वद-विणार रंकासी । तैंसा वदे मी परतंत्र ॥१२५॥ मज नाही स्वातंत्र्य । कानडीचा करणार भाषांतर । सुबुद्धि देणार गुरुवर । ओवी परिकर लिहावया ॥१२६॥ जगदाचार्या हावगिलिंगा । शरणांगत जन पाप विभंगा । तव चरित्रा वदवी अभंगा । बसवलिंग मुखाने ॥१२७॥ यया चरित्रा आधार । कन्नड कविताचि निर्धार । तरी मराठी ओवी सुंदर । तव कृपेने लिहीन ॥१२८॥ कथारंभासी मूळ काय । तरी सज्जनी ऐकावे । सप्त समुद्रे जाणावे । भूमंडळासीं कंकण ॥१२९॥ अनेक बुद्बुद तरंग । उठती जयाच्या अंगी निःसंग । वज्र वैडूर्यादी नवरत्ने सुभग । भरोनि उन्नत झाला जो ॥१३०॥ मत्स्य कमठ मकर । तैसेचि कर्कोटक दर्दुर । जयाच्या पोटी स्वैर । जन्मोनिया वर्तती ॥१३१॥ तया समुद्रा माझारी । जंबुद्वीप असे निर्धारी । तयाचिया ऐश्वर्याची थोरी । आदि शेषा न वर्णवे ॥१३२॥ भूकांतेसीं नवरत्ना भरणे । शोभिवंत सतीला जैसे लेणें । तैसे नवखंड पृथ्वी जाणणें । पौराणीक प्रमाणीं ॥१३३॥ तो उदधीचि सरोवर । सरसिजेचि नवखंड परिकर । रवि कोटि प्रकाशे मिरवे सुंदर । माजी कर्णिका हेमगिरी ॥१३४॥ ते कनक नग लक्ष योजन । उन्नत दिसे शोभायमान । विस्तीर्ण षोडष सहस्र योजन । त्रिविध कंकणे तो ऐका ॥१३५॥ असती त्रिसहस्र योजन । मध्याकृती पंचविंशति सहस्र जाण । तयाच्या मूळी षोडशसहस्र प्रमाण । शोभिवंत दिसतसे ॥१३६॥ अग्र पीनोन्नत द्वाविंशसहस्र । परिधीं योजने षण्णवति सहस्र । तृतीय कंकणाचा विस्तार । यया परी ऐकिजें ॥१३७॥ तयाच्या अग्रभागी दिग्पाळ । असतो अष्ट कोटि विशाळ । पूर्वोत्तरादि चतुर्द्वारे सोज्जळ । चतुर्वेदे जाहली ॥१३८॥ लक्ष योजन दीर्घ असती । अष्ट भैरव रक्षण करितो । तयांच्या सह हरि ब्रम्हेंद्र निगुती । अंतरावरुनी असतो हो ॥१३९॥ सुरगण वृंदा सहित । मणिमय मंदिरी वसतात । ते सांगवेना अद्भुत । एकाहुनी एक पैं ॥१४०॥ तया कमल कर्णिके माजी । श्री शंभूचे अंतःकरण पहाजी । पद्मराग पुष्यराग पुंजी । प्रकाशमान दिसतसे ॥१४१॥ ऐसा तो कनकगिरी । मनोहर दिसे समुद्रा भीतरी । ते वर्णावया शेषाची वैखरी । नपवे सरी तयाचीं ॥१४२॥ तया गिरिवराच्या शिखरी । सभांगण शोभतसे भारी । सहस्र किरणा परीं । प्रकाशमान दिस-तसे ॥१४३॥ मंटपाच्या मध्यभागी सुंदर । सिंहासन असे मनोहर । जयाच्या प्रकाशा अंत ना पार । कोटि सूर्या आगळे ॥१४३॥

चिंतामणींची मांदी । परिसाची असे वेदी । सद्धर्मचि तयासी आदी । नीलरत्ने केशरा ॥१४५॥ अणिमादी अष्टसिद्धी । अष्टदळ कमळ त्रिशुद्धी । तयाचिया मध्यभागी आदि । अनादि शंकर बैसाला ॥१४६॥ अर्धांगी शोभे शांकरी । चंद्रानना त्रिपुर सुंदरी । जटेमाजी गंगा लहरी । झुळझुळ निरंतर वाहतसे ॥१४७॥ जटा मुकुटी किशोरचंद्र । पंचमुख दशभुज त्रिपंच नेत्र । त्रिशूळ फरशु खड्गवज्र । मुद्गरादीं आयुधे ॥१४८॥ नागपाश घंटा प्रळयाग्न । अंकुशादि वाम करी शोभायमान । नीलकंठ मदन दहन । कर्पूर गौर करुणा सिंधू ॥१४९॥ प्रपंच रहित सर्व कारण । सांब सदाशिव रुंडमाला भरण । गुणातीत गिरिजा मन रंजन । भवतारण भवानीश ॥१५०॥ गानप्रिय पन्नग भूषण । कोमलांग व्याघ्र चर्म धारण । रोमजाद्यखिळ मनु मुनिगण । वंदिती चरण त्रिदिवौकस ॥१५१॥ वीर वृषभ स्कंद नंदी । नृत्य करी भृंगी त्रिपदी । गजकर्ण गोकर्ण शंकुकर्णांची मांदी । घंटा कर्णादी गणेश्वर ॥१५२॥ दारुक रेणुक विश्वाचार्य । नीललोहित चिरु तोंड निर्माय । महाकाळ सहनेश मरुळाचार्य । अंगुष्ठादि गणेश्वर ॥१५३॥ दश तेरश षोडश । त्रिषष्टि पुरातन स्वप्रकाश । सप्तशत दश-सप्तती अमर गणेश । शिव सभेसी बैसले ॥१५४॥ एकादशरुद्र शतरुद्र । गंगावाळुक सम अतिरुद्र । स्मरारीच्या वामभागी समग्र । भय भक्तीने तिष्ठती ॥१५५॥ तैसेचि नवकोटि नारायण । दशकोटि ब्रम्हे जाण । इंद्रादि सुरगण तेहतीस कोटि ॥१५६॥ भारद्वाज विश्वामित्र । अत्रि गौतम पाराशर । सनक सनंदन व्यास कुमार । शुक भृगु जमदग्नि ॥१५७॥ कस्यप सनत्सु जात याज्ञवल्क्य । दधीचि मैत्रावरुण शौनक । वसिष्ठ वामदेव कण्वादिक । विश्वरूपासी वर्णिती ॥१५८॥ बाहत्तर ब्रीदावळी । धारण करोनि ते वेळी । आळविती चंद्रमौळी । छत्रचामर ढाळोनी ॥१५९॥ वाम दक्षिण भागीं चंडकीर्ति । कनक वेत्रपाणी नाचती । जगत्पतिसीं गाती । आनंदाने ते वेळी ॥१६०॥ कालाभ्रदूत झंझावात जयजय । बालार्क अज्ञान तम नाश जयजय । मूल माया कुज कुठार जयजय । जय कंदर्प दर्प दहना ॥१६१॥ व्याल भरण दुरितौघ नाशन । काल कंधर दक्ष यज्ञ विध्वंसन । गजांतक अंधक मर्दन । द्वारपाळे गर्जती ॥१६२॥ रुद्रवीणा रावणवीणा । गंधर्वी लाविती सुस्वरी जाणा । मृदंग ताल झणझणा । समस्वरासी मेळविती ॥१६३॥ सरिगम पधनी । सप्तस्वरे रोहाव रोहानी । किन्नर गंधर्व बैसले गायनीं । सभा रंगणी आनंदे ॥१६४॥ पूर्वी कल्याणी मृग कांबोदी । भैरव भैरवी आनंदी । नाट्य असावरी वादी । संवादीं जाणोनि गाताती ॥१६५॥ शंकरा भरण श्रीराग । धनाश्री पटदीप गौड सारंग । गाती रागरागिणी सुरंग । रंगोनिया सुस्वरी ॥१६६॥ ऐकोनि गंधर्वांचे गायन । मंद मध्य तार स्वन । सारिगम आलाप तान मान । डोलत नटराज आनंदे ॥१६७॥ देवांगना नृत्य करिती । भृंगीश उठला त्वरितगतीं । तयाच्या व्यंग नाट्या प्रती । गौरीपतीं हसताती ॥१६८॥ मांस ना नस । हाडांचा सांपळा उध्वस । भयानक

वाटे पाहणारास । नृत्य विशेष त्रिपादे ॥१६९॥ हासवी भयदावी । पाहणारांचे डोळे चुकवी । कोपोद्रेके येई । अंगावरे धावोनी ॥१७०॥ ऐसे नवरसे नृत्य । भृंगीशे नाट्य करित । सांब सदाशिव हर्षे डोलत । आश्चर्यचकित सुर मुनिवर ॥१७१॥ नृत्य करी हाडाचा सांपळा । घाबरी झाली चित्कळा । धन्य असे हा माये आगळा । शिवलीला अगम्य ॥१७२॥ तया आनंदावसरी । आलासे त्रिलोक संचारी । भाळी भस्म त्रिपुंड धारी । अक्षमाळा रुळती गळा ॥१७३॥ मस्तकी शिखा विराजित । अंगावरी उत्तरीय शोभत । करी वीणा करताल वाजवित । हसत मुखे येतसे ॥१७४॥ जय शिवशंकर गौरी मनोहर । मदगज संव्हर । मदन दहन तू ॥१७५॥ ऐसे सुस्वर गात नाचत । आनंदे शिव सभेसी येत । नमस्कार करोनी सांबाप्रत । शिव ध्यानांत उभा असे ॥१७६॥ हो ! हो ! आले की नारद । स्थिर व्हावे विशुद्ध । भूलोकीची वार्ता विशद । आम्हा लागीं श्रुत करा ॥१७७॥ आपुलिया आगमने । झाली सकळांचीं प्रफुल्लित मने । कवण वर्तमान नवे जुने । इत्थंभूत वदावे १७८॥ ऐसे ऐकोनि शिव वचन । कलह प्रिय केला खिन्न वदन । घालोनिया खाली मान । दुश्चित मने बोलतो ॥१७९॥ नीलकंठा सुर जेष्ठा । भूलोकी नुरली आपुली प्रतिष्ठा । स्वधर्मी नसेजी निष्ठा । कुतर्कवादी जन झाले ॥१८०॥ मानव झाले दुर्व्यसनी । कामी लोभी दुरभिमानी । देव धर्मावरी सोडोनी पाणी । विषय चिंतनी रमताती ॥१८१॥ गुरु कवण शिवलिंग काय । जंगम तरी भीक माग्या होय । उरल्या पंचावरणाची सोय । आता कोठोनी परमेशा ॥१८२॥ निंदक चहाड दुर्बुद्धि । उन्मत्त झाले हो त्रिशुद्धि । आता कवण सांगेल बुद्धि । पढत मूर्ख ॥१८३॥ दानधर्म परोपकार । कासया कीजे म्हणती पामर । दुष्कर्मे हिंसा करिता अनिवार । शंभो हा दुर्विचार कैसा खंडेल १८४॥ चोर जार पिशुन । यांचा वाढलासे मान । साधु जंगम शिवशरण । आता कैसे जगावे ॥१८५॥ विलास वैभवाचा हव्यास । धडपड करिती रात्रंदिवस । भक्ति ज्ञान वैराग्याचा ऱ्हास । झाला आहे सर्वस्वी ॥१८६॥ शिवशरणांची शिकवण । विसरोनि गेले अज्ञजन । दुर्व्यसनी तनुमनधन । आनंदाने झिजविती ॥१८७॥ न करिती शिवभजन कीर्तन । न रमति शिव ध्यानी निशिदिन । करिती मद्यमांस भक्षण । परद्वार प्राणि हिंसा ॥१८८॥ ईषण त्रया हपापले । शिव सुखासी मुकले । आता नाही उरले । सज्जना ठाव भूलोकी ॥१८९॥ मज वाटेजो कळवळा । सज्जनांचा जाश्व नीळा । तरी आपुलिया चित्कळा । पाठवा वेगी मर्त्यासी ॥१९०॥ म्हणोनिया नारदमुनी । साष्टांगे नमिला शूळपाणी । शिवे अभय देवोनी । ऊठ म्हणे नारदा ॥१९१॥ अंतर्दृष्टी पाहोनि शिव । निश्चय करोनि मनीं तव । वीर गुह गणेशा अभव । आज्ञापित स्वानंदे ॥१९२॥ सच्चिदानंदे पाहताक्षणी । त्रिमूर्ति उभे राहती कर जोडोनी । आज्ञापितसे खट्वांग पाणी । मर्त्यलोका जावया ॥१९३॥ बाळानो ऐका मम वचना । जावें तुम्ही मृत्यु भुवना । भूषवावे वीर सिंहासना । जगद्गुरुत्वा पावोनी ॥१९४॥

जनासी बोध करावे । वीरशव मत वाढवावे । पतितांसी उद्धार करावे । पावन कीजे अवनीसीं ॥१९५॥ ऐसे शिव वचन श्रवणी । अमृतवत् प्राशोनी । वीरादीं वदती ते क्षणी । देवदेवा ॥१९६॥ माझिया युगा माजी । सत्य युग धर्म नियोजी । तयावरी मी नाहीं राजी । ऐसे कली बोलतो ॥१९७॥

॥ श्लोक ॥ मद्युग मध्ये जाता कृतयुग धर्मानुकरणं किमिति । इति रोषाइव कलितः पीडयते साधवः सततं ॥१९८॥

ऐसिया दुष्ट कलि कामासी । जिंकोनि येऊ कैंसे तव पदासी । कलियुग भयानक आम्हासी दिसतसेजी महेशा ॥१९९॥ तव बोले त्रिनयन । रवि भीतो का तमा लागुन । हिमवंतासी अग्न । भीतो म्हणणे आश्चर्य ॥२००॥ नागा पाहोनि गरुड पळाला । गज मांदीसी सिंव्ह भ्याला । हरिणा पाहोनि व्याघ्र शिरला । दरींत म्हणणे विपरीत ॥२०१॥ ज्ञानी न भी मृत्यूसी । पाणी नलगे कमल पत्रासी । बाण भीना शत्रूसी । अंकुश गजासी भीतो का ? ॥२०२॥ गिरिसीं वज्र भीतो । कुठार वृक्षा नमितो । लवित्र वल्लीसी थरारतो । म्हणणे केवी शोभेल ॥२०३॥ काननासी दावानल । समुद्रासीं वडवानल । दुःखासी सुज्ञानी विचल । नव्हती का सर्वथा ॥२०४॥ तैसे तुम्ही वीरपुत्र । अपवित्र कलीसीं करा पवित्र । तुमचे पाहोनि सुचरित्र । कलि पवित्र होईल ॥२०५॥ सप्त वर्षी मारी तारकासुर । जन्मताचि छेदिले दक्षशिर । पालखामाजी लाथाडोनी सिंधुर । दैत्यालागी संव्हरिले ॥२०६॥ बाळपणीच्या काजा । आठविता वाटते लज्जा । आता तुम्ही निर्भयें जा । जा जा त्रिवार अभय असे ॥२०७॥ तरी ताता तुमचे चरण । वियोग न साहेजी एक क्षण । ऐसे म्हणणेच अज्ञान । मजला जाण वाटते ॥२०८॥ आता बोलोनिया काय । उत्तमे करोनि दावावे । मध्यमे बोलोनि करावे । अधमे बरळावे सैरावैरा ॥२०९॥

॥ श्लोक ॥ कृत्वा दर्शयते प्राज्ञ । प्रोक्तश कार्यन्तु मध्यमम् । अधमस्तु वदत्येव । निचोलाम्रार्क तूलवत् ॥२१०॥

ऐसे धैर्याचे बोल श्रवणी । पडता हर्षले शूळपाणी । तुमचिया चित्कला या क्षणि । पाठवावे भूलोका ॥२११॥ मग आपुलाल्या कलांना । आठविती त्रिमूर्ति तये क्षणा । तव समक्ष उभे असती जाणा । नमूनि आज्ञा मागती ॥२१२॥ मर्त्यलोका तुम्ही जावोनी । आरूढावे वीर सिंव्हासनी । पट्टचर देशिक होवोनी । धर्मोद्धार करावे ॥२१३॥ अनुभवींना रक्षावे । भविजना शिक्षा करावे । क्रिया ज्ञान उपदेशावे । उद्धरावे शरणांगता ॥११४॥ जनतेचे अज्ञान दूर करावे । शिव तत्वासी उद्धरावे । आसक्त होवोनि न रहावे । एका ठाई ॥२१५॥ बहुत देश संचार करावे । बहुतांसीं सन्मार्गी लावावे । लोकोद्धार करावे अविश्रांत ॥२१६॥ शिवगुरूची आज्ञा वंदोनी । आनंदे निघाले त्रिमूर्तिनी । मानव कोटि उद्धारा लागोनी । कटिबध्द जहाले ॥२१७॥ रंभापुरी वीर सिंव्हासन । रेवण सिध्दाचे आस्थान । तयाच्या

पद कमली भृंगजाण । अलदीचे हिरे मठाधीश ॥२१८॥ सर गणाचारी पट्टचरवर्य । महंत स्वामी गुरुवर्य । वैधव्यहर पादुका स्वामींचे काव्य । कन्नड वार्धीक लिहिलेती ॥२१९॥ गुरु हावगिस्वामीचे अज्ञाधारक वृद्ध बसवलिंग स्वामी देशिक । येरगी ग्रामी आज्ञापिले देख। मराठीं ओवीं लिहावया ॥२२०॥ सुक्षेत्र उदयगिरीसी जातां । कानडी प्रती दिले तत्वता । कन्नड पद्ये ओवी बद्धता । करावयासी आज्ञापिले ॥२२१॥ श्रीगुरुंचीं आज्ञा वंदोनी । समाधी समक्ष बैसोनी । पांच ओव्या लिहोनी । आरंभ केलो चरित्रा ॥२२२॥ श्रीक्षेत्र मुचकुंदपुरासी । नेमे गेलों शिवरात्रीसी । लिहिता फाल्गुन शुद्ध दशमीसी। प्रथमाध्याय संपला ॥२२३॥ हावगिलिंगा वैधव्य भंगा । हावगिलिंगा पापविभंगा । हावगिलिंगा शरणांतरंगा । अक्षय अभंगा अविनाशा ॥२२४॥ श्रीगुरु हावगिलिंग लीलामृत । श्रवणे प्राशन करोनि सद्भक्त। होताल जन्ममरणा विरहित । बसवलिंग बोलत भालपुरिचा ॥२२५॥ इति श्री हावगिलिंग लीलामृतें नारद कैलास गमनम् , चित्कलाज्ञापनम् नाम प्रथमोध्याय गोड हा

॥ श्री गुरु हावगिलिंगार्पणमस्तु । श्रीरस्तु मंगळमस्तु ॥

श्री गुरु विरूपाक्ष लिंगाय नमः । श्री गुरु हावगिलिंगाय नमः । श्री गुरु बसवलिंगाय नमः ।



श्री गुरु विरूपाक्ष लिंगाय नमः । श्री गुरु हावगिलिंगाय नमः । श्री गुरु बसवलिंगाय नमः ।
येती कला वीर गुह गणपांचे मर्त्यलोक उद्धार । करण्या जव ये ग्लानी येउनी धर्मासी करिती उद्धार ॥१॥
॥ आर्या ॥ श्री गुरु शरणांगत उद्धार विमल । श्री गुरु कृपाळु भवत्रस्ता ॥२॥
श्री गुरु भवारण्य दावानल । श्री गुरु सुजनौघ रवि कमल । नामा अनमातीत तू ॥३॥ तुमची कृपा जव होय ।
मार मर्दन पंचानना । अज्ञान अंधःकार रवि किरणा । षटस्थल ज्ञान संपन्ना । लिंगरूपा पावले निःसंदेह ।
मायीक भ्रांती निरसोनि जाय । तव अंग लिंगत्वा पावे । भृंगी कीट न्यायाने ॥४॥ इष्टलिंग धारणे स्थूल देह । अंगलिंगासी ॥६॥
तैसेचि मनलिंगा वेधले पाहे । झाले मन लिंगरूप ॥५॥ दुर्भाव ते झाले सद्भाव । बाह्याभ्यंतरीं लिंगभाव । नाही उरला ठाव ।
ऐसा झालो सर्वांग लिंग । साहित्य योगे केलो भवभंग । लिंग अंगकी अंगलिंग । फिटला पांग सद्गुरु कृपे ॥७॥ श्रोती व्हावे सावधान ।
श्री चरित्रा द्यावे अवधान । द्वितियाध्यायी चित्कलावतरण । लोकोद्धारा होईल ॥८॥ जंबुद्वीप शाकद्वीप । कुशद्वीप क्रौंचद्वीप । शाल्मली-
गोमेध पुष्करद्वीप । सप्तद्वीपे जाणिजे ॥९॥ लवण, इक्षु, सुरा, समुद्र । दुग्ध दधि स्वादोदक सांद्र । घृत समुद्र परिकर । सप्त समुद्रे ही
जाणा ॥१०॥ एकेक द्वीपा एकेक समुद्र । सप्त द्वीपां सप्त समुद्र । वेढोनिया विचित्र । सात रूपे दाधली ॥११॥ एकाहूनी एक मोठे । सप्त-
द्वीपें असती गोमटे । यांचा क्रमयोजन श्रेष्ठ । श्रोतयानी ऐकावे ॥१२॥ सप्त द्वीपांचे प्रमाण । दोन कोटि वीस लक्ष योजन । दशकोटी
ते जाण । हेममय भूमी ॥१३॥ दश सहस्त्र चक्रवाळगिरी । पंचवीस कोटि तमो भूमिभारी । पंचवीस लक्ष पंनास हजारी । योजनांतरी
गणना ही ॥१४॥ पुनः गर्भोदक समुद्र । एक कोटि सत्तावीस लक्ष योजन परिकर । पैल वाळवंट कोटि योजनांतर । जाणावे शास्त्र
संमत ॥१५॥ ऐसी सप्त द्वीपे मिळोनी । गणना पन्नास कोटि आणि । कनकाद्रीच्या पैल पन्नास कोटिनी । गणना कीजेती ॥१६॥
कनकाद्रीचे ऐलपैल वलय । शतकोटि योजन भूवलय । आणीक सप्त पाताळे । गणिजेती ॥१७॥ तेही पन्नास कोटि जाणावे । तैसेची भूरादि
सत्यलोक मानावे । दोन्ही मिळोनि गणित करावे । द्विशत कोटि योजने ॥१८॥ ऐसी भूवलयांकित सृष्टि । गणनेस होईल पंचशत कोटि ।
यया अधिपत्याची गोष्टी । स्वयंभू मनू जाणिजे ॥१९॥ चतुर्दशमनु । अग्रजतो स्वयंभू मनु । यासी उत्तानपाद प्रियव्रत नंदनु । दोघे
जाणावे ॥२०॥ तया उत्तानपादासी । झाला ध्रुवकुमार धाडसी । नक्षत्र गण अंतरिक्षासी । अढळपद मिळविला ॥२१॥ सकल संपदैश्वर्य ।
भोगी भुवलोंकिचे साम्राज्य । अढळपदी बैसला सहज । सदासर्वदा जाणावे ॥२२॥ दुजिया प्रियव्रतासी । सप्त पुत्र झाले साहसी । तयांच्या
नामांकितासी । श्रवण कीजे सज्जनीं ॥२३॥ अग्नींध्र, मेधातिथीं, वपुष्मंत, । भव्य, ज्योतिष्मंत, द्युतिमंत । सर्वां सहित झाले सप्त ।

श्री
हा.

प्रियव्रताची संताने ॥२४॥ सप्तद्वीपे सप्तपुत्रासी । वांटोनि दिधले विभागेसी । तया माजी अग्नींध्रासी । नव संताने जाहली ॥२५॥ नाभी, किंपुरुष, हरि, इळाव्रत । रम्यक, हिरण्यक, उत्तरकुरु, सत्य, । भद्राश्व, केतुमाल, नवांत । नामे त्यांची जाणावे ॥२६॥ ऐसिया नव पुत्रासी । अग्नींध्रेते समयासी । नवभाग करोनि जंबुद्वीपासी । नवु पुत्रासी दीधले॥२७॥ तयांची नामे नवुखंड । प्रसिद्ध असती ते ते खंड तया माजी नाभीसी प्रचंड । वृषभ नामे सत्पुत्र ॥२८॥ वृषभात्मजचि जाणा भरत । तयाच्या नामे प्रसिद्ध भारत । छप्पन्न देश भारतांत । प्रत्येक नामे वेगळी ॥२९॥ अंगवंग, कळिंग, । तैलंग, लाटकोंग, । बंगाल, चोळ, केरळ, चांग । गौड, पांचाळ, सिंव्हळ, ॥३०॥ कुंतळ, नेपाळ मळयाळ । सैंधव कोंकण तुळव । कुरु मगध मत्स्य कोशल । विदर्भ शूरसेन काश्मीर ॥३१॥ महाराष्ट्र कर्नाट किरात । तुरुष्क बरम शंकर त्रिगर्त । निषध मध्यजैन निश्चित । बर्बर बाल्टीक लाटपै ॥३२॥ चीन कराळ ओड्र गुजर । कांबोज सौराष्ट्र सौवीर । पांडय हूण यवन क्रूर । म्लेंछहयहय आर्यावर्त ॥३३॥ इरद्वैत वासर अमरक । उत्तर कुरु ग्रेटी देख । ऐसे छप्पन्नांचा गुणक । जाणिजे की सज्जनी ॥३४॥ ऐसे छप्पन्न देशा भीतरी । सकल देश फणामणि केसरी । मलयाळ देशाची थोरी । कवण वर्णू शकेल ॥३५॥ कलियुगी आश्चर्य जनक । सकल सौभाग्य सौरभेसी अधिक । मलयाळ प्रांत देख । भारता माजी ॥३६॥ पुरपट्टणे अग्रहाराम । नगरेखेडी आश्रम । क्षेत्र धर्म स्थळे विश्राम । वाटिका जाण सुंदर ॥३७॥ उपवनें दिसती शोभायमान । नारिकेळ, पूग, द्राक्षे, दाडिम । जंबुफणस खर्जूर जाण । बहु उद्याने शोभती ॥३८॥ सेवती बकुल चंपक । पाटली पुन्नाग करवीर देख । जाई जुई मोगरे सुरेख । सुगंधे उपवन दरवळले ॥३९॥ अमृतोपम सीतळ । जलाशय विहिरी नद्या सोज्वळ । जीवंत झरे झुळ झुळ । सर्वकाल वाहताती ॥४०॥ उपवनी गाति कोकिला । मयूर कीर साळुंखी मंजुळा । मध्यान्ही छायेसी किलबिला । कूजती पक्षी वृंद ॥४१॥ उष्णकाळी पाणपोया । पाणी वाढिती सौंदर्य लहरिया । वाटे पांतस्था गंगा माया । पाणपोई ठेविली ॥४२॥ ऐशा पवित्र देशाचे जन । सन्मानी दानी सज्जन । द्विकाल त्रिकाल षटकाल जाण । करिती लिंगार्चन सद्भावे ॥४३॥ कामासी खंडिले । क्रोधासी दंडिले । लोभासी दवडिले । देशो धडी ॥४४॥ दुर्गुणासी छेदिले । सद्गुणासी संग्रहिले । सदाचारी वर्तती भले । सकल जन ॥४५॥ वेदागम शास्त्र पुराण । शोधोनि उपनिषदादि अथर्वण । शिव एकोध्येयः शिवंकर जाण । न द्वितीय म्हणताती ॥४६॥ ऐसे जाणते सद्भक्त । गुरुलिंग जंगमी प्रेमयुक्त । दासोहंभावी संयुक्त । अष्टावर्णा माझारी ॥४७॥ निर्धन अभागी जन । नाही तया प्रांती जाण । नाहीं नेदी ऐसे कुवचन । कवणा तोंडी नयेची ॥४८॥ अमर पतिसम अष्टभोगी । कुबेरासम धनिक उद्योगी । जनकासम विदेही योगी । प्रांता माजी तळपती ॥४९॥ दया क्षमा शांति । ज्यांच्या हृदयी केली वसती । रूपलावण्ये



ली.
अ.
२
पा
१

मदनासि लाजविती । ऐसी ख्याती देशाची ॥५०॥ शिवार्चन शिवार्पण शिवानुभव । ग्रहोग्रही करिति अनुभव । जयांचा प्रापंचीक भाव । शिवप्रपंच झालासे ॥५१॥ लाजविती सौंदर्ये देवांगना । सद्‍गुणे उपचार करिति गुरुजना । पतिव्रतासी जाण । अनसूये सम भासती ॥५२॥ पति आज्ञा नुल्लंघिती । सति पति एको देवा भजतीं । गुरुलिंग जंगमार्थ पाक निष्पत्ती । भात्रे करितीं सुलोचना ॥५३॥ नाना कला विद्या कौशल्य । जाणती शिवानुभव अमूल्य । जेणे प्राप्त कैवल्य । लिंगनिष्ठा परस्त्रिया ॥५४॥ मत्स्य कूर्म वराह नारसिंव्ह । वामन आणि परशुराम । दाशरथी बौद्ध कृष्ण । दशावतारे कलंन्यादी ॥५५॥ ऐशा अवतारांचे खंडण मंडण । जाणती पंचवीस शिवलीला जाण । जात्यावरी गाती संपूर्ण । पंचवीस लीला शिवाचे ॥५६॥ ऐशा सुगुणी अबलांचेनी । गृहस्थाश्रम धन्य जाण । देशाची थोरवी झणी । प्रसिद्ध ते जाहले ॥५७॥ अरे तुरे हे अपशब्द । नाहींच प्रांती कुशब्द । यावे यावे सज्जन शुध्द । आपुल्या गृहा म्हणताती ॥५८॥ ऐसी सत्काराची वाणी । मृदु मधुर असती बोलणी । आलिया अतिथी लागोनी । सत्कार झणी करिताती ॥५९॥ तोड फोड मोड । हिंसा शब्द नाही द्वाड । दुष्ट दुर्जनांची चाड । नाही तेथे कवणासी ॥६०॥ तोडा म्हणती कंटक वन । सोडा म्हणतीं दुष्ट व्यसन । फोडा म्हणती पाषाण । हृदय दुर्जनाचे ॥६१॥ ऐशा मलियाळ देशाचे शिरो रत्न । रंभापुरी सुक्षेत्र जाण । तेथील वीर माहेश्वरगण । शिवपूजा धुरीण असतातीं ॥६२॥ तया पुण्य पुरा माजी । सद्भक्ते केली शिवराजी । पर शिवचि आले जी । वीर सिंहासनी ॥६३॥ तया वीर सिंहासनाचे वर्णन । सहस्र फणीसी न करवे जाण । तरी अल्प बुद्धीसी आकलन । होईल तैसे सांगेन ॥६४॥ ते सुवर्णखचित सिंहासन । सिंव्हमुख असती भयंकर जाण । डोळे चमकती विजे समान । रत्नांचे पैं तयांचे ॥६५॥ वाटती ते जिवंत जना । नानालंकारे शोभती जाणा । रत्नजडित कोंदणा । माजीं रत्ने बहुरंगी ॥६६॥ हिरवे पिवळे लाल । गुलाबी गोमेधिक सुनीळ । पंचवर्णी सिंहासन अमोल । दृष्टि दिपवित पाहिल्या ॥६७॥ शुभ्र छत्र अबदागिरी । शुभ्र मोत्यांच्या झालरी । मंटपासी तोरणे परिकरीं । मुक्ता माळा शोभतीं ॥६८॥ पूर्व पश्चिम दक्षिणोत्तर । असती जया महाद्वार । गगन चुंबित गोपुर । पांच खाणी शोभती ॥६९॥ चतुर्द्वारी द्वारपाळ । करी खड्गे तळपती झळझळ । ऐसी गुरु राजधानी विशाळ । मनोहर दिसतसे ॥७०॥ अश्वशाळा, गोशाळा, । पाकशाळा, भोजन शाळा । लिंगार्चन शाळा, अनुभव शाळा । पाठशाळा, दिव्याश्रम ॥७१॥ मतंगशाळा, नरवाहन शाळा । भोई शाळा, रथ शाळा । ययापरी अनेक शाळा । पुरपरिसरी गमतातीं ॥७२॥ विविध शाळा सेवक जनें । गजबजले गुरु सदन । नगारे नौबत सनयांचा ध्वान । वाद्ये त्रिकाळ वाजतीं ॥७३॥ सद्‍गुरूंचे आस्थान । दिव्य मंडपाचे वर्णन । सुर गुरूला नोहे जाण । पामर अज्ञान काय वर्णू ॥७४॥ मागे केले वर्णन ।

तेचि गुरुरायांचे सिंहासन । मध्ये स्फटिकाचे आसन । नवरत्नांचे मंडप ॥७५॥ ऐसिया सिंहासनी सुकुमार । हंसत मुखे बैसले गुरुवर । मुख कमल अति सुंदर । दयावलोकनीं अभय हस्त ॥७६॥ चिद्रूप शांति कला । आलीसे वाटे भूतळा । ब्रम्हचर्याचे तेज आगळे । मुख कमळीं प्रगट दिसे ॥७७॥ भाळी भस्म अक्षमाळा । मणिमय किरिटाचा तेज आगळा । भुज कीर्ती अंगुली मुद्रा सोज्वळा । वज्र कंकण मणि बंधी ॥७८॥ कर्णीं रत्न कुंडले झळकती । गळा मोक्तिक माळा रुळती । कंठा भरण रुद्राक्ष तळपती । ऐश्वर्या मिती नसेची ॥७९॥ कटी भर्जरीं पीतांबर । रत्नजडित कटि सूत्र सुंदर । पाई बांधिले तोडर । नरसिंव्हाचे ॥८०॥ महिमाशाली लोकाधिपती । अणिमादी अष्टसिद्धी राबती । घनलिंग चक्रवर्ति । सिंहासनी विराजती ॥८१॥ भरजरी मखमली कौपीन । काश्मीर शाल उत्तरीय जाण । सिरपेंचा-वरी तुरा शोभायमान । द्वितीय शंभू जाण अवतरले ॥८२॥ भाळी त्रिपुंड्र रेखिले । श्रीगंध तैले माखिले । कर्पूर कस्तुरीचे उटणे लाविले । परिमळ अगाध पसरला ॥८३॥ शुभ्र मोगऱ्यांच्या पुष्पमाळा । गळा शोभती अति परीमळा । हरि ब्रम्हादिकांच्या आगळा । ऐश्वर्य भासे सद्गुरूंचा ॥८४॥ करि तुरग रथ पदाती । ऐसे चतुर्विध सैन्यांची संगती । ज्यांच्या संस्थानी वसती । सदैव सुसज्ज ॥८५॥ अमरपतीच्या ऐश्वर्यांसीं । धिःकारिती आसमासीं । नाम रूपातीत सद्‌गुण रासीं । गुरुवर्यासी उपमानसे ॥८६॥ ऐसे सिंहासनी गुरुराज । विराजती राजाधिराज । दोही भागीं दूत सहज । शुभ्र चामरे ढाळिती ॥८७॥ कनक वेत्र पाणी दूतो । जयजयकारे घोष करिती । रत्नजडित खडावा शोभती । गुरुवर्यांच्या पदकमळीं ॥८८॥ बाहत्तर बिरुदावळी सहित । शोभती जगदाचार्य विश्रुत । मंत्रि मान्य करणिक पंडित कवी कथन गायक ॥८९॥ भाट परिहासक । सभा सप्तांगे शोभे देख । वीर माहेश्वर पट्टचरवर्यादिक । ब्रम्हचारी देशिक शोभती सभे ॥९०॥ चंडकीर्ती वाखाणिती । गुरुराज राजसुतेजा प्रती । अंखड चिद्रूप स्वप्रकाश म्हणती । भवनाशा दिगंत कीर्ती ॥९१॥ मंडलेश्वर मुकुट-घटित । मणिचरण पंडित । समाज सदा विनुत । सज्जन मित्र दुर्जन शिक्षा ॥९२॥ परवादि मत खंडन । वीरशैव धर्म मंडन । श्रीमज्जग-द्गुरु आनंद घन । जयजजकार तुम्हा असो ॥९३॥ श्री गुरुराज चक्रवर्ति । श्री गुरु मूर्ती दिगंत कीर्ति । गुरुकुल कमल रविदीप्ति । गुरु कुला भरण स्मरहरणा ॥९४॥ श्री गुरु भवांबुधि तारू । श्री गुरु शरणांगतोद्धारू । श्री गुरु षड्‌विकार दूरू । परात्परू परमेश ॥९५॥ दुरित तम भास्करा । माया विपिन दहन त्रिशिरा । गुरु दयाळु क्षीरसागरा । वर्धमान पूर्णचंद्रा ॥९६॥ ययापरी वेत्रपाणी । गर्जती जयजयकार ध्वनी । राजे महाराजे झणी । करभार घेवोनि संदर्शिती ॥९७॥ पुष्प मालिका घेवोनीं । दोन्हीं कर बांधोनीं । फल-पुष्पादि घेवोनी उपायनेंसि येताती ॥९८॥ चरण कमलीं साष्टांग । प्रणिपात करिती यथा सांग । पुनः पुनः प्रणिपात अव्यंग । श्री चरणीं घालिती ॥९९॥

ऐसे देशमुख शट्टि महाजन । आणिक माहेश्वर सद्भक्त जन । करभार सहित येवोन । गुरुपद कमळीं अर्पिती ॥१००॥ तव आगत सद्भक्त जना । करिती दौवारिक सूचना । सुस्वागत पाहोनि सज्जना । आनंद वाटे बहुपरी ॥१०१॥ मग जगदाचार्य कृपाळु । आशिष देती कनवाळु । सद्भक्ति प्रसाद सेवोनि तत्काळ । जाती आपुल्या ग्रहासी ॥१०२॥ ययापरी कार्यक्रम । चालत असता नित्य नेम । एके दिनी गुरुवर्ये अनुपम । लिंगार्चन केलेतीं ॥१०३॥ लिंगार्पितोपभोग । संपलिया मग । गुरुराये सवेग । योगनिद्रे पहुडले ॥१०४॥ तव झालासे दृष्टांत । स्वप्नी शिवयोगी महंत । येवोन अज्ञापिती । तेधवा ॥१०५॥ माझे आत्मज तिघे जण । येताती जगदुद्धारा कारण । वीर सिंहासना लागुन । केले जाण अधिकारी ॥१०६॥ तरी आपुले सिंहासन । करावे तयासी अर्पण । साष्टांग प्रणिपात करोन । सर्वाधिकार दीजे तया ॥१०७॥ आपण येइजे कैलासा । ठेवू नये मर्त्यांची आशा । स्वप्नी बोलोनी ऐशा । परी पुरारी अदृश्य झालासे ॥१०८॥ तव खडबडोनी उठती । गुरु माउली दिशा अवलोकितीं । जवळी कोणी न दिसती । आश्चर्य चकित जाहले ॥ १०९॥ तव पंच पंच उषःकाळ । झाली लिंगार्चनेची वेळ । दूती घंटा वाजवितीं कोमल । सुस्वर नादे घुमले जे ॥११०॥ सेवक येवोनी पाहती । श्री गुरुसी साष्टांग घालितीं । परी गुरुराज चित्ती । अस्थिर नावेक दिसले तो ॥१११॥ मग सुचवितीं दूतासी । बोलवा म्हणती महाजनासी । दूत जावोनि आज्ञापिती । येती तत्काळ भक्तजन ॥११२॥ सकळी येवोनि नमिले । सद्‌गुरू सम्मुख बैसले । अज्ञापिती गुरुराज ते वेळे । स्वप्न स्थिती भक्त जना ॥११३॥ सज्जन शुद्ध शिवाचार । संपन्न सद्भक्त तुम्ही वीर । माझिया दृष्टांताचा सार । श्रवण कीजे ये समई ॥११४॥ शिवयोग निद्रेमाजी । आले हो शिवराज योगीं । येवोनि म्हणती वेगीं । द्यावे गादी मम पुत्रा ॥११५॥ अधिकार सूत्रे त्रिमूर्तींना । देऊन यावे कैलास भुवना । आता उरले ना । दिवस मागे ॥११६॥ ऐसे सांगोनि शिवराज । अंतर्धान पावले सहज । मज वाटले चोज । जाग्रती आलो ॥११७॥ पाहतो तरी कोणीं ना दिसे । साक्षात्कार की स्वप्न भासे । मनी हुर हुर लागलीसे । स्वप्नाचा ॥११८॥ ऐसे गुरुवर्य बोलती । भक्तजनी आश्चर्य करिती । तव मंटपांतील लिंगमूर्तीं । स्वप्रकाशे उजळला ॥११९॥ अनंत रवि रश्मि प्रकाश । पडला मंटपी आसमास । पाहोनिया भक्त वृंदास । दृष्टी दिपून गेलीसे ॥१२०॥ तया ज्योतिर्लिंगातून । उदेले त्रिमूर्ति जाण । देव दुदंभी वाजवितीं घनघन । पुष्पवृष्टी झालीसें ॥१२१॥ पूर्वी हरि ब्रम्हाचिया युद्धी । महालिंगोद्भव झाले त्रिशुद्धि । आजि लिंगमूर्तीच्या संधी । उदय झाले त्रिवर्ग ॥१२२॥ तव ते अभिनव दृश्य । पाहती गुरुवर्य भक्त महेश । धन्य धन्य म्हणोनी भूमीस । लोळण घेतीं साष्टांगें ॥१२३॥ शिरीं जटा मुकुट शोभत । भाळी भस्म त्रिपुंड्र विलसत । अक्षमाळा गळा रुळत । शोभे इष्टलिंग निज कंठी ॥१२४॥ हाती धरिले धर्म दंड ।

पंच मुद्रांकित शरीरीं त्रिपुंड्र । मुखीं पंचाक्षरोच्चार गोड । कर्णीं वज्र कुंडले तळपतीं ॥१२५॥ करुण रस भरित । सुकटाक्षे पाहतीं सर्वांप्रत । पशुपती पुत्र शांत । स्मित वदन दिससाती ॥१२६॥ जव त्रिमूर्ति उदया आले । स्थाणू लागीं पल्लव फुटले । वसंता गमचि झाले । म्हणिजे पैं ॥१२७॥ वंध्या पुत्रवती झाले । वृक्ष फल भारे लवले । वंध्या गाई दुभत्या झाले । आनंद सकळा सज्जना ॥१२८॥ पौर जन येती धावोनी । श्री गुरुच्या दर्शना लागोनी । म्हणती आश्चर्य हो जनी । लिंगोद्भव झाले त्रिमूर्ति ॥१२९॥ साष्टांगे नमन करितो । धावोनिया चरणी लागती । आनंदले चित्ती । सकळ जन ॥१३०॥ पाहोनिया त्रिमूर्ति । मूल गुरु हर्षती चित्ती । साक्षात्कार स्वामीचे म्हणती । सत्य जाहले ॥१३१॥ आजि मी धन्य जाहलो । श्री गुरू कृपेसी लाधलो । आता कृतकृत्य जाहलो । आपुलिया कृपे ॥१३२॥ उरलीं नाही आस । शोभिवंत करावे सिंहासनास । अधिकार सूत्रे विशेष । हातीं घेइजे स्वामिया ॥१३३॥ राजे महिसूरासी बोलाविले । साद्यंत वर्तमान सांगितले । चरपट्टाधिकार देशिकत्व दिधले । त्रिमूर्तींसी ॥१३४॥ प्रचंडगणाराधना । गुरुवर्ये केले जाणा । अंध पंगु दुबळ्याना । अन्नदाने तृप्त केले ॥१३५॥ पालखींत बैसवोनी । मिरवणूक काढिले महाजनी । करि तुरग रथ पदाती झणी । मिरवणुकी निघाले ॥१३६॥ सनया तुतुरे ढक्का । नौबत नगाऱ्यांचा धनका । शतानुशते पताका । फडकताती तेधवा ॥१३७॥ आले आलें जगद्गुरू । दूर सरा नास्तिक अविचारू । एको देव परात्परू । जगद्गुरू बहुपराक् ॥१३८॥ भाट जयजयकार करिती । वेत्र पाणी पुढे धावती । अबदागिरी चौर ढाळितीं । श्रीगुरुसी सेवक ॥१३९॥ लक्षावधि जनांचिया मांदी । मिरवणुकींत नाही संधी । झळकताती ध्वजनंदी । मिरवणुकी भीतरी ॥१४०॥ ऐसीं मिरवणूक घनघोर । राजमार्गावरूनि येत शुभ कर । गुरुवालई स्थिरावले सत्वर । आनंदी आनंद पौर जना ॥१४१॥ आचार्य सिंहासनी आरूढती । स्वस्वाधिकारे काणिका देतीं । थोरसान नमस्कार करितीं । आशिष घेती तेधवा ॥१४२॥ मग मूलस्वामी उठोनी । सांगती भक्त वृंदा लागोनी । ऋणमुक्त झालो वचनांतुनीं । श्रीशिवाच्या आज्ञेने ॥१४३॥ आता सर्वाधिकारी त्रिमूर्ति जाण । सांभाळावे गुरुत्व पूर्ण । पंचाचार अष्टावरण । नविसंबावे सर्वदा ॥१४४॥ न्याय नीती धर्माचरण । दीक्षा शिक्षा दंडण खंडण । धर्म नीती सदाचार पूर्ण । वाढवित असावे ॥१४५॥ माझे इति कर्तव्य संपले । आशिर्वाद द्यावे मजसी भले । म्हणोनिया चरणी लागले । मूळ स्वामी श्री गुरुसी ॥१४६॥ त्रिकाल लिंगार्चनी निरत । शिवध्यानी निमग्न सतत । लिंगांग समरसीं आसक्त । झाले चित्त गुरुचे ॥१४७॥ लिंगार्चनी इंद्रिय रंगले । चित्त लिंगध्यानीं स्थिरावले । दोन्ही नयन कवटाळिले । लिंगदेवासी ॥१४८॥ पूज्य पूजक पूजा । भेदभाव नुरला ओजा । लिंगालिंगित विग्रह सहजा । वीर माहेश्वर जाण ॥१४९॥ ऐसी स्थिती गुरुंची भली । लिंगाकार वृत्ति जाहली । बाह्य

प्रपंचाचीं नुरली । आसक्ती ते जाणावे ॥१५०॥ लिंग ध्यानी दृष्टी रमलीं । श्वासोच्छ्वासा स्थिरता आली । निःशब्दाच्या पाहे मेळी । मिळोनि गेले गुरुवर्य ॥१५१॥ आता त्रिमूर्तींचे चरित्र । श्रवण करा श्रोते पवित्र । जगदोद्धारा आले शिवपुत्र । भूलोकासी जाणिजे ॥१५२॥ त्रिकाल शिवार्चनी धुरीण । दासोह चालविती प्रेमाने । शिवानुभव चाले आनंदाने । महामंटपा माझारी ॥१५३॥ देशांत कीर्ती पसरली । जनमनें प्रफुल्लित झाली । रवि उदयीं कमळे विकसली । जनता जनार्दन सरोवरी ॥१५४॥ तैसे सद्भक्त सज्जन । पाहोनि हर्षतीं त्रिमूर्तींना । नित्य येती शिवानुभव श्रवणा । पावन झाला तो प्रांत ॥१५५॥ दुर्गुण दुराचार खंडिले । सद्गुण सदाचार वाढविले । दीक्षा शिक्षादिकं भले । शिवभक्तीसी वाढविती ॥१५६॥ प्रातःकाळीं स्नान करोनी लिंगार्चन करिती सज्जनी । कायकचि कैलास म्हणोनी । सेवा करिती अहर्निशी ॥१५७॥ यजमानासी विचारितीं । कवण काज सांगा म्हणती । देवकार्य समजोनि चित्ती । सेवा करिती सोज्वळ ॥१५८॥ ऐसें कायकाचे महत्व । जाणती सज्जन मुख्य तत्व । तव कायकाचें श्रेष्ठत्व । प्रांता माजी पसरला ॥१५९॥ कायकाचे महत्व ओळखिले । दारिद्र्य दुःख देशोधडी लाविले । त्रिविध दासोह वाढले । प्रांता माजी ते समई ॥१६०॥ त्रिमूर्तींच्या कारण । वाढले वैराग्य भक्ति ज्ञान । घरोघरी शिवलीला श्रवण । सायंकाळी करितातीं ॥१६१॥ जे कां अज्ञानी पाखंड । तयासीं करिती दीक्षादंड । भक्ती मार्गी अखंड । आरूढविती अज्ञाना ॥१६२॥ दुष्ट निग्रह शिष्ट परिपालन । हा संस्थानाचा ब्रीद जाण । परंपरा चालविती शिवगण । सर्वकाळ ॥१६३॥ अष्टावरणाचे महत्व पसरले । पंचाचारासी जन ओळखिले । लिंगांगसमरसी उद्युक्त झाले । षटस्थलाच्या अनुभवे ॥१६४॥ जैसे रवि उदया । दश दिशा उजळती लवलाह्या । तैसे त्रिमुर्तिंचिया । योगे प्रांत उजळला ॥१६५॥ शिवयोगी दर्शन स्पर्शनें । गेले दारिद्र्य दुःख दैन्य । पावन झाले प्रांतींचे जन । सुख संपन्न सर्वदा ॥१६६॥ प्रांती संचरोनी सतत । सुधारणा केली जनतेंत । द्वेष असूयादि समस्त । मावळले त्या प्रांतींचे ॥१६७॥ लोक स्वधर्मे वर्ततीं । स्त्रिया पतिभक्ति जाणती । शिष्यवृंद गुरु सेवा करिती । आळस अभिमान टाकोनी ॥१६८॥ प्रांती शिवभक्ति वाढविले । लोक सदाचारे वर्तु लागले । कायकचि कैलास जाणिले । सर्वत्रानी ॥१६९॥ ऐसे रंभापुरी प्रांत । उद्धार केले जी महंत । आता यौवन प्रांत । ओलांडिते जाहले ॥१७०॥ वृद्धापकाळ जवळी आला । करिती पुढिलिया योजनेला । वटु आणोनी विद्याभ्यासाला । अगत्य करावे म्हणतातीं ॥१७१॥ मग प्रांतातुनी वटु आणून । अभ्यास करविती निक्षून । शिक्षा कल्प व्याकरण । ज्योतिष्य छंद निरुक्त ॥१७२॥ ब्रम्ह विष्णु शैवपुराण । सर्वही अष्टादश पुराण । भारत आणि रामायण । चारी वेद मुखोद्गत ॥१७३॥ रघुवंशादि पंच काव्य । कन्नड तेलगु तमिळ काव्य । तैसेचि शिवानुभव शास्त्र दिव्य । अभ्यासिले सर्वही ॥१७४॥ एवं सकल

विद्यामंडित । संगीत साहित्य कला प्रपूरित । वटूना पाहोनि सद्भक्त । हरिखले अत्यंत ते समई ॥१७५॥ तव अभ्याचार माहेश्वर दीक्षा । केले वटूना स्वधर्म शिक्षा । नीति क्रिया ब्रम्हचर्याची उपेक्षा । कदापिही न करावे ॥१७६॥ त्रिकाळ लिंगार्चना करावे । लिंगांग सामरस्या जाणावे । स्वकीलासी अनुभवावे । स्वहिता कारणे ॥१७७॥ करण हसिगे मंत्र गौप्य । मिश्रार्पण अमूप । अनुभव शास्त्राचा खूप । अभ्यास करविले अहर्निशी ॥१७८॥ ऐसे शिवयोग सद्विद्या । अभ्यास करविले ह्या । अष्टोत्तर शतोपनिषद विद्या । सार सर्वस्व महा वाक्य ॥१७९॥ ऐसे सकल कला प्रवीण । केले स्वामी शिष्या लागुन । कां सुर गुरूच आले मर्त्यां लागून । ऐसा भास होतसे ॥१८०॥ तव भव्य सभा भरवुनी । सद्भक्त जना आमंत्रोनी । परीक्षा घेतली वटू कडोनी । सकळां समक्ष ॥१८१॥ पाहोनिया वटूना । आनंद झाले सद्भक्त जना । सद्गुरूनी धन्य केले जाणा । पुढिलिया पिढीसी ॥१८२॥ आता आमुचे अधिकार । वटूना समर्पण करणार । पुढे सिंहासनाचे कर्तार । तेची राहतील ॥१८३॥ आम्हा लागी ईशाज्ञा । झालीसे प्राज्ञा । देश संचरोनी शिवाज्ञा । पूर्ण करावे लागेल ॥१८४॥ म्हणोनि संचारा निघाले । शरणांगता उपदेशू लागले । पतितांसी उद्धरिले । शिव दीक्षा प्रभावे ॥१८५॥ भक्त लीलामृत पाजवोनी । भवरोग निरसिले शिवगणी । शिवभक्तांची सेवा स्वीकारोनी । पावन केले पतितांसी ॥१८६॥ ऐसे देश संचार करितीं । उळवी गोकर्ण सिद्धगिरी प्रती । कप्पडी सोंडूर षणमुखा निश्चिती । पाहोनी हर्षतो मनांत ॥१८७॥ अमरगंड पंपा विरूपाक्ष । श्री शैल काशी केदार विशेष । नाशीक त्र्यंबकेश । ब्रम्हगिरी प्रसिद्ध ॥१८८॥ परळी वैद्यनाथ ओंकार ममलेश । सौराष्ट्र सोमेश वेरूळ घृष्णेश । औंढ नागनाथ स्वप्रकाश । वहीं जगन्नाथ पूर्व दिशे ॥१८९॥ ऐसे तीर्थ यात्रा करिती । स्नाने तीर्थ पावन होती । लिंगार्चन करोनि सुस्थिति । जंगमार्चना उरकिती ॥१९०॥ पवित्र क्षेत्री अन्नदान करोनी । अंध पंगु दुबळया लागोनी । यथेष्ट मिष्टान्ने तृप्त करोनीं । पुढलिया क्षेत्रा जातातीं ॥१९१॥ ऐसा चाल-वीत नित्य नेम । जंगमार्चनी नूतन प्रेम । पुढे निडुमामिडी ग्राम । लक्षुनिया जातातीं ॥१९२॥ कांहीं दिवस लिंगार्चनी । मग्न राहिले त्रिवर्गांनी । तव सद्भक्त मंडळी येवोनी । साष्टांगेसी विनविती ॥१९३॥ म्हणतीं करिबसव महास्वामी । इथेची असावे सद्भक्त प्रेमी । स्थान मान सर्व आम्ही । करोनिया देतसो ॥१९४॥ तथास्तु म्हणोनि सर्वत्र । करिबसव स्वामींना मात्र । राहुनिया निडुमामिडी क्षेत्र । पावन कीजे म्हणतातीं ॥१९५॥ मठमान इनाम बहुमान । लग्न मुहूर्तीं अग्रमान । साडे तीन मूहूर्ता माजी जाण । प्रथम मान स्वामींचा ॥१९६॥ सर्वस्वी अधिकारी । स्वामीच आमुचे निर्धारीं । समस्त महाजन सर्वतोपरी । अज्ञा शिरी वंदिती ॥१९७॥ स्वामींचे लिंग पूजन । तापत्रयाग्नीस शमन । ब्रम्हराक्षस पिशाच्च जाण । तत्काळ जाती पळोनीं ॥१९८॥ तया निडुमामिडी लागीं । क्षेत्र रूप

आले वेगीं । बहुत सद्भक्त दर्शनालागीं । परस्थळीचे येतातीं ॥१९९॥ सदैव चाले जंगमार्चन । सायंकाळी शिवकथा श्रवण । कृषि व्यवहारी सेवक जन । आपुले परी जाग्रत ॥२००॥ प्रातःकाळी उठती । शौच मुखमार्जन सारितीं । प्रातः स्नाने करोनि निगुती । असती लिंगार्चनी सादर ॥२०१॥ तैसेचि जाणा अबला । पतिच्या पूर्वी उठती सबला । शौच मुखमार्जन षटस्म्मार्जनाला । सूर्योदयापूर्वी करितातीं ॥२०२॥ प्रातः स्नाने करोनी । भाळी त्रिपुंड्र कुंकुम लाउनी । लिंग पूजा करोनी । ग्रहकार्यासी दक्ष असती ॥२०३॥ पति सेवेंत सादर । गुरुलिंग जंगमी प्रेमादर । प्रपंच परमार्थ सुकर । झाले तया भक्तांचे ॥२०४॥ सति पतींचा एक देव । सति पतींचा एक भाव । सति पतींचा एक जीव । धड मात्र वेगळे ॥२०५॥ ऐसा जयांचा संसार । तिही केला जन्माचा उद्धार । प्रपंच तयांचा समग्र । शिव प्रपंच झालासे ॥२०६॥ निडुमामिडीचा केला उद्धार । शिव दीक्षे सकळ जन पवित्र । झाले शिवभक्तीं माजीं तत्पर । सद्भक्त जन ॥२०७॥ नागलिंग आणि विरूपाक्ष । आज्ञा मागती करिबसव स्वामीस । आम्ही जाऊ संचारास । भेटींची आस कैलासी ॥२०८॥ करिबसवांची आज्ञा घेवोनीं । चालिले नागलिंग विरुपाक्षानी । संचार करिती अवनी । भक्तोद्धारा कारणे ॥२०९॥ मानूर नामे ग्रामा प्रती । येते झाले उभय मूर्ती । पाहताची सद्भक्ती । साष्टांगेसी नमितातीं ॥२१०॥ कुठोनिया आगमन । केलेती जी स्वामीन । आलो शिवाज्ञेकडून । भूलोकी ॥२११॥ आता पुढे कवण स्थान । ते परशिवचि जाणे । येणे जाणे राहणे । सर्व कांहीं लिंग भोग ॥२१२॥ ऐसे ऐकोनिया भक्त वृंद । पूर्णानुभवी शिवयोगी स्वच्छंद । निरसिले जे विषयानंद । सदानंद लिंगानंदी ॥२१३॥ यया समान जगतीं । कुणी नाही दिसती । कामधेनु आली निगुती । रंका घरा ॥२१४॥ भवारण्यीं भ्रमलो श्रमलो । पायातळी कूप दाखविलो । आम्ही तैसे पावलो । गुरुदेवासी ॥२१५॥ तव पत्र पुष्प फल कर्पूर । आणोनि पदी अर्पिती शीघ्र । साष्टांग प्रणामे झरझर । सद्भक्तानी घालिती ॥२१६॥ आम्हा पतितांच्या उद्धारा । कारणे आलो आमुच्या पुरा । जगद्वंद्या गुरुवरा । कृपासागरा दयाळुवा ॥२१७॥ आमुचे जन्म सार्थ झाले । घरा आलें जगदाराध्यांची पाउले । आता ना भवभय उरले । म्हणोनि चित्ती हर्षतीं ॥२१८॥ चिंतींतासी चिंतामणी । दारिद्र्या मिळे परिसमणी । मरतिया मुखीं अमृतबिंदु झणी । कुणी आणोनि घातले ॥२१९॥ तैसे झाले जी गुरुराय । उद्धरा उद्धरा हो बापमाय । धन्य आले जी तुमचे पाय । आळशावरी गंगोदक ॥२२०॥ म्हणोनि सर्वत्री वंदिले । आशिर्वाद श्रींचे घेतले । आता चलू गुरु माउले । आपुल्या गृहा ॥२२१॥ तंव सद्भक्त गुरुवर्यांना । घेवोनि जाती आपुल्या सदना । शिवपूजेचें परिकर जाणा । सिद्ध करिती तेधवा ॥२२२॥ लिंगार्चनादि उरकिलें पादोदक प्रसाद सेविलें । वामकुक्षी लोळलें । आनंदानें गुरूनी ॥२२३॥ तव ग्रामींचें भक्त महेश्वर । येवोनि प्रार्थिती सादर । म्हणती स्वामी

यया ग्रामी थोर । ब्रम्हराक्षस राहतसे ॥२२४॥ तया स्थाना जे गेले । तयांची ना धडगत भले । आयुष्य त्यांचें संपले । ऐसे खास जाणावे ॥२२५॥ ऐसिया उपद्रवा पासोन । मुक्त करावे मानूरा लागोन । म्हणोनिया सद्भक्त जन । लागती चरणी यतींच्या ॥२२६॥ मग नागलिंग स्वामी म्हणती । ब्रम्हपिशाच्चाचे स्थान निश्चिती । दाखवावे आम्हा प्रती । पाहू त्याचा पराक्रम ॥२२७॥ जया दिशेंत वसे ब्रम्हराक्षस । गांवचि लोटले स्वामी सहित । येई रे म्हणती ब्रम्हपिशाच्चा प्रत । नागलिंग गुरुवर्य ॥२२८॥ मग तो येऊनि पायावर । गडबड लोळे निर्धार । स्वामी म्हणती सत्वर । तया पिशाच्चा प्रती ॥२२९॥ यया मानूरांत त्वां राहू नये । दूर अरण्यी वसावे । तव शपथ घालिती गुरुवर्य । नागलिंगे पिशाच्चा ॥२३०॥ श्रींची आज्ञा शिरी वंदोनी । लोळण घेतसे श्री गुरु चरणी । अपराधी अपराधी म्हणोनी । अरण्यासी जातसे ॥२३१॥ नागरीक ते पाहोनी । आश्चर्य करिती मनी । स्वामींचीं सामान्य करणी । नव्हे नव्हे सर्वथा ॥२३२॥ आमुचे दुःख लया गेले । मानूरासी सुखी केले । आता स्वामी राहिले । पाहींजे की मानूरी ॥२३३॥ स्वतंत्र मठ संस्था । स्वामी लागी देऊ आता । ऐसी मूर्ती न मिळे सर्वथा । देशभरी फिरलिया ॥२३४॥ स्वामींचीं असे अमानुष करणी । पर शिवचि अवतरले धरणी । पतितांच्या उद्धारा लागोनी । आले दयाळु गुरुवर्य ॥२३५॥ म्हणोनिया सर्वत्र जनी । लोटांगणे घालिती चरणी । स्थिर व्हावे इथे स्थानी । मानूरा लागोनी उद्धारा ॥२३६॥ ऐसे स्वामीसी विनविती । स्वामीनी तव अभय देतीं । महागणाराधनेची निश्चितीं । करितीं तेव्हा सद्भक्त ॥२३७॥ गणाराधना यथा सांग । करिती तेंव्हा भक्त वृंद । अंध पंगु दुबळे चांग । तृप्त होती जेवोनी ॥२३८॥ दान धर्म अमित करिती । स्वामीना सर्वाधिकार देती । जयजयकारे गर्जती । सद्‌गुण गाती स्वामींचे ॥२३९॥ मग विरूपाक्ष स्वामी । आज्ञा घेती भक्त जन प्रेमी । स्वामी नागलिंगा लागोनी । आशिर्वाद देताती ॥२४०॥ आम्ही पुढे संचार करू । आपण इथेची व्हावे सुस्थिरू । ऐसे सांगोनि गुरूवरू । विरूपाक्षानी निर्गमती ॥२४१॥ नागलिंगा आशिर्वाद देउनी । चालिले विरूपाक्ष संचारा लागुनी । प्रांत महाराष्ट्र देखुनी । कर्नाटक सीमे येताती ॥२४२॥ द्रोणापुर नामे गांव । उत्तर दिशेस घोरारण्य ठाव । निरामय पाहोनि गुरुदेव । वास्तव्य तेथे करिताती ॥२४३॥ तया घोरारण्यी जाणा । क्रूर पशूंचा असे ठाणा । झुळझुळ पाळयांचा झरा मना । संतोषवितो तापसिया ॥२४४॥ तेथेचि लिंगार्चना सारोन । फलहारी होतसाति जाण । आनंदे लिंग ध्यानी तल्लीन । होऊनि राहिले ॥२४५॥ ऐशा घोरारण्यांत । गुरुदेव रहिवास केले सतत । एकदा एरंडळापुरवर योगी महंत । पोडविडिसूत्र मठाचे ॥२४६॥ नाम चन्नमल्ल देशिकेंद्र । आले पत्र पुष्पास योगीन्द्र । गुरु विरूपाक्ष गणेंद्र । जया स्थानी स्थिर होते ॥२४७॥ तया स्थानी सम्यक । आले चन्नमल्ल देशिक । पाहोनि विरूपाक्षांचे मुख । साष्टांगेसी नमिताती ॥२४८॥

कोठोनी झालेजी आगमन । दीनाश्रुत कीजें स्वामीन । योगियांचे दर्शन पावन । आजि आम्हासी लाभले ॥२४९॥ स्वामीनी आद्यंत निरूपिले । ऐकोनि चन्नमल्ल हर्षले । सद्गुरूंची आले पाउले । उद्धाराया पामरा ॥२५०॥ म्हणोनिया अत्यानंदे । दर्शना येती नित्य स्वच्छंदे । नित्य नेमे लागला छंद । चन्नमल्ल स्वामीसी ॥२५१॥ हे श्रीमद्रंभापुरी । वीरसिंहासनाची थोरीं । श्री गुरु रेवणसिद्धाची खरीं राजधानी असे की ॥२५२॥ तयांच्या पदकमली जाण । मधुकर क्रिया ज्ञान संपन्न । सकल शास्त्र कलापूर्ण । पीठाधीपतीं अलदीचे ॥२५३॥ हिरे मठ सरगणाचार्य । गुरु महंतेश पट्टचरवर्य । वैधव्य हर एरंडळा पुरवर्य । पादुका स्वामी चरित्र ॥२५४॥ कन्नड षटपदी रचिले । तेचि मराठी ओवीबद्ध केले । हावगी स्वामीची वदविले । बसवलिंग मुखेंनी ॥२५५॥ श्री गुरु हावगिलिंग लीलामृत । श्रवणे प्राशन करोनि सद्भक्त । होताल जन्ममरणाविरहित । बसवलिंग विनवित भालगुरीचा ॥२५६॥ इतिश्री हावगिलिंग लीलामृते । त्रिमूर्त्यंवतरणं नाम द्वितीयोध्याय गोड: ।

॥ श्री गुरु हावगिलिंगार्पणमस्तु ॥



श्री गरु विरूपाक्ष लिंगायनमः । श्री गुरु हावगिलिंगायनमः । श्री गुरु बसवलिंगायनमः ।

॥ आर्या ॥ श्री गुरु विरुपाक्षानी आशिष देउनि स्वकीय शिष्याला । निरवय झाले पुढती बसवलिंग यति महापुरुष आला ॥१॥ ॐ नमोजी गुरुवर्या । ॐ नमोजी जगदाचार्या । ॐ नमोजी देशी धैर्या । बुडंतिया भवडोही ॥२॥ जो का देवादिकांचा देव । सर्व श्रेष्ठ गुरुराव । श्रेष्ठपणाचा ठाव । दुजिया कुठोनी ॥३॥ म्हणती गुरु थोर की देव थोर । हा न्याय पडला घनघोर । तया श्रुतीलाही पार । न कळे गुरूचा ॥४॥ तरीं पामरे कैसे जाणती । गुरुवर्याची अगणित महती । जैसे दिवा भीतासी । रवि किरणें अगोचर ॥५॥ गरू वीणचि मी तरेन । मज देवाचा अभय जाण । तरी देवही मानव होउनी । गुरु चरण सेविती ॥६॥ तरी मानवी गुरु भजन । त्यागिल्या सद्‌गती कैसेंन । हे तो न घडे कवणाचेन । मोक्ष साधन द्यावया ॥७॥ मोक्षाचा अधिकारी ब्रम्हा नाही । मोक्षाचा अधिकारी विष्णु नाही । मोक्षाचा अधिकारी रुद्र नाही । तिही लोका माझारी ॥८॥ मोक्षाचा अधिकारी तोचि जाणा । शिव दीक्षा संपन्न करी शरणांगताना । जो लिंगांग सामरस्य विधाना । बोधकरी ॥९॥ साही स्थलाचा झाडा । करी अजपाजपाचा निवाडा । महालिंग दर्शनाचा मार्ग रोकडा । दावींतसे शरणांगता ॥१०॥ ऐसे त्रिलिंग षडलिंग । नवलिंग एकोत्तर शतलिंग । षोडषाधिक द्विशतलिंग । सर्वांग लिंग घडवी शिष्या ॥११॥ ऐसिया गुरु माउली वांचोनीं । देवपणा कैंचे देवा लागुनी । सकळ श्रुति स्मृतींची वाणी । गुरु अग्रणी सकळांचा ॥१२॥ उपायन करी घेईजे । गुरु ब्रम्ह विदा शरण जाइजे । मोक्ष साम्राज्य लाहिजे । मुमुक्षूनी अविलंबे ॥१३॥ गुरु देवा हावगिलिंगा । निर्बुद्धासी सुबुद्धि देगा । गाईन तव लीला अभंगा । सर्वकाळ ॥१४॥ आता श्रोतीं दींजे अवधान । तृतीय अध्यायी विवरण । विरुपाक्ष गुरू अंतर्धान । पावतातीं भक्त मुडी ॥१५॥ एरंडळापुरीचे चन्नमल्लार्य । विरूपाक्ष देवासी कल्पोनि आचार्य । आता शरण जाऊ गुरूवर्य । विरूपाक्षा प्रती ॥१६॥ म्हणोनि फल पुष्प दक्षिणा । घेवोनि आले तया अरण्या । जेथे विरूपाक्षाचार्य जाणा । शिवध्यानी बैसले ॥१७॥ श्री गुरूंच्या संनिध येऊन । केले साष्टांग नमन । बद्धांजली कर जोडून । दंडवत पडियेले ॥१८॥ जयजयाजी करूणा समुद्रा । जयजयाजी सद्‌गुण सांद्रा । जयजयाजी शिवगणेंद्रा । उद्धार करा पामरा ॥१९॥ मी तो अज्ञान मतिमंद । मज नसे ठावे सद्‌बोध । आता उपदेश देवोनि शुद्ध । कीजे गुरूवर्या दीनासी ॥२०॥ मी तो भवरोगे पीडिलो । संसार कर्दमी फसलो । षडरिपूनी गांजलो । बुडतो आहे भवडोहीं ॥२१॥ तरी तूं दीनदयाळ । भवरोग वैद्य अति कृपाळ । कर्दमांतुनी काढी रे कनुवाळ । शत्रूंचेनि सोडवी ॥२२॥ ऐसी ऐकोनि करूणा वचन । अभय दिले चन्नमल्ला लागुन । येई बाळा तापत्रयांतुन । अभयकर तुज असे ॥२३॥ ऐसे बोलोनि

गुरुराय । जवळी बैसविती निर्माय । चन्नमल्लासी आले धैर्य । जन्म सार्थ झाले म्हणे ॥२४॥ गुरुचरणाचें करोनि पूजन । पत्र पुष्प धूप दीप जाण । फल कर्पूरादी करूनि अर्पण । नमन करी गुरुवर्या ॥२५॥ परम पावन चरणोदक । लिंग मज्जन पूर्वक । सद्गुरुनाथ सेविती देख । अत्यादरे करोनी ॥२६॥ उपरी स्वीकारिती चन्नमल्लेश । विभुक्त लिंगार्पित करोनि शेष । स्वीकारोनि अशेष । जन्ममरणा खंडिले ॥२७॥ तनुमनधन । श्री गुरूसी केले अर्पण । मागे उरले कवण । सांग बारे चन्नमल्ला ॥२८॥ अंगलिंगासी अर्पिले । तयासी कायार्पण म्हणितले । पंचेंद्रिय विषय भले । पंचलिंगा अर्पण ॥२९॥ सर्वेंद्रियांची तृप्ति । महालिंगी अनुभवा येती । तयासीच भावार्पण म्हणती । शिवानुभवी ॥३०॥ कायेचे सुख दुःख । लिंगार्पित करी देख । परस्पर इंद्रियाचे सौख्य । लिंगार्पित करावे ॥३१॥ एवं त्रिकरणांचा सुख दुःख । महालिंगा पावे देख । हे अनुसंधान मनःपूर्वक । अनुभव शास्त्रे जाण तू ॥३२॥ इष्टलिंग कर कमळी । प्राणलिंग हृदयांतराळी । इष्ट प्राण भावलिंग मेळी । मिळती जाण बाबारे ॥३३॥ ऐशा परी लिंगी दृष्टी । स्थिर कीजे सृष्टी । मग भावना ते गोमटी । आलिंगील लिंगासी ॥३४॥ जैसे जळी जळ मिळावे । कीं समुद्री लवण विरावे । ज्योती ज्योत सामावे । ऐक्य रूपे ॥३५॥ तैसे लिंगा अंगा । अभेद दृष्टींने पहावेगा मग सर्वांगचि लिंगा । साहित्य होय ॥३६॥ अष्टावरणाच्या संरक्षणे । तोडी भवपाशाची बंधने । मग कर्माची इंधने । ज्ञानाग्नीने दग्ध करी ॥३७॥ ऐसे अंतरंगी बहिरंगी । होआवे इष्टलिंग संगी । मग लिंग भोगोपभोगी । होवोनिया रहावे ॥३८॥ अंग भोग अनर्पित । लिंग भोग शिवार्पित । स्वेच्छेने जे अपेक्षित । अनर्पित जाणावे ॥३९॥ आपण होवोनि प्राप्त होय । ते लिंग भोग जाणावें । बळेचि ओढूनि घ्यावें । ते अंगभोग जाणिजे ॥४०॥ केवल अनासक्त होउनी । पूजिजे इष्टलिंगा लागुनी । बाह्य क्रिया संकुळ त्यागुनी । लिंग ध्यानी वीरशैव ॥४१॥ म्हणोनि एका जन्मी मुक्ती । वीरशैवां होय प्राप्ती । इतर शैवां संप्राप्ती । मुक्तिर्जन्म त्रयेण ते ॥४२॥ ऐसे शिवराये बोधिले । सर्वमंगळेसी भले । नवलिंगाची सकीले । एकोत्तर शत स्थले सहीत ॥४३॥ क्रिया ज्ञान संपूर्ण । केले चन्नमल्ला लागुन । कृतकृत्य झालोजी म्हणुन । साष्टांगेसी नमियले ॥४४॥ जग हे सर्व लिंगमय । लिंगामाजी होय जाय । लिंगा विरहित अनुभवावे । तरि दुजे नसेकी ॥४५॥ ऐसे झाले पूर्ण काम । चन्नमल्ल देशिकोत्तम । आधीच बावन्नाचे सुवर्ण । वरि कोंदण बसविलें । धन्य धन्य गुरुराया । पालटविली त्रिविध काया । सर्वांग लिंग समुदाया । शृंगारिले की पतितासी ॥४७॥ म्हणोनिया पुढत पुढती । साष्टांग प्रणिपात करिती । गुरुवर्य अभय देती चन्नमल्ला लागुनी ॥४८॥ ऐसे गुरु कृपा संपादोनी । राहिले गुरु सेवेंत निशि दिनी । आता पुढिलिया कथेलागुनी श्रोती अवधान देइजे ॥४९॥ कथा कल्पतरु निशिदिनी । भोग मोक्षा देतसे झणी । शिवयोगी चरित्र

चिंतामणी । चिंतितार्थं पुरवीतसे ॥५०॥ भालपुर नामे गांव । तयासीचि म्हणती हणेगाव । शिवशास्त्रांचा अनुभव । जाणते पंडित असताती ॥५१॥ मंडलापुरे नामे शिवभक्त । तया ग्रामी वास करित । बसप्पा नीलम्मा दंपती प्रशस्त । जंगम प्राणी असताती ॥५२॥ तया दंपतींच्या गर्भकमळी । उदेलासे विधुमौळी । माता पितया तयें वेळी । अत्यानंद जाहला ॥५३॥ बहुता दिसी गुरुलिंगजंगमे । कृपा केली म्हणती निःसींम । म्हणोनि लाधलो अनुपम । सत्पुत्रासी इहलोकी ॥५४॥ तव जात कर्म लिंगधारण । करिती गुरु जंगमा आमंत्रुन पांचविसी पूजुन । द्वादशदिनीं पाळणा ॥५५॥ घालोनी तया शिशूप्रती । माळप्पा ऐसे नाम ठेविती । वाढतसे दिवस निशी । पूर्ण चंद्रा परी तो ॥५६॥ अष्टवर्षी दीक्षा केले । परी विद्या नाहीं शिकविले । गुराखीच केले । माळप्पासी पितयानी ॥५७॥ नित्य गुरे घेऊनि जायी । कुरणामाजी तया चारवी । तृप्त होऊनि बसता पाही । तयां सवें खेळत ॥५८॥ ऐसे असता एके दिनी । गुरे चरतीं तया कुरणी । माळप्पा वृक्षा तळी जाउनीं । झोंपलासे नावेक ॥५९॥ तव स्वप्नी देखे यतींद्रा । जैंसे चकोर पाहे पूर्ण चंद्रा । तव खडबडोनि उठला तंद्रा निद्रा गेली समूळ ॥६०॥ तव इकडे तिकडे पाही । गुरा वांचुनी कुणीच नाही । कैसी स्वप्नाची घाई । झाली मजसी म्हणे तो ॥६१॥ ते रूप नयनी भरले । उघडितां झांकिता दिसे भले । आता शोधोनिया वहिले । भेट घेऊ म्हणतसे ॥६२॥ कधींच नव्हते वनी मार्ग । आजि कैसे दिसतसे सुभग । ते मार्ग लक्षुनी लागवेग । आला जाण भक्त मुडी ॥६३॥ तेथ येऊनि जंव पाहे । स्वप्नीची मूर्ती साक्षात आहे । हर्षोनिया लवलाहे । नमस्कार घालितो ॥६४॥ गुरुवर्या स्वप्नामाजी । देखिलों चरण कमळे आजी । दीनाचे जन्म सार्थ केलाजी । धन्य धन्य गुरुदेवा ॥६५॥ बहुता जन्माच्या सुकृतेन । घडे शिवयोगियांचे दर्शन । पाप तापादिक दैन्य । राहील कासया पूर्वार्जित ॥६६॥ तया किशोरचंद्रा पाहुनीं । गुरुदेवे जवळी बोलाउनी । मुख मुद्रादि देखुनो । सहर्ष अभय देताती ॥६७॥ हा असे सुकृतांचा पुंज । आम्हासी लाभला सहज । प्रसाद देउनी पाठविती गुरुराज । माळप्पासी भालपुरा ॥६८॥ गुरु आज्ञा शिरी वंदुनी । आलासे गुरांच्या स्थानी । सायंकाळी गुरे घेंउनी । गृहाप्रती येंतसे ॥६९॥ नित्य गुरे घेऊनि जाई । अरण्यी तयां सोडोनि पाही । इंधन भारा घेवोनि येई । गुरु स्थानी सत्वर ॥७०॥ तेथेंचि एक अग्निकुंड । केलासे माळप्पा अखंड । रात्रंदिन प्रचंड । धगधगा जळतसें ॥७१॥ कायसे रे माळप्पा । उद्योग निन्नदु हेळप्पा । इंतप्प श्रम निनगेकप्पा । नित्यनेमवे माडिदे ॥७२॥ कायव कंदिदरे नय्या । कायव मिचिंदरे नागुवदय्या । गुरुराया निमगोलिद काया । यल्लिद्दरेनय्या यंतादरेनय्या ॥७३॥ ऐसे वीर वैराग्ये वर्तत । नाहि भूकतहानेची भ्रांत । तैसाचि नेमे इंधने आणित । राहिलासे माळप्पा ॥७४॥ इकडे सिंहावलोकनीं । परिसिजेती श्रोतयानी । एरंडळापुरी चन्नमल्ल देशिकानी । भिक्षेसीं निघती नित्यनेमे ॥७५॥

मुखे वदे गुरु नामाक्षर । नासाग्री दृष्टी ठेवोनि स्थिर । शब्द टाकिती गंभीर । गुरुधर्म स्वयंपाक भिक्षेचा ॥७६॥ ऐसे दारीं शब्द टाकुनी । क्षणभरी उभे राहुनी । आलिया भिक्षा घेउनी । पुढिलिया गृहा जाताती ॥७७॥ शब्दा सरसी भिक्षा येइजे । तरीच भिक्षा घेइजे । ऐसी भिक्षेची रीत सहज । वीर माहेश्वरांची ॥७८॥ ऐसे चन्नमल्ले निश्चिती । शब्द टाकिती एका गृहापुढती । यजमान लिंगैक्य झाले निगुती । सती खंती करीतसे ॥७९॥ पंच पंच उषःकाल । शब्द ऐके पतिव्रता वेल्हाळ । करी भिक्षा घेवोनि तत्काळ । पीठ वाढोनि नमन करी ॥८०॥ स्वामीनी आशिर्वादिले । सौभाग्यवती होई माउले । तव म्लान वदने सती बोले । स्वामी दिले आशिर्वाद ॥८१॥ आता कैंचे सौभाग्य । मृत्यूने नेले माझे भाग्य । स्वामी झाले मी दुर्भंग । कपाळ करंटे झालेसे ॥८२॥ गुरुमाय कोपलिया जाण । हर करीना रक्षण । हर कोपलिया तत्क्षण । गुरु रक्षण करीतसे ॥८३॥ नगुरो रधिक म्हणोनी । साक्ष देताती श्रुतीनी । तरी गुरु वाक्य ओखटे जनी । आश्चय अवनी होईल ॥८४॥ मत्पति प्राण मीनोदक । काळ वडवानळ शोषिला देख । मत्पति जीवन धन विशेष । काळ चोरे नेलासे ॥८५॥ माझ्या सौभाग्याचा मळवट । पुसिला काळे अवचट । माझे जिणे खटनट । झाले पाहे गुरुवर्या ॥८६॥ देवीने तप केले । मदनासी मृत्यु आले । तव देवीते स्तवन केले । रती जाण तेधवा ॥८७॥ माये तुमचिया कारणे । ओढवले वैधव्य अवचितपणे । सर्व मंगळे तुझियाविणे । गती नोहे मज लागी ॥८८॥ जगन्मातेसी आश्चर्य झाले । मदनावरी अग्नी पाखडलें । पाप रतीसी वैधव्य आलें । हे तो विपरीत नव्हे कां ॥८९॥ थोरांसी झुंजणे । तरी सर्वस्वी नाश पावणे । शंकरा अमर केले विषाने । अमृते राहूसी दुर्भंगिले ॥९०॥ देवी म्हणे रती प्रती । त्वां निश्चिंत असावे चित्ती । धूर्जटी कैलासा गेले ती । विचार करू तयांचा ॥९१॥ मग देवी घोर तप करी । पाहण्या आले त्रिपुरारी । योग दंड घेवोनि करी । देवी समीप आलासे ॥९२॥ सख्या सेवेंत होती । तयांसी म्हणे योगी निश्चिती । पाण्या वीण कर्दळी शुष्क होती । तैसी गती उमेची ॥९३॥ कां हो करितीं ऐसे कष्ट । तपे तारुण्य झाले नष्ट । सुख सौभाग्य त्यागोनि श्रेष्ठ । करिती कष्ट कासया ॥९४॥ बाल योगीश्वरां प्रती । जयविजय सख्या बोलती । वरिजे मृत्युंजया प्रती । मनोगत देवींचा ॥९५॥ छीः कैंचा तो मृत्युंजय । परदेशी बाप ना माय । ऐसा असोनि महानिर्दय । बापुडया मदनासी जाळिला ॥९६॥ स्वसुखाची नाही आस । पर दुःखाची नाही खंत । सदा सर्वदा स्मशानांत । महा एकांत सेवितो ॥९७॥ एक तरी वयोवृद्ध । आणीक म्हणती तपोवृद्ध । तैसेची ज्ञान वृद्ध । महाक्रुद्ध विष भक्षी ॥९८॥ वस्त्रेना अलंकार । चर्म हाडांचा श्रंगार । वाहन जयाचा ढोर । अंगी विखार आश्रयिले ॥९९॥ कवण सांगितले तयाचे खबर । तपे शोषिले शरीर । तारुण्य जाळिले परिकर । पिशाच्चाच्या नादाने ॥१००॥ ऐसे निंदा व्याज ऐकोनी । नयन उघडिले देवीनी ।

म्हणे ढोंगी खळा अज्ञानीं । त्रिशूळपाणी निंदिसी ।।१०१।। चल जा निघ इथून । बोलू नको शब्द आन । तुज रुचेना शिव भजन । निंदका कवण बलाविले ।।२।। देवीचे नेत्र आरक्त झाले । घुडघुडोनि जव बोले । भर्गो देव गार झाले । जागच्या जागी ।।३।। मग पंच वदन दशभुज । व्याघ्रांबर ओढला सहज । जयाचा भाव न कळे अज । हरि इंद्रासी त्रिकाळो ।।४।। तव देवी प्रती म्हणे मखारी । तुझी भक्ति निष्ठा खरी । इच्छित मागे त्रिपुर सुंदरी । झालो प्रसन्न तुज लागीं ।।५।। सहर्षे देवी प्रणिपात करी । प्रथम उठविजे मदना मदनारी । रतीचे अमांगल्य दूरी । कीजे कालारी ये समई ।।६।। अस्तु म्हणोनि पुरारी । येई रे मदना झडकरी । धांवत येउनी ते अवसरी । पुरारीसी नमियेला ।।७।। थरथरां कांपे मन्मथ । कालांतक अभय देत । पुढे तुम्ही गुप्त । जीवामाजी वावरा ।।८।। मग देवीचा विवाह झाला । तेंसे माझिया वैधव्याला । परि हाराच्या समयाला । सद्गुरु चरण गृहा आले ।।९।। बसव पुराणी ऐकिले । मुसुडी चौडय्या भले । कल्याणी अद्भुत वर्तले । पुष्प वाटिके जाताना ।।१०।। तव एक तरुणी आली । येऊनि चौडय्यासी नमिली । शरणांची वाणी वदली । चिरायू होई म्हणोनी ।।११।। तरुणी गेली गृहाप्रती । चौडय्या आशिर्वादिलेती । म्हणोनि सांगे, पितया निगुती । सुकन्येने तेधवां ।।१२।। दिवस गेला रात्र आली । काईसे रोगाने विव्हळली । उदया पूर्वीच मृत झाली । ताते पाहिली कन्येते ।।१३।। कैसे दुर्दैव ओढवले । आकस्मिक मृत्यु आले । हातो हाती नेले । दुष्ट काळे मम कन्या ।।१४।। शिव शरणांची वाणी । अभद्र झाली ये क्षणी । म्हणोनिया प्रेता लागोनी । आणिले सदनी चौडयांच्या ।।१५।। कायसे आशिर्वचन बोलता । मागे पुढे न विचारिता । दीर्घायू जावोनी तत्वता । मृत्यू ओढवले कन्येसी ।।१६।। किमर्थ ऐसे बोलसी । प्रेत कां इथे आणिलासी । काल दिलो आपण आशिर्वादासी । उदयापूर्वी झाली मृत ।।१७।। तरी कृपाळू शिव शरण । मज एकुलती कन्या जाण । लोकीं माझें जिणे । व्यथ झाले स्वामिया ।।१८।। तव चौडय्या विस्मित झाले । अरे कां हे अपमृत्यु ओढवले । तव कृपा हस्ते विभूति लाविले । मुखी घातले कन्येच्या ।।१९।। तव हुंकारे नेत्र उघडिली । माय बापासी पुनः जन्मली । ऐसी अघटित करणी केली । चौडय्याने कल्याणी ।।२०।। तैसे माझे सुदैव । गृहा आले गुरुदेव । आतां माझे वैधव्य । कैसे राहील ये क्षणी ।।२१।। ऐसे कैसे वदसी माये । हा निजेला आहे पाहे । म्हणोनिया गुरुदेवे । अंतर्गृही जाताती ।।२२।। येळु येळेले मंदा । उदय दोळु मलगुवदेनु अंदा । विभूती लाविती सर्वांगा । मुखी धूळोदक घातिले ।।२३।। तव डोळे उघडोनि पाहे । संमुख असतो गुरुमाय । उठोनिया धरिला पाय । अश्रु धारे स्नापिला ।।२४।। मज मृत्यु मुखांतुनी । ओढोनि काढिले गुरुवर्यांनी । गुरुराया तुमचेनी । पुनर्जन्मा लाधलो ।।२५।। सतीसी झाला अत्यानंद । मांगल्यदानी गुरु सच्चिदानंद । अघटित केलाजो आनंद कंद । महिमा अगाध चरणाची ।।२६।। आता माय बाप बांधव ।

तुम्हाविणें नाही गुरुदेव । पादुका झालो तरी उतराव । जन्मोजन्मी नोहे की ।।१२७।। अघटित घटना समर्थं । लोकोद्धार मूर्ती । संशय किमर्थं । म्हणोनि सतिपति नानार्थें । वर्णिताती गुरुराया ।।२८।। मम सौभाग्यो दधि चंद्रा । मत्सौभाग्य देवतरु सांद्रा । मम दौर्भाग्य दारिद्रा । कामधेनू आलासी ।।२९।। तुझेनि सौभाग्य उदय झाले । तुझेनि सुमंगला म्हणविले । तुझेनि मांगल्य स्थिर झाले । कृतकृत्य गुरुराया ।।३०।। ऐसी घटना अवलोकुनी । पुरजन येती धावोनी । हे तरी नव्हेत मानव जनीं । द्वितीय शंभू भासती ।।३१।। ऐकिले पुराणी कथा । कदिरे रम्मयाची वार्ता । गरु दर्शनार्था । जाती एकदारेम्मय्या ।।३२।। मध्यान्ही आला सहस्र किरण । अतिक्रमू नये शिवार्चन । समयातीत झालिया जाण । महादोष लागती ।।३३।। जया ग्रामी झाला मध्यान्ह । तेथ सोमनाथ नामे सज्जन । अण्णलादेवी सति जाण । सुत एक मल्लिनाथ ।।३४।। ऐसिया सद्भक्तांचिया सदना । येती रेम्मय्या शिवपूजना । द्वारी पाहता शिवशरणां । त्रिवर्गांनी नमिताती ।।३५।। येईजे स्वामी म्हणोनी । स्वागत करिती सोमनाथानी । तव हाते धरोनी । श्रेष्ठासनी बैसविती ।।३६।। अण्णलादेवी कर जोडुनी । स्नान करावेजी झणी । वेळ होतसे शिवार्चनी । प्रसाद सेवुनी स्थिर व्हावे ।।३७।। तव शरणा स्नान करविले । उपचार सिद्ध करोनि दिधले । अष्ट विधार्चने लिंग पूजिले । रेम्मय्यानी तेधवा ।।३८।। पात्री वाढोनि सकल पदार्थ । घृत दधि शर्करादि समस्त । अण्णलादेवी नमित । कीजे लिंगार्पित म्हणोनी ।।३९।। आनंदे लिंगार्पित करिती । ग्रासोग्रासी शिवशरणु म्हणती । शेष प्रसाद इच्छिती । त्रिवर्गी ।।४०।। सांग शिवार्पण करोनी । रेम्मय्या उठिले पात्र सोडुनी । मग त्रिवर्गें लिंगार्पित करोनी । शेष प्रसाद सेविती ।।४१।। ते दिनी रेम्मय्यासी राहविले । रात्रौ शिवानुभव श्रवण केले । आनंदे पाद सेवेत उदय झाले । मुखमार्जन केले रेम्मय्या ।।४२।। आता गुरु भेटीस जाईन । आज्ञा द्यावी मज लागुन । पुनरागमन करीन । आपुल्या सदना ।।४३।। तथास्तु जाइजे गुरुवर्या । यावे श्री दर्शन घेऊनिया । निरीक्षण करू आपुलिया । पुनरागमनाची ।।४४।। तव त्रिवर्गी नमिले । रेम्मय्या गुरु दर्शना चालिले । जावोनि गुरु सेवेंत रमले दिवस चारी ।।४५।। सप्त दिन गुरुगृही राहुनी । पादोदक प्रसाद अनुभवोनी । शिव गोष्ठींत काळ क्रमोनी । आज्ञा घेउनी निघाले ।।४६।। रेम्मय्या गेले ते दिनी । अण्णलादेवी गेली काननी । मल्लिनाथही जाय मागुतेनी । आई सवे ।।४७।। अण्णलादेवी वेंची इंधन । आला भुजंग बिळांतुन । किशोरा डंखिले शिवभूषण । माये किडयाने डंखिले म्हणे ।।४८।। ऐकोनि किशोराचे वचन । आली माता धाउन । शिवशिव बाळारे म्हणून । कडियेवरी घेतली ।।४९।। देवीचा धैर्य मेरू अचळ । मन होईना चंचळ । कैसे दुर्दैव माझे प्रबळ । देवे अनुचित केला की ।।५०।। सर्पें डंखिले म्हणेना । लाडक्यासी मृत्यु आले ना । देवे एकुलत्यासी नेले जाणा । अन्याय केले मजवरी ।।१५१।। माझ्या

संसाराचे सार । एकला मल्लिनाथ किशोर । नेला की दुर्दैवी काळ चोर । घाला घातला आम्हावरी ॥१५२॥ माझिया अंधाची काठी । हिरोनि नेला धूर्जटी । काय करोनि भक्ति मोठी । नाही सार्थक म्हणेना ॥५३॥ माझी ही वंशवल्लि । देवे आजि खंडण केली । माझ्या जन्माची साउली । जळोनि गेली म्हणेना ॥५४॥ हां हां म्हणता मल्लिनाथाचे । प्राणोत्क्रमण झाले साचे । तरी अण्णलादेवीचे । मनी तळमळ नाहीच ॥५५॥ माये मज शिवे बोलाविले । कैलासासी जातो भले । नाशिवंत देहा त्यागिले । मल्लिनाथ झाला निःशब्द ॥५६॥ माझिया राजहंसासी । दीर्घ झोंप आली कैसी । आता मी झाले की परदेशी । वांझ करंटी म्हणती जन ॥५७॥ धैर्याचा मेरू चळेना । मन अधृव होईना । एकुलता किशोर म्हणेना । डंखिले म्हणेना काळ सर्प ॥५८॥ कोंवळे फळ तोडावे । पक्व फळ सोडावे । ऐसा कैसा न्याय । देवाघरी म्हणेना ॥५९॥ कुणासी का विष घातले । कुण्या बाळासी मारिले । त्रिकोणासी विस्तू लाविले । पूर्व जन्मी म्हणेना ॥६०॥ मज दुर्दैवी भणंगा सोडुनी । तुज नेला की शूळपाणी । आजि पर्यंत देवा पूजुनी । कटु फळ पदरी पडियले ॥६१॥ काय तुमचिया भक्त-जना । ऐसाचि देशि का आशिर्वचन । ह्र एक वार चुकविण्या । देवा सवड नव्हते का ॥६२॥ काय जंगमांसी वंचिले । अतिर्थींचे अनादर केले । पंक्ति भेद मज नुमजले । नाही नाही त्रिकाळी ॥६३॥ शिव पूजा निंदिले । शिवार्चन मोडिले । शिवशरणा अनादरिले । नाही नाही कदापी ॥६४॥ आमुच्या सर्व विश्वास घात । काहो देवा केले निश्चित । ऐसे देवावरी मात । ठेवोनिया बोलेना ॥६५॥ परम माहेश्वरांच्या हस्ते । विभूती लाविले ना तूते । तुम्हावरी जे विसंबूनि राहत । त्यांचा शेवट ऐसाचि का ॥६६॥ माझिया बाळा वांचविले असता । सहस्र जंगमार्चन करिते आता । ऐसे कामिक विचार नाणिता । बाळा आणी गृहाते ॥६७॥ सेजारिया माहीत नाही । गृही कांही गलबला नाही । आया बायांचा संचळ नाही । संतोष असे पतीसहीत ॥६८॥ आजि ना शतवरुषानी । मृत्यूचे आवागमन जनी । यदृष्टं तं नष्टं हाकारोनी । वेदशास्त्रे बोभाती ॥६९॥ ऐसा दृढ निश्चय मनी करोन । पुत्राचे केले मुखावलोकन । मायीक भ्रांती सोडून । सतिपति सम वृत्ती ॥७०॥ उत्तमचि आहे शिवेच्छा । कैलासी सम झाला प्रथमांच्या । ऐसा सुविचार करोनि बाळाच्या । करिती समाधीचा निश्चय ॥७१॥ गृहीच्या गुरु गद्दिगीसी । खणोनि केले समाधीसी । चित्त शुद्ध गुरु स्मरणासी । नित्यनेमे करिताती ॥७२॥ तिकडे गुरु आज्ञा घेउनी । रेम्मय्या येती मागुतेनी । सतिपति आनंदे करोनी । दीर्घ दंडवते नमिताती ॥७३॥ हर्षे करिती सत्कार । शिवार्चना करविती सत्वर । अण्णलादेवी अत्यादरे । पाकसिद्धी करीतसे ॥७४॥ रेम्मय्या शिवपूजा करितो । पादोदक स्वीकारिती । लिंगार्पितासी वाढण घेतो । अण्णलादेवी तेधवा ॥७५॥ लिंगार्पितासी वाढोनी । नमस्कारिती सतिपतीनी । सतिपतींचे मुख अवलोकुनी । यती रेम्मय्या बोलती ॥७६॥

श्री हा.

मातें किशोर मल्लिनाथ । दिसे ना की गृहांत । आमुचे संचळ ऐकता त्वरित । येऊनि नमस्कार करणार ॥१७७॥ आजि गेला कुणीकडे । बाळाचे दिसेना गडबड । तयासी सोडोनि गोड । अन्न कैसे लागेल ॥७८॥ बोलवाना बाळासी । का रुसवा केला तुम्हासी । का सोबत्या संवंगड्यानिसी । खेळावया गेलासे ॥७९॥ कां तुम्हीच कुठे पाठविला । अजुनी का नाही आला । परवा आम्हासी पाहता भला । तुम्हा सर्वे नमिलासे ॥८०॥ आपुल्या सवे परिचर्या करी । धूपारती आणी स्वकरी । कायसी आज्ञा लौकरी । कीजे गुरुवे म्हणीतसे ॥८१॥ आज्ञेच्या पूर्वी । सामग्री सर्व जोडवी । गंधाक्षतादी आणोनि ठेवी । पूजावसरी ॥८२॥ लिंगदेवा संमुख नंदी । तैसा बैसे आनंदी । उठोनि न जाय स्थिर बुद्धि । कमळा लागी भ्रमरवत् ॥८३॥ ऐसा सुगुणी आनंद कंद । पंपा विरूपाक्षाचा वंशज । कुठे गेला उमज । नो हे माते आम्हासी ॥८४॥ बाहेर जावोनि बोलवा । मज नाही वाटे बरवा । ऐसे ऐकोनि तेधवां । अण्णलादेवी काय वदे ॥८५॥ बोलविण्या नोहे मी चांगुणा । न बोलू तरी निबव्वा सुगुण । नव्हे, मी त्यांच्या दासीची पुत्री जाणा । साम्य नव्हे की तयांसी ॥८६॥ बोलवा म्हणता-मज उचित नव्हे । बोलवू तरी लौकीक पाहे । न बोलवू तरी वैराग्य होय । द्वंद्व न उकले गुरुवर्या ॥८७॥ करुणा सागर मूर्ती । त्वच्चरणीच मल्लिनाथाची वसती । कासया जाय बाहेरी निश्चिती । अंतरंगी विचारा ॥८८॥ तव अंतर्दृष्टी पाहिले । गत वर्तमान जाणिले । उठोनि मृत्तिका काढिले । समाधी वरिची तेधवा ॥८९॥ पत्र पुष्प विभूती । काढोनि टाकिले वरुती । तव कृपादृष्टी अवलोकिती । मल्लिनाथासी सत्वर ॥९०॥ उठि बाळा मल्लिनाथा । कां आम्हावरी रुसवा तत्वता । म्हणोनि प्रसाद मुखी घालिता । नेत्र उघडोनि पाहिला ॥९१॥ कडिये घेवोनि बाळासी । रेम्मय्या देती मातेसी । पान्हा फुटला स्तनासी । विमलांबु धारा स्रवती नयनी ॥९२॥ धन्य रेम्मय्या धन्य ती देवी । देव भक्तासी उपमा नाही । साता दिवसा वरी पाही । प्राणदान करिताती ॥९३॥ तव मल्लिनाथासी घेवोनी । पंगती जेविती रेम्मय्यानी । स्वमुखीचे ग्रास काढुनी । मल्लिनाथा चारविती ॥९४॥ तव माता पितयासी । जो हर्ष झाला तया समयासी । न वर्णवे तया आनंदासी । कविच्या मुखें ॥९५॥ सप्त दिनावरी प्राणदान । दिधले मल्लिनाथा लागन । ऐकोनिया पुरजन । धावोनी येती दर्शना ॥९६॥ धन्य धन्य रेम्मय्या यति । मनुज वेषे आला शिवमूर्ती । सद्भक्त जना उद्धरण्या प्रती । अवतरलासे भूलोकी ॥९७॥ सकळ भक्तजन येती । रेम्मय्याचे दर्शन घेती । धन्य जाहलो म्हणती । भक्तवृंद ते रुमई ॥९८॥ अण्णलादेवी का सामान्य सती । सुख दुःखाची नाही खंती । माया मोहाची वसती । पतिपत्नी हृदयी नाहीच ॥९९॥ कैसा तो निर्मोह । कैसे ते निर्माय । सुख दुःख द्वंद्व भाव । अंतःकरणा स्पर्शेना ॥२००॥ भोगी की योगी । त्यागी की अनुरागी । साधेना म्हणती त्यागी । प्रापंचि का शिवयोग ॥२०१॥ जयांचा संकल्प शिव

संकल्प । प्रपंची असोनि निःसंकल्प । विलया गेले द्वंद्व विकल्प । शिव संकल्पे वर्तती ॥२०२॥ मोक्षासी प्रपंच आडवे नाही । मोक्षासी संन्यास पाहीजे नाही । शिव संकल्पे वर्तती जिही । योगी भोगी मुक्तची ॥३॥ शिवभक्ती संसार । शिवमय केले निर्धार । ते शिव प्रपंच सुमधुर । मुक्तद्वार मोक्षाचे ॥४॥ बसवरायांची अमर वाणी । वदतसे खणखणोनी । कां हो इंद्रिय निग्रहोनी । महा पातकी होतसां ॥५॥ तींच इंद्रियें पुनर्जन्मी । दुःख देती आपणा लागोनी । सतिपति रति सुख भोगोनी । मोक्षा नाही गेले का ॥६॥ सिंधु बल्लाळे प्रपंच त्यागिले । सिरियाळ चांगुणा संन्यासी झाले । कां दासदुग्गळी सोडिले । संसारासी तिलांजली ॥७॥ ऐसे सदृष्टांते वचन । बोधिले अमृत वाणीने । त्यागाचे खटाटोप झाडून । काढिले असती सुवचनी ॥८॥ ऐसे पुरातन इतिहास पाहे । ऐकीलो होतो की निश्चय । आजि चन्नमल्ल योगी पाहे । सुस्पष्ट केले इतिहास ॥९॥ प्रांती वार्ता पसरली । भक्त वृंद येती समेळी । चन्नमल्लाच्या पदकमळी । लोळण घेती सर्वत्र ॥१०॥ धन्य धन्य जी गुरुवर्या । अघटित घडविलोकी स्वामिया । भक्तोद्धारा मृत्युंजया । परोपकारी दक्ष तू ॥११॥ ते दिवसा पासुनी । एरंडळापुर नाम जाउन । रंडयाळ रंडयाळ म्हणोन । लोक संबोधू लागले ॥१२॥ इकडे विरूपाक्ष स्वामींस । वार्ता कळाली भक्त मुडीस । लौकिकी ही घटना आम्हास । लांच्छनासी कारण ॥१३॥ मागा सोन्नलगी माजी भले । शिद्धरामे प्राण प्रतिष्ठिले । लोक शवांचे थवे टाकिले । शिद्ध देशिका सामोरे ॥१४॥ कासया आम्हासी महत्व । लोक विचित्र पाहती सत्व । ईश्वरी संकेता माजी हात । घालु नये सुज्ञानी ॥१५॥ आजि लोक भोग सरले । आता दिवस नाही उरले । ऐशा विचारा अंती आले । चन्नमल्लेश गुरु दर्शना ॥१६॥ येवोनि साष्टांगे नमिती । श्रीगुरूंचे हृद्गत जाणती । मीही येईन म्हणती । आपुल्या सवें ॥१७॥ तव श्रीगुरु चन्नमल्लासी । म्हणती तुझेनि बहु कार्यासी । साह्य पाहिजे जनासी । स्थिर असावे भूलोकी ॥१८॥ ऐसे चन्नमल्ला स्थिर केले । इतुकियांत माळप्पा आले । नमस्कारोनि तये वेळे । सद्गुरूसी विनविती ॥१९॥ गुरु माये ऐकावी विनंती । माझिया युगीं कृतयुग धर्म प्रवर्तिती । म्हणोनिया कली संप्रती । विघ्ने करीतो शिवयोगिया ॥२०॥ या युगी राहणे असंमत । मीही येईन तव संगत । कृपा करोनि त्वरित । निजधामा प्रत न्यावेजी ॥२१॥ तव पदकमलाचा वियोग । न साहेजी अभाग । तरी दासासी हा सुयोग । दूर नाही कीजेजी ॥२२॥ तव विरूपाक्ष गुरुवर । आज्ञापिती सत्वर । धरी कां पद कल्हार । त्रुटि न लाविजे ये क्षणी ॥२३॥ धरी माळप्पा श्रीगुरु चरण । तव गुरु शिष्य पावती निर्वाण । सुर दुदंभी वाजती धन्य धन्य । पुष्पवृष्टि करिताती ॥२४॥ कैसी ही गुरुची लीला । नचि कळे मायिकाला । शिवयोगी हा त्रिकाळा । अबाधित स्वतंत्र ॥२५॥ ऐसी ही महागुरु पर्वणी । पुण्यवंता साधे जनी । म्हणोनिया सद्भक्त श्रेणी । फल कर्पुरादी अर्पिती ॥२६॥ लोकी कीर्ती पसरली । भक्त

मुडी गुरु शिष्य समेळी । एकदाची लीन झाली । प्राणलिंगी सत्वर ॥२२७॥ लोक थव्यांचे थवे येती । नानापरीचें वाद्यें वाजती । भजनी मेळा पताके फडकती । नादे अंबर कोंदले ॥२८॥ निर्वाण वार्ता वातापरी । चतुर्दिशी पसरली सत्वरी । नारिकेळाची वारी । नदी रूप धरिलीसे ॥२९॥ थव्यांचे थवे भक्त जनता । सहस्रावधि धावे तत्वता । नारळ कर्पुर ऊदबत्या । अर्पिताती गुरुवर्यां ॥३०॥ दुर्लभ झाले गुरु चरण । अज्ञान-अंध-अभागी जाण । परिसाचे परीक्षण । अभाग्यासी केवी घडे ॥३१॥ आता तरी अंत्य दर्शन । घडो देवा म्हणोन । धांवताती सज्जन । फलपुष्पादी घेउनी ॥३२॥ फलपुष्पे अर्पिती गुरु चरणी । मंगळार्ती करिती झणी । दान दक्षिणा तये क्षणी । माहेश्वरा अर्पिती ॥३३॥ गुरु शिष्यांची समाधी तेही । गुरुपद कमळी करिती पाही । लिंगमुद्रा स्थापोनि लवलाही । विरूपाक्ष माळिंग संबोधिती ॥३४॥ सहजचि संयोग झाला । भक्तवृंद संतोषला । भक्त मुडि या नामाला । पात्र झाले ते स्थान ॥३५॥ तव देशमुख द्रोणपुरीचे । आले होते महाजनासहित । षोडशोपचारे अभिषेकित । श्रीगुरुसी तेधवां ॥३६॥ तव सहस्र जंगमार्चना । तृप्त केले जनी जनार्दना । माहेश्वर मूर्तींना । महा दक्षिणे तोषविले ॥३७॥ अन्नदान, वस्त्रदान । भूरि दक्षिणा देती सज्जन । ऐसा करितीं महोत्सव जाण । सद्भक्त वृंद ॥३८॥ करोनिया गणाराधना । पालखींत पादुका ठेवोनि ते क्षणा । छत्रचामरे वाद्ये नाना । पताका फडकती अंतराळी ॥३९॥ ऐसे सहस्रावधि जन । टाळ मृदंगेसी करीत भजन । नंदि ध्वजांसह पराक बोलून । आनंदाने नाचतीं ॥४०॥ हरहर महादेव म्हणोनी । गर्जना करितीं मिरवणुकींतुनी । मिरवणूक द्रोणपुरा लागुनी । घेवोनि येतीं तेधवा ॥४१॥ तव ग्रामींचे सुवासिनी जन । मंगळार्तिक्य घेऊनि जाण । येतीं सामोरे वाद्य गर्जने । श्रीगुरूसी ते समई ॥४२॥ भजनी मेळा वाद्ये सहित । पादुका नेतीं मिरवत । तव ते ग्रामीचे दैवत । स्थान सोडुनी पळाली ॥४३॥ ग्राम सोडुनी पूर्व दिशेसी । पालथी पडली भूमीसी । तेथेची सीमेवरी तिसी । स्थापियले ग्रामस्थ ॥४४॥ तया ग्राम देवतेच्या स्थानी । पादुका स्थापिले तये क्षणी । मठ मान्यादि बांधुनी । शिवमुद्रांकित करिताती ॥४५॥ तव द्रोणपुरा माजी । श्रेष्ठ वृति देतीं समाजी । देशमुख महानाड सज्जन राजी । गुरु पादुकावरी होताती ॥४६॥ राजाज्ञा घेवोनि देशमुख । शिक्का मोर्तब करितीं देख । महाजनासी अत्यंत हरिख । जाहलासे तेधवा ॥४७॥ जया ग्रामी देशमुखा मान । तेथे गुरुवर्या बहुमान । ऐसे दानपत्र लिहून । साक्ष देतीं सद्भक्त ॥४८॥ महिमा निधी चन्नमल्लासी । फल पुष्प दक्षिणेसी । दानपत्र अर्पुनी चरणासी । नमस्कार करिताती ॥४९॥ वृत्तीं सहित मानपत्र । अर्पिती चरणी स्वर्णपत्र । तरी ही वृत्ती आचंद्र । तारकेंसी भोगिजे ॥५०॥ म्हणोनिया नमिती सद्भक्त । हर्षले शिवयोगी चितांत । वटु आणोनिया निश्चित । अय्याचार करिताती ॥२५१॥ सुमुहूर्त पाहोनि अय्याचार । तैसेचि पट्टाभिषेकाचा विचार । निश्चय करोनि सत्वर । कार्य सांग

करिताती ॥२५२॥ आनंदे करिती गणाराधना । ग्रामस्थां परस्थलियाना । करवोनिया मिष्टांन भोजना । तृप्ती करिती सर्वत्रां ॥५३॥ दान दक्षिणा देवोनी । तृप्त केले याचक श्रेणी । महोत्सवे करोनी । मिरवणूक काढिती ॥५४॥ तये दिवसा पासुनी । झाले हावगि स्वामी नामाभिधानी । कीर्ती पसरली जनी । शिवयोगियांची ॥५५॥ देशमुखादि महानाड दैव । शिष्यवृत्तीसी आले सर्व । वृत्ति विधान समर्पोनि भावे । गुरु परंपरा चालविती ॥५६॥ गुरुवर्य चन्नमल्लेश । पदकमल संजात बसवलिंगेश । क्षमा शांत्यादि सुगुणास । आश्रयिले पट्टाधिकारी ॥५७॥ त्रिकाळी करिती लिंगार्चन । बोले तैसे चाले अनुदिन । परद्रव्य परनारी वमना समान । लिंगानंदी समरसला ॥५८॥ जयाचे हस्त आणि पाद । मन सुसंयुत लिंगी सुखद । तप कीर्ती आणि सुविद्य । तो सकल तीर्थ फळदाता ॥५९॥ ऐसे बसवलिंग पीठाध्यक्ष । शिवलिंगानुभवी दक्ष । शरणांगता मोक्ष । पद दाता दयाळु ॥६०॥ त्रिकाळ लिंगार्चनाचा नेम । आणीक नेणती सकाम कर्म । काय, करण, भावार्पणी निःसीम । शिवानुभवे वर्तती ॥६१॥ कामालागी दंडिला । क्रोधालागी खंडिला । मोहालागी त्यागिला । धैर्य दंडे ॥६२॥ मत्सर शुनका दवडिला । दंभाचा कुंभ फोडिला । अहंकाराचा श्रृंग मोडिला । सिद्ध हस्ते ॥६३॥ ऐसा षड्रिपूंचा बीमोड केला । शांत्यादि सद्गुणे श्रृंगारला । शिव एकोध्येय ध्यायिला । शिवंकरजो ॥५४॥ ऐसिया शिवयोगियाचे दर्शन । घडे तरी अनंत पुण्य । स्पर्शने अघ नाशन । कर्मा दहन ज्ञानाग्नी ॥६५॥ तया देशीचे दारिद्र्य गेले । लोकांचे कष्ट नष्ट झाले । ग्रहबाधा पिशाच्चादि पळाले । देशोधडी होवोनी ॥६६॥ सकळांचे दुरित दूर केले । इष्टार्थ सर्व पूर्ण झाले । सुखे नांदू लागले । जनता सर्व ॥६७॥ प्रांती देशी कीर्ती पसरली । शिवदेवचि आले भूमंडळी । लोक दर्शना भुकेजली । स्वामींचिया ॥६८॥ तनुमन धने सेवा करिती । इष्टार्थ सर्व ही पावती । शिव दीक्षा संपन्न होती । श्रीगुरू कृपे ॥६९॥ धर्मार्थ काम । आणीक मोक्षाचा निजधाम । चतुर्विध पुरुषार्थ निःसीम । गुरु सेवेने पावती ॥७०॥ नित्य दासोह गणाराधना । चालतसे मठीजाणा । आलिया अतीता संतर्पणा । अभेद रीती चालविती ॥७१॥ श्रीगुरूच्या कृपामृत वर्णणे । शिवभक्ति वृक्ष फलभारे संपन्न । देशीचे जन सुखाने । नांदू लागली सदैव ॥७२॥ भक्ते, आसन, शयनयान । भवि संग सहभोजन । तैसेचि संदर्शन । सुजनानी त्यागिजे ॥७३॥ साक्षी । आसने शयने याने संपर्के सहभोजने । संचरंति महाघोरे । नरके काल मक्षयं ॥७४॥ ऐसे चतुःषष्टि शील संपन्न । बसवलिंग यति ज्ञान धन । थोर सान सकळ जन । येती दर्शना श्रीगुरूच्या ॥७५॥ गजतुरग रथांदोळण संपत्तीने भरले संस्थान । साक्षात शिव अवतरला जाण । भूमंडळी म्हणती ॥७६॥ भक्त दर्शना येती । विनवोनिया स्वागत करिती श्रीगुरूना गृहाप्रती । आमंत्रिती संभ्रमे ॥२७७॥ सप्रेमे विनावा करोनी । पवित्र चरणोदक सेवुनी । तनुमन धने सेवा समर्पुनी । धन्य धन्य

होताती ॥२७८॥ एकदा दीर्घाद्रीहून । आले सद्भक्त शिष्य जन । श्रीगुरूंच्या दर्शने । पुनीत होऊ म्हणोनी ॥७९॥ फलपुष्प दक्षिणा । घेवोनिया करकमळी जाणा । साष्टांगे नमोनि गुरु चरणा । विनविताती सद्भावे ॥८०॥ सकळांसी आपण सद्गुरु । शरणांगता आधारू । पतितांसी भवाब्धि तारू । करुणा करू गुरुवर्या ॥८१॥ दीर्घाद्रीसी आगमन । करावेजी श्रीगुरून । शिष्य सद्भक्तांची इच्छा पूर्ण । संदर्शने होईल ॥८२॥ तथास्तु म्हणोनि श्रीगुरु । वैभवे निघती सुविचारू । बिरुदावळीसह परिवारू । विजृंभणेसी येताती ॥८३॥ गुरुवर्यांचे शुभागमन । सद्भक्ति करोनिया श्रवण । भेरी मृदंग चौघडे घेऊन । सामोरे येती सुवासिनी ॥८४॥ तव शुभांगना पंचारती । श्रीगुरूसी ओवाळिती । विनीत होवोनि नमितीं । स्थिरावितीं मठांत ॥८५॥ स्वामीनी आलेली वार्ता । पद्मिनीस कळविण्या तत्वता । पश्चिमाद्रीसी गेला सविता । कमळे मुकुळित जाहली ॥८६॥ तमाच्छादिले अवनी । अमृत कर आला पूर्वाद्रि लागुनी । श्रीगुरु चरण किरणे स्पर्शोनि । कलंक धुवोनि घेईन ॥८७॥ म्हणोनिया प्रकाशला । गगनांगना घेवोनि मल्लिकामाला । वाहवया स्वामींच्या पदकमला । तारकापुंज डोकावती ॥८८॥ चकोरी धावोनि येती समस्त । आनंदे विहरती गगनात । ज्योत्सना मणी धावोनि येत । श्रीगुरूसी ओवाळण्या ॥८९॥ तैसे सीतांशु किरणे पसरली । हंसतमुखें कमळिणी विकसली । सायं पूजा चालली । जयघंटेसी देवालयी ॥९०॥ आपापुल्या मठी पूजिती शिवयोगी धूर्जटी । देवदर्शनाची दाटी । देवस्थानी चालली ॥९१॥ ऐसिया पट्टणी निर्माय । मदन मर्दन गुरुराया । राहिले स्थिर पाहे । लिंगानदे करोनी ॥९२॥ वीर माहेश्वर-भक्त जन । फलपुष्पादि गुरु संनिध ठेउन । साष्टांगे नमितीं कर जोडुन । अभय देती सर्वत्रा ॥९३॥ सकळी श्रीसन्निध बैसतीं । श्रीगुरुंचे आशिष घेती । आपुलाल्या गृहा जातीं । श्रीआज्ञे करोनी ॥९४॥ नित्य त्रिकाळ लिंगार्चना । तैसेची जंगमाराधना । एके दिनी श्रीगुरू लिंग पूजना । बैसलिया वाद्ये वाजतीं ॥९५॥ जयघंटा भेरी करताळ । कहळा नपेरी निःसाळ । सुस्वरे वाजवितीं समेळ । बाळगोपाळे बैसुनी ॥९६॥ तेथीचा मुसलमान अधिपति । तया फकीर सय्यदचांद म्हणतीं । तयासी कुणी सांगती । अमच्या-नमाजी विघ्न असे ॥९७॥ नेमके नमाजाचे समई । मठा करिती वाद्यांची घाई । इसलिये कोई । इलाज साहेब कीजिये ॥९८॥ अरे ओ मठमे जावो । घंटा छोडकर लावो । ऊंटके गलेमे बंधवावो । इसी वखत ॥९९॥ तव नबाबे घंटा मागविला । उष्ट्राच्या कंठी बांधिला । बांधिता घंटा वाजेना । पाहोनि झाले साश्चर्य ॥३००॥ सोडारे सोडारे घंटा । नेवोनि द्यावे नको तंटा । सोडिताचि वाजे घंटा । अद्भुत वाटे नबाबा ॥३०१॥ घंटा पाठविला तये वेळी । आणीक एक कुयुक्ती साधिली । परीक्षा करू ये वेळी । तया जंगम साधूची ॥२॥ काजी ! जाके मटन लाना । चांदीके तबकमे रखना । ऊपर सुनहरी दस्ती झांपना । ले जाके देना जंगमको ॥३॥ देखेंगे

उनकी महिमा । कुछ है या नही करिष्मा । म्हणोनि पाठवी आमिष जाणा । स्वामी जाणिले महाद्वारी ॥४॥ बावा आम्हासी पोंचले । दूता मुखें निरोप दिले । पोंचविजे ये वेळे । साहेबा जवळी ॥५॥ काजी माघारा जात । तबकडी साहेबा संमुख ठेवित । क्या बोलेजी महंत । काजी लागी पुसलासे ॥६॥ पोंहचा बोले महाराज । ऐकता उघडोनि पाहे सहज । मोगरे सेवंतीचा गंधराज । पात्र उघडिता दरवळला ॥७॥ जाईजुई मोगऱ्यांच्या फुलाला । पाहोनि नबाब दंग झाला । तोबा तोबा लाहोल्बिला । या खुदा अवलिया म्हणतसे ॥८॥ तोबा तोबा करोनी । गजतुरग पदाती बलाउनी । फलपुष्प दक्षिणा घेउनी । गुरु दर्शना निघाला ॥९॥ पुष्पमाळे हस्त बांधोन । सैन्यासह पादचारी होउन । महाद्वारी घाली लोटांगण । कीजे अपराध क्षमापण ॥१०॥ म्हणोनि उभा कर पाद जोडुन । खाली घालोनिया मान । पट होते द्वारा लागुन । बाहेर तिष्ठे नबाब ॥११॥ पूर्वी आम्ही ऐकिले । अलदीचे महंत स्वामी झाले । एकदा संचारा निघाले । परिवारेसी ॥१२॥ गेले कप्पडि सुक्षेत्रा । कृष्णा मलाप हारीच्या तीरा । निर्जन प्रदेश कांतारा । माजी लिंगार्चना बैसले ॥१३॥ तेथ विजय नगरचा अधिपती । मृगयेस आला कानना प्रतीं । तीरी उतरला महिपति । डेरादांड्या लावोनी ॥१४॥ चालले स्वामींचे लिंगार्चन । वाजती जयघंटा भेरी घनघन । वनीचे क्रूर पशू जाऊन । दरी खोरी दडाले ॥१५॥ तव ऐकोनि वाद्यांचा गजर । कौन बजावत घंटा नक्कारा । सेनापतींसी सत्वर । आज्ञा करी तेधवा ॥१६॥ फौरी जाके पता लगाना ! हमारे इलाकेमे किसका तराना । म्हणोनिया तये क्षणा । सेनापतींसी पाठवी ॥१७॥ जावोनि शोधिला दळपती । शिवपूजेंत बैसले यती । दुरोनिया स्वामी प्रतीं । नमन करोनि आलासे ॥१८॥ असती कुणी महंत । सामान्य मानव नव्हेत । लावो तबक इस वक्त । म्हणोनि तबकडी मागवी ॥१९॥ मध्ये ठेवोनि पिशित । वरोनि धौतांबर झाकित । भटांसीं आज्ञा करीत । बाबा महंतको देवो म्हणे ॥२०॥ पिशिताचा ताट । घेऊनि आला भाट । राव पाहे वाट । देखें महंतका करिष्मा ॥२१॥ महाराज ताट घ्यावे । राजे पाठविले स्वभावे । आम्हासी पोंचला माघारे जावे । ज्याचे तया देइजे ॥२२॥ तव दूतीं माघारे आले । धन्यापुढे ताट ठेविले । पोंहचा हमको बोले । महाराजा सन्यासी ॥२३॥ लावो देखेंगे क्या है । वस्त्रा लागी उघडोनि पाहे । मोगऱ्यानी ताट भरला आहे । शीतल सुगंध सुटलासे ॥२४॥ भूपे आश्चर्य चकित झाला । तोबा तोबा करू लागला । तत्काळ धावत आला । स्वामी लागी नमीतसे ॥२५॥ दीनाचे सहस्र अपराध । क्षमा कीजे तुम्ही सिद्ध । उभा राहिला राजा बद्ध । अंजलीयुक्त होउनी ॥२६॥ माझे अज्ञान तिमिर । दवडिलासी तू भास्कर । कृपावलोकने दीनावर । दया दृष्टी ठेविजे ॥२७॥ मज दीना कडोनि सेवा । मठ मान्य इनाम घ्यावा । अज्ञान्याची ही अल्प सेवा । मान्य कीजे गुरुवर ॥२८॥ आम्हा संन्यासियांसी । मठ मान्य कासायासी ।

राव म्हणे पापियासी । सेवा कांही घडो द्या ॥२९॥ विनंती ऐकोनि ते अवसरी । म्हणती इच्छे सारिखे करी । पांच गावे अर्पण करी । मठ मान्य इनामे ॥३०॥ इलकल्ल, बिद्दलिगे, नंदपुर । कनकगिरी, कंपली, पंचपुर । मठ मान्य वृत्ति परिकर । अर्पोनि धन्य जाहला ॥३१॥ तैसेचि केले बसवलिंगार्य । दाविले नबाबा तपःशौर्य । सद्भक्ता झाले आश्चर्य । जगदाचार्य धन्य म्हणती ॥३२॥ नबाबे धन्य धन्य म्हणोनी । मठ मान्य वृत्ती अधिकार देउनी । श्रीगुरूंचे आशिष घेउनी स्वस्थानासी गेलासे ॥३३॥ इकडे बसवलिंग यति । निःसीम लिंग पूजनी रमती । दीर्घाद्री माजीच क्रमिती । लिंगानंदी चिरकाळ ॥३४॥ अनेक महिमा दाउनी । उत्तराधिकार देउनी । लिंगामाजी समरसोनी । लोकयात्रा खंडितीं ॥३५॥ पुढती नवपट्टाधिकारी आले । दासोहं भावे संचार केले । शरणांगता उद्धरिले । तपोबळे करोनी ॥३६॥ पुढतीं तेही लिंगैक्य झाले । वृषलिंगार्य अधिकारा आले । नित्य एक विंशति वेळा लिंग पूजिले । तीर्थ प्रसादा सहीत ॥३७॥ ऐसे शिवाचारी धुरंधर । अष्टावरणी बंधुर । पंचाचार शुभ कर । जाणोनिया चालती ॥४७॥ इतिश्री हावगिलिंग लीलामृत । श्रवणे प्राशन कराहो सद्भक्त । होताल जन्ममरणा विरहित । बसवलिंग विनवित भालपुरीचा ॥३९॥ इतश्री हावगिलिंग लीलामृते । गुरू विरुपाक्ष निरवय । बसवलिंग पीठाधिकारी महिमा वर्णनं नाम ।

तृतियोध्याय गोडः । श्री सांबसदाशिवार्पणमस्तु

श्री हावगिलिंगार्पणमस्तु ।

श्रीगुरू विरुपाक्ष लिंगायनमः श्रीगुरू हावगिलिंगायनमः श्रीगुरू बसवलिंगायनमः

।। आर्या ।। बसवलिंग गुरुवर्ये करुनी सुविचार वीर माहेश । दीक्षा शिक्षाधिकार दे शिष्या सगुण निर्गुणुपदेश ।।१।।

जयजयाज्ञास्थ महालिंगा । जयजय श्रोत्रस्थ प्रसादलिंगा । जयजय त्वगस्थ जंगमलिंगा । मणिपुरी शिवलिंगा तुज नमो ।।१।। जय जय स्वाधिष्ठानी गुरुलिंगा । जयजयाधारी आचारलिंगा । जय कर स्थळीच्या इष्टलिंगा । हृदि प्राण लिंगा तुज नमो ।।२।। भावेहि विद्यते देव । हा विसरू नये की भाव । यत्रयत्र मना वाव । तेचि जाणिजे भावलिंग ।।३।। ऐसा तू नवचक्राधिपा । महालिंगादि नवलिंग रूपा । नवविधा भक्तीने तुझिया रूपा । जाणती हो शिवशरण ।।४।। येरव्ही भक्तीचा जिव्हाळा । नसे तनुमन धनाचाचि कळवळा । लिंगार्चनाचा कंटाळा । अंगार्चनाचा हव्यास ।।५।। म्हणे मी आहे लिंगवंत । लिंगाभिमान सोडिला साद्यंत । परकिया उपदेशा भुलला जंत । स्वधर्म नेणे मूढात्मा ।।६।। गीते माजी चेतविले । स्वधर्मांच निधन भले । पर धर्म भयावह बोले । अर्जुनासी गोपाळ ।।७।। हा उपदेश केला नसता । फाल्गुने क्षात्र वृत्तीसी मुकला असता । वेदवादी रतू नको पार्था । वेद त्रिगुणांचा विषय हो ।।८।। तुवां निस्त्रैगुण्यचि व्हावे । वेदाचे आश्रय सोडावे । द्वंद्व दुःखा विरहित असावे । शिवार्पण भावे वर्तोनी ।।९।। दक्षाचिया यज्ञामाजी । अधिपति कवणा केलेजी । होमोनि कुणासी केले राजी । अनाहुत यागी कां झाले ।।१०।। दक्षाचे शिर गेले । पुनः कुणी निर्मिले । बस्त शिरचि लाविले । महारुद्रे येउनी ।।११।। हे शिला शासन । पहा देवालया मधून । अद्यापी साक्षिभूत होऊन । राहिले ते शिवद्वारी ।।१२।। तेव्हा पासाव रुद्र स्वाहाकार । रुद्राग्नि माजि हवनिती विप्र । तव समजला प्रलयाग्नि रुद्र । वैदिकाना सर्वस्वी ।।१३।। त्र्यंबकासी यजिले । बहुमुखे शिवासी नमिले । पाणी मंत्रे महालिंगा स्तविले । सर्वं लिंगगं स्थापयति म्हणोनी ।।१४।। अयंमे हस्तो भगवान् । म्हणोनि करकमळी पूजिले भगवान् । नमः शिवायच म्हणोन । पंचाक्षराने स्तवियेले ।।१५।। वेदेचि लिंग पूजिले । सहस्र धारे अभिषेकिले । देवादिकी मस्तकी धरिले । महालिंगासी ।।१६।। महालिंगाचे आदि अंत । न मिळाले विधि हरी प्रत । सूकर गिद्ध होवोनि शोधित । हताश झाले दोघेही ।।१७।। तव पाताळ कंदगणा प्रती । शरण गेला लक्ष्मीपती । उपदेशिला शिवतत्व निश्चिती । हृदय कमळी जोतिर्लिंग ।।१८।। ऐसिया जोतिर्लिंगा । देव मुनिमन झाले भृंग । जगदंतर्यामी शिवलिंगा । नमन असो त्रिकाळी ।।१९।। हावगिलिंग चरित्र वसंत काळ । श्रोत्र मन वन फुलेल सकळ । तव भक्ति कोकिळा होय सुकाळ । मोक्ष फळाचा सर्वत्र ।।२०।। आता श्रोती अवधान द्यावे । नवगुरु चरित्रा श्रवण करावे । तुमचिया अवधाने पावे । गुरु चरित्र पूर्तीसी ।।२१।। हे उत्तर हावगिलिंग चरित्र । श्रवणे पावन कीजे श्रोत्र । भोग मोक्षाची सिद्धी सर्वत्र ।

भोगिजेती सद्भक्ती ॥२२॥ देवनदीपुर पवित्र । तेथील अधिपती सुचरित्र । शील संपन्न शिवभक्त शुभगात्र । गुरुलिंग जंगम सद्भक्त ॥२३॥ नामे बसवंतराय पाटील । गुरुभक्ति पयोनिधी शीतकर सुशील । गुरुभक्ति नळिनविकसन रवि सोज्वळ । महोदार जंगम प्राणी ॥२४॥ गुरु मत सुकेतनारंभ । गुरु सेवा धुरीण स्वयंभ । गुरु तर भवांबु निधि तरण निर्दंभ । निर्मल निःसीम गुरु भजनी ॥२५॥ दानगुणे प्रिय वचनी । ज्ञानगुणे निगर्वीजनी । मित वचनी अनुष्ठानी । गुरु भजनी आर्त सर्वदा ॥२६॥ दयाधर्म क्रिया नेम । त्रिविध दासोही सदा प्रेम । भक्ताग्रणी सुखधाम । स्वधर्म नेम चालवी ॥२७॥ तया बसवंतरायाची पत्नी । पतिव्रता निःसीम गुरु भजनी । संतता नंद युक्त सुगुणी । सद्गुणा भरणी सुशील ॥२८॥ नाम जियेचे गिरिजवा । दीन दुबळ्यांची असे अव्वा । तियेच्या मृदुल स्वभावा । मितीं नाही पाहता ॥२९॥ पविव्रतेच्या गर्भ कमळी । पुत्र वीरण्णा षोडश कळी । दुजियाने गर्भिणी झाली । परी श्रमली अपार ॥३०॥ ऐसे असतां एके दिनी । येतीं भेटीसी सुजन मानिनी । बोलताती विनोद वचनी । गिरिजांबेसी तेधवा ॥३१॥ आता द्वितींय पुत्रा प्रसवाल । तुमच्या सुखासी नाही मोल । मग तिसऱ्याचे बोल । आम्ही आता न बोलु ॥३२॥ अगे कांसया मज बोलता । एकचि वीरण्णा पुरे होता । दिधले देवे अवचिता । ओटीमाजी ॥३३॥ जं झाले ते झाले । सद्गुरूने बरे केले । माझे भार उतरी जरी भले । अर्पीन सत्पुत्रा श्रीगुरूसी ॥३४॥ ऐसा शिवसंकल्प करोनी । समाधान झाली कामिनी । वेदना विरहित होवोनी । सुखे गुरु ध्यानीं राहिली ॥३५॥ ऐसा शिव संकल्प जयांचा । पाठिराखा सद्गुरू त्यांचा । हा स्वानुभव त्रिवाचा । सत्य सत्य जाणावे ॥३६॥ मग सुखें नवमास भरले । षोडशकळा पौर्णिमेसी आले । तैसे अर्धोदय पर्वी भले । उदया आले सद्गुरु ॥३७॥ जवळी होत्या सुइणी स्त्रिया । निद्रेने व्यापिले तया । स्वभावे उठती बाया । उदय झाले म्हणोनी ॥३८॥ तव पाहती दिव्य तनू । लडिवाळ बाळ दुजा भानू । चकित झाल्या कामिनीं आपणू । आपणामाजी ॥३९॥ वेदना नाही की संवेदना । नुठती प्रसूत वेणा । काय वर्णावे त्या कहाण्या । प्रसूत समयीचे ॥४०॥ गिरिजाईचे महत्पुण्य । उदया आला निस्त्रैगुण्य । श्रीगुरु लीला धन्य धन्य । म्हणोनि आश्चर्य करिताती ॥४१॥ श्रुत करावे यजमाना । गिरिजाई सांगे सुइणीना । तव सुचविती यजमाना । आनंदले बसवंतराय ॥४२॥ घटसंमार्जन करिती । गुरु जंगमा बोलाविती । दानधर्म यथेच्च देती । याचकांसी आनंदे ॥४३॥ मग भृत्याचारी शिवाचारी । पाचारिता येती सत्वरी । पंच कलश स्थापोनि ते अवसरी । षोडशोपचारी पूजिले ॥४४॥ पंचसूत्री घेवोनि लिंगाकार । तव करिती लिंग संस्कार । पादोदके शुभ कर । अभिषेकिती पंचामृते ॥४५॥ वीरागमी सांगती प्रमाण । गर्भाष्टकी कीजे लिंग धारण । आगम स्वयंभूव म्हणे । अर्भकासी न चुकावे ॥४६॥ पूर्वीचे सुसंस्कृत लिंग । बाळासी धारण कीजे अभंग ।

हे आगम प्रमाण अव्यंग । जाणावेजी शिवभक्ती ॥४७॥

॥ श्लोक ॥ वीरागमे । वीरशैव स्थितानांच । स्त्रीणां गर्भाष्टमे गुरुः । पंचसूत्रकृतं लिंगंधारयेद्विधिवद्बुधः ॥४८॥

स्वायंभुवागमे । अर्धोदयेवाप्यधसियत् पतनेचैवदेशिकः । पूर्वसंस्कारितंलिंगं । शिशोः कंठेचधारयेत् ॥४९॥

लिंगार्चनारत नारी सुमंगळ । सूतक विरहित अमंगळ । रवि अग्निसम सोज्वळ । लिंगार्चन अविरळ आचरावे ॥५०॥ विश्वेश निकटीची गंगा । समस्त पापासी करी भंगा । तैसे लिंगवंता गृही जागा । नाही नाही सूतकासी ॥५१॥ ऐसे बोलती दिव्यागम । तैसे चालती शिव भक्तोत्तम । ते पंचसूतक अधम । वीरशैव नेणतीं ॥५२॥

॥ श्लोक ॥ वीरागमे । लिंगार्चनरतायाश्च ऋतौ नार्या नसूतकं । यथाप्रसूतिका याश्च सूतकं नैवविद्यते ॥५३॥

गृहेयस्मिन्प्रसूतास्त्री सूतकं नात्रविद्यते । शिवपादांबुजस्पर्शात्सर्वपापप्रणश्यति ॥५४॥

यथा विश्वेश निकटाद्गंगा सूतक वर्जिता । तथा लिंगांकिता भक्ता । पंचसूतक वर्जिता ॥५५॥

जातीं, जनन, उच्छिष्ट । रजः प्रेतसूतक निकृष्ट । हे पंचसूतक अरिष्ट । वीरशैवी वर्जिले ॥५६॥ अष्टावरणेसी संपन्न । लिंगवंत सूतकासी भिन्न । देह धर्मे व्यापिले अभिन्न । रवि अग्नि वायुहून कोटि गुणे विशेष ॥५७॥

॥ श्लोक ॥ वीरागमे । लिंगार्चनरता नारी रजः सूतकसंयुता रविरग्निर्यथावायुस्तद्वत्कोटिगुणं शुभं ॥५८॥

जाति जन्मरजोच्छिष्ठ प्रेतकर्मस्तथैवच । पंचसूतक निर्मुक्तो वीरशैवस्तु निश्चयं ॥५९॥

ऐसे शिवागम वचन । मानोनियास प्रमाण । पादोदक पंचामृते स्नपून । षोडशोपचारे पूजिजे ॥६०॥ ऐसे सुसंस्कृत लिंगासी । धारण कीजे शिशूसी । लिंगार्पित पादोदकासी । देवोनि स्तनपान करावे ॥६१॥ ऐसे विधियुक्त लिंग धारण । वसवंतराये करितीं तत्क्षण । मग पंचमीसी पूजन । जंगमार्चन करिताती ॥६२॥ पुढती द्वादश दिनी । बाळा करितीं पालकारोहणी । आमंत्रिले सुवासिनी । अत्यानंदे करोनिया ॥६३॥ भ्रमरवर्णी नागवेणी । हंसगमनी गजगामिनी । कमळ दळनयनी । कमळमुखी शुभांगना ॥६४॥ चित्रविचित्र वस्त्रे नेसुनी । भाळी त्रिपुंड्र शुभ्र रेखुनी । कुंकुम तिलक वरी ठेवुनी । सुगंध उटणी लेइले ॥६५॥ वाणे घेवोनि येतीं । गिरिजाईच्या गृहा प्रती । नवयुवतींच्या हृदयी येतीं । उमाळे, समारांह पाहुनी ॥६६॥ सुलक्षणी सुमधुर वाणी । कोकिळा लाजती ऐकोनि ध्वनी । जयांच्या नाशिका पाहोनी । शुकें नाशिका मुरडिती ॥६७॥ कटि प्रदेशा पाहुनी । लज्जित होय सिंहिणी वक्षस्थळा देखुनी । चक्रवाकें लाजतीं ॥६८॥ जैसे कर्दळी सरळ । हस्तपाद अंगुळी अविरळ । अशिरे मृदु मंजुळ । अरुण वर्णी शोभती ॥६९॥ ऐशा पतिव्रता शुभांगना । येती बाळाचिया

पाळण्या । बाळा प्रौढा मुग्धा जाणा । आनंदाने येताती ॥७०॥ तव गिरिजाईसी प्रावर्ण । श्रेष्ठ पीतांबर सुवर्ण । बाळा जरतारी अंगरक्षा जाण । लेववितीं सुवासिनी ॥७१॥ हरिद्रा कुंकुम लेवितीं । स्वर्णालंकारे रत्नदीप्तीं । बाळा लागी श्रृंगारिती । वस्त्रालंकारे करोनी ॥७२॥ मग सकळी कुंकुम लेइले । वाणे अर्पिती आपुलाले । बाल राजा निजविले । श्रृंगारित पालखांमाजी ॥७३॥ गावागे लगबगी । नसता मूक होईल बाळ योगी । गातीं पिकस्वरे मंगलांगी । संयुक्त ध्यानें करोनी ॥७४॥ दुरित तम दिवाकरा । शिवज्ञान प्रभाकरा । वेदागम सारा । जो जो शिव कवि कुला भरणा ॥७५॥ शरण शाश्वत चिदाकारा । चिद्घन चित्सुधा करा । साकार निराकारा । आलंब रहिता जो जो रे ॥७६॥ तू सकल निःकल । सत्य सद्रूप नित्य निर्मल । शिव स्मरण सदानंद अविरळ । सत्य शील जो जो रे ॥७७॥ शिव निंदकारण्य दावानल । शिव मतोद्धार परम गुरु दयाळ । पाखंड मत कुज कुठार सोज्वळ । लिंगांग समरसी जो जो रे ॥७८॥ नित्य जंगम दासोहि । सत्य शरण मार्ग प्रदीप पाही । शिवमत वारिधि पूर्णचंद्र विदेही । भक्ति भंडारि जो जो रे ॥७९॥ क्रूर षड्वैरि शिरच्छेद वीरा । षडविकार षडूर्मिदूरा । षटस्थल ज्ञानपूरा । यतिवर्या शौर्या जो जो रे ॥८०॥ ऐसे गाती चंद्रानना । विचारितीं यजमाना । शिशूच्या नाम करणा । सांगा लवकरी म्हणतातीं ॥८१॥ तव सांगती बसवंतराय । ठेवा शुभ नाम शिवलिंगराय । तथास्तु म्हणोनी त्रिवार पाहे । नामांकितासी ठेवितीं ॥८२॥ वाणे देवोनि ते समई । विडे घेवोनि लवलाही । नागवेणी पाही । स्वग्रहासी जाताती ॥८३॥ तव आजोळीहून । आणिले वस्त्रालंकार सुवर्ण । पिंपळपान बिंदल्या जाण । वाळे घुंगरू पायांत ॥८४॥ अंगुलीसी मुद्रिका सुंदर । कंठी बसवराज ताइत शुभ कर । ऐसे बाळासी बाळ श्रृंगार । आणिलेती बहुविध ॥८५॥ गिरिजादेवीसी तव । आनंद झाला अभिनव । मम संकटगिरी ओलांडुनी उदय । झालासीरे दिवाकरा ॥८६॥ म्हणोनिया आनंदे गाई । स्तन पान करोनि पालखा निजवी । नित्य नूतन प्रेमाची नवाई । सांगता धणी पुरेना ॥८७॥ ऐसे बाळासी रक्षण करिती । सति पति आनंद पावती । बाळाचे बाललीला चित्ती । संतोषतीं पाहोनी ॥८८॥ परब्रम्ह लिंग हस्तीं धरोनी । लाथाडितो माये लागुनी । हुंकारे काम क्रोधा झणी । दवडीन ऐसा भास करी ॥८९॥ हरिसुर ज्येष्ठ मनु मुनींना । नातळे जो पर ब्रम्ह राणा । तो मज वश झाला जाणा । म्हणोनी हांसे शिवलिंग ॥९०॥ ऐसे गेले दिवस मास । जाहले बाळा एक वर्ष । अंबा घाली उठे बैसे । चालण्याचा हव्यास ॥९१॥ शिकला निघंटु एकाक्षर । आई ताबा मामाक्षर । मग द्वि अक्षर साचार । ताता बाबा मामादी ॥९२॥ पुढे त्रिअक्षर चतुराक्षर । बोबडे बोलतो सुंदर । माता पितयासी हर्ष फार । चारी प्रहर न पुरती ॥९३॥ कडिये घेता न राहे । चालण्याचा हव्यास पाहे । खेळू म्हणे बालकांसवें । पंचाक्षरी पूर्ण झाला ॥९४॥ गिरिजाईसी अति प्रीती । बोबडया बोला चुंबिती ।

मस्तक आघ्राणिती । हृदयी धरिती बाळासी ॥९५॥ सर्वांच्या कडेवरी शिवलिंग । सगळ्या बिदीमाजी शिवलिंग । सर्वत्रांच्या गृही शिवलिंग । ऐसा निःसंग वागतसे ॥९६॥ सर्वत्रांच्या दृष्टिमाजि शिवलिंग । कैंचा दृष्टि दोष तयासी, अभंग । ऐसा विचरे विदेही अव्यंग । धुळीमाजी बाळांसवे ॥९७॥ येती पिता बाहेरुनी । खेळे धुळीमाजी सुगुणी । अरेरे शिवलिंगा खेळणी । ऐसेचि कारे धूळींत ॥९८॥ येत नाही घलासी । खेळतो आहे पोलासी । तुमी जाना घलासी । पूजेसी वेळ झाला म्हणे ॥९९॥ बाळाचे ऐकोनि वचन । पितयांचे आनंदे अंतःकरण । कडिये घेवोनि सुगुण । गृहा येती लगबगी ॥१००॥ कुठे आहे शिवलिंग । ऐकता बाहेर ये देवी सवेग । हे पहा याचे अंगोपांग । अवधूत चांग झालासे ॥१०१॥ तैल माखोनि स्नान घातले । अंगणीच खेळत होता ये वेळे । नावेक गृहा आंत गेले । चुका मूक भले करितो हो ॥२॥ अरेरे म्हणोनि गिरिजाई । शिवलिंगा कडिये घेई । कैसे खेळतो बाई । धुळीमाजी बशुद्ध ॥३॥ ऐसे झाले पंच वर्ष । ऐकेना हा म्हणती सहर्ष । उदयीक विजय दशमीस । लिहावयासी पाठविजे ॥४॥ नसता हा उदंड होईल । मग अंग नाही वांकेल । तव जड जाईल । लिहावयासी बाळका ॥५॥ सत्य आहे म्हणून । दशमीसी गुरु बलाउन । पाटी पूजा करिती जाण । शिवलिंगाचे ते समई ॥६॥ खेळो की लिहो । पाटी पूजा तरी केली हो । शाळेमाजी पाठवावे हो । गुरुसी ठेवा नसता गृही ॥७॥ मजला तरी ऐकेना । हा कुणासीच भीना । खोड्या करी तो नाना । दिवस भरी ॥८॥ ऐसे बोले गिरिजादेवी । बसवंतराये हंसर्ता पाही । बाळाच्या खोड्या केंव्हाही । ऐशाच नाही का असती ॥९॥ लडिवाळ बाळ शिवलिंग । बाळलीलेंत दिवस अव्यंग । कुणीकडे जाती चांग । माता पितया आनंदे ॥१०॥ दिवस झाले दशवर्षं । सुशील सुगुणी बोले सुरस । स्वरूप सुंदर गोंडस । मुलामाजी निवडतसे ॥११॥ माता पितयांची आज्ञा नुल्लंघी । प्रातःकाळी उठे वेगी । शौच मुखमार्जन करी लगबगी । भाळी भस्म लावीतसे ॥१२॥ आल्या अतीता भिक्षा वाढी । नमस्कार करी अति आवडी । धन्य धन्य म्हणती देवडी । माजी पुत्ररत्न जन्मले ॥१३॥ शाळेंतही प्रेमे जाई । गुरुजीसी नमस्कारी पाही । जवळीच बैसविती तेही । शिवलिंगासी ॥१४॥ शिवलिंगा पाहोनि गुरुसी । आनंद होतसे अहर्निसी । प्रथमचि येई शाळेसी । आधीं सकळा मुलांच्या ॥१५॥ शाळा सर्व स्वच्छ करी । गुरूंचे आसन घाली स्वकरी । येताचि नमस्कारी । सर्वा आधी आपण ॥१६॥ एकदा पाठ देता गुरूनी । पुनः न पुसे क्षणोक्षणी । पाठ करोनिया झणी । सर्वां आधी स्वस्थ बसे ॥१७॥ ऐसा सद्गुणी तैल बुद्धि । ऐकताचि पाठ होय स्वबुद्धि । गुरु लागी उपाधी । शिक्षणाची नाहीच ॥१८॥ एकदा माता पिता विचार करिती । अर्पिलो शिवलिंगा गुरु चरणा प्रती । आता ही मायीक_भ्रांती । सोडोनि जावे गुरु सदना ॥१९॥ मी संकल्प सोडिले पुत्रासी । चला जाऊ गुरु सदनासी । म्हणोनिया

भरले परसी । गाड्यामाजी झडकरी ।।१२०।। इष्टमित्र बांधवासहित । सतिपति येति द्रोणपुरा प्रत । बसवलिंग स्वामी असती तेथ । श्री चरणी अर्पिती शिवलिंगा ।।२१।। तुमचिया पुत्रा तुम्ही घ्यावे । लोटांगण घालिती लवलाहे । शिवलिंगा मांडीवरी पाहे । घेती गुरुवर्य बसवलिंग ।।२२।। इकडे जंगमार्चन रचिले । बाळासी अंतु कौपीन धारण केले । जय वाद्येसी मिरविती भले । शर्करा वांटिले ग्रामांत ।।२३।। जंगमार्चना झालियावरी । सतिपतींसी गरु अहेर करी । गुरु काणिका देवोनि ते अवसरी । गृहा येती पाटील ।।२४।। मग पंडितासी बलावुनी । शिक्षणा ठेविती गुरु सदनी । विद्याभ्यास ते क्षणी । शिवलिंगासी करविती ।।२५।। प्रथम श्रीकार ॐकार । मागाहुनी पंचाक्षर । बावन्न मातृका सुंदर । कानडी रूपे शिकविती ।।२६।। यांचा अर्थ मजलागी । सांगिजे म्हणती गुरु लागी । ऐकोनिया तव गुरूजी । सांगती अर्थं मरिदेवा ।।२७।। हा तरी बाळचि आहे । अर्थं विचारी गांभीर्य । विचारवंत पूर्ण होय । सांगेन म्हणती पूर्वेतिहास ।।२८।। पूर्वी एकदा कैलासी । विद्याभ्यासा षण्मुखासी । पाचारोनिया ब्रम्हयासी । अज्ञापिती महेश ।।२९।। आता षण्मुख झालासे सुज्ञ । तू आहेसी आमुचा दैवज्ञ । तरी शिक्षण देवोनि प्राज्ञ । षण्मुखासी करावे ।।३०।। म्हणोनि सोपिले ब्रम्हयासी । नित्य येवोनि कैलासासी । आरंभी सांगे प्रणवासी । षण्मुख सी चतुर्मुख ।।३१।। षडानन म्हणे याचा अर्थ । सांगाकजी निरवार्थ । अर्थाविणे अनथ । शिक्षणाचा होतसे ।।३२।। तव चतुरानन मनी दचकला । न सांगू तरी मूर्खत्व ये मजला । तव द्वादश लक्ष ग्रंथ सांगितला । प्रणवासी अर्थ चतुराननें ।।३३।। तव म्हणती कार्तिकेय । आणीक पुढती काय आहे । खुंटली माझी शक्ती पाहे । आपणा लागी या पुढती ।।३४।। आता चलावे मधुसूदना जवळी । आपणा सांगेल पुढची ओळी । म्हणोनिया तये वेळी । केशवा जवळी पातले ।।३५।। मग तेणे सांगितले । द्वादश लक्ष ग्रंथ भले । तव कृत्तिवासात्मज बोले । झाले काहां अर्थांतर ।।३६।। माझी तरी मती खुंटली । चलावे त्र्यंबका जवळी । मग येती कैलासाचळी । षडाननासहीत ।।३७।। नमन करोनि मृत्युंजयाप्रती । आद्यंत वर्तमान सांगती । तव द्वादश कोटी ग्रंथ गणती । माहेश्वरे सांगती ।।३८।। आणीक पुढती काय आहे । सांगाकीजी लवलाहे । ऐकोनि कोपाविष्ट होय । गिरिजा पति तेधवां ।।३९।। तूचि सांगे पुढतीं आता । म्हणता बोले षण्मुख तत्वता । कैसे बैसतीं श्रोतावक्ता । सांगोनि श्रुत्यर्था ऐकिजे ।।४०।। तव रागा रुद्र झाले शंकर । गर्वे फुगलासी वाटते फार । तरी सप्त जन्मे गर्भवास घोर । मर्त्यलोकी घेईजा ।।४१।। म्हणोनि शापिला कार्तिकेय । अद्यापी अवतार घेती पाहे । ते प्रणव अनंत अपार आहे । ब्रम्हादिकां अगोचर ।।४२।। तेथे मी किंचिज्ञ पामर । कैसा सांगेनजी अर्थांतर । मूल मंत्राच्या उदरी साचार । चतुर्दश विद्या जन्मले ।।४३।। सप्त कोटी मंत्रालागी । उपमंत्रे अगणित सवेगी । यया सर्वत्रा लागी । मातृस्थान पंचाक्षरी ।।४४।। ऐसे

श्री. ह्रा.

ऐकोनि बोले योगी । कैसे संबंध परशिवालागी । याचा सुविचार मज लागी । सांगाकीजी गुरुवर्या ॥१४५॥ ते प्रणवचि शुद्ध । ॐकारेश्वर प्रसिद्ध । साकार निराकार विशुद्ध । जहालासे त्रैलोकी ॥४६॥ तरी तया प्रणवाचा भेद । ऐकावेजी निर्विवाद । हा श्रुति मत अभेद । श्रवण कीजे स्थिर मने ॥४७॥

॥ शिवगीता ॥ वदंति यत्पदंवेदाः शास्त्राणि विविधानिच । सर्वोपनिषदांसारं दध्नोघृतमिवोद्धृतं ॥१४८॥

जयासी वेदशास्त्रे वर्णिती । सर्वोपनिषदाचे सार म्हणती । जैसे दह्यांतून लोणी काढिती । साररूपे जाणिजे ॥४९॥

यदिच्छंतो ब्रम्हचर्यंचरंतिमुनयः सदा । तत्ते पदंसंग्रहेण ब्रवीम्यों मितियत्पदमं ॥१५०॥

जयाचिया प्राप्ती लागी । ब्रम्हचर्य धारण करिती योगी । ते अकार, उकार, मकारात्मक जगी । मत्पदाते वर्णीन ॥५१॥

एतदेवाक्षरं ब्रम्ह चैतदेवाक्षरंपरं । एतदेवाक्षरं ज्ञात्वा योयदिच्छति तस्य तत् ॥१५२॥

हेचि जाण अक्षर ब्रम्ह । हेचि सगुण निर्गुण ब्रम्ह । यया अक्षर ब्रम्हा जाणून । इच्छितार्था पावती ॥५३॥

एतदालंबनं श्रेष्ठमेतदालंबनंपरं । एतदालंबनं ज्ञात्वा ब्रम्हलोके महीयते ॥१५४॥

हेचि श्रेष्ठ सकलाधार । हेचि परमतारक मंत्र । यया जाणोनिया पामर । पूज्य शिवलोकी होय ॥५५॥

छंदसांयस्तु धेनूना मृषभत्वेनचोदितः । इदमेवावधिः सेतु रमृतस्यचधारणात् ॥१५६॥

जो वेदरूपी धेनूंचा पति । ऐसे वेदांत प्रतिपादन करिती । हाचि संसारांबुधिसेतु निश्चिती मोक्षाचा ॥५७॥

मेदसा पिहितं कोशं । ब्रम्हणोयत्परंमतम् । चतस्त्रस्तस्य मात्राःसुरकारोकारकौ तथा ॥१५८॥

ती वस्तू कैसी आहे । तयाचे वर्णन ऐकावे । मेदाच्छादित कोशी पाहे । हृदयाकाशी परब्रम्ह ॥५९॥ तयासीची म्हणती ओंकार । हेचि एकाक्षर मंत्र ।ययामाजी त्रिभुवन समग्र । सामावोनि राहिले ॥६०॥

श्रुतिः सोयमात्माऽध्यक्षर मोंकारोधिमात्र पादमात्रा मात्राश्चपादा अकार उकारो मकारः इति मांडुक्य । मकारश्चावसानेऽर्धमात्रेति परिकीर्तिता ।

पूर्वत्रभूश्च ऋग्वेदो ब्रम्हाष्टवसवस्तथा । गार्हपत्यश्चगायत्री । गंगा प्रातःसवस्तथा ॥१६१॥

तयाचे मात्रा चार । अकार उकार मकार । अंतीचा कारण रूप साचार । अर्ध मात्राते जाणावे ॥६२॥ प्रथम अकार रूप मात्रेंत । भूर्लोक, ऋग्वेद, ब्रम्हदेव तिष्ठत । अष्टवसु गार्हपत्याग्नि गायत्री छंद । प्रातःसवन आठ देव वसताती ॥६३॥ दुजिया उकार मात्रेंत । भुवर्लोक विष्णु, रुद्र, अनुष्टुपछंद । यमुना नदी दक्षिणाग्नी यजुर्वेद । माध्यंदिन सवन वसताती ॥६४॥

तृतीयाचसवः सामान्यादित्यश्च महेश्वरः । अग्निराहवनीयश्च । जगतीच सरस्वती ॥१६५॥

तिसरी मकार मात्रेंत । स्वर्लोक सामवेद आदित्य । महेश्वर आहवनीयाग्नी जगती छंद । सरस्वती अथर्ववेद । तृतीय सवन वसताती ॥६६॥

तृतीयंसवनं प्रोक्त मथर्वत्वेन यन्मतम् । चतुर्थीयावसानेऽर्धमात्रा सा सोमलोकगा ॥१६७॥

अथर्वांगिरसः संवर्तकोग्निर्मरुतस्तथा । विराट्सभ्या वसथ्यौचशुतुद्रिर्यज्ञपुच्छकम् ॥१६८॥

चतुर्थ मात्रा सोमलोकी जाण । अथर्वांगिरस गाथा संवर्तकाग्न । महर्लोक, विराट, सभ्य, आवसथ्याग्न । शुतुद्री नदी यज्ञपुच्छ अर्धमात्री वसताती ॥६९॥

अमात्रश्चतुर्थोऽव्यवहार्यः प्रपंचोपशमः शिवोद्वैत एवमोंकार आत्मेव संविशत्यात्मनाऽत्मानं य एवं वेद य एवं वेद ॥१७०॥

अवस्था त्रयाहूनि पर । अमात्रिक तुरीय आत्मा साचार । वाच्य वाचकरूपी वाणीचे मलदूर । करोनि अव्यवहार्य असे ॥७१॥ तथा प्रपंच रहित । शिव स्वरुप अद्वैत । हे उच्चार कृत सत्य । ओंकारचि आत्मा असे ॥७२॥ तो स्वात्म्यासह निश्चित । परमात्म स्वरूपी प्रवेशत । जन्म कारणासी लय करीत । पुनरावृत्तीसी खंडितो ॥७३॥ पहिली मात्रा रक्तवर्ण । दुजी ते भास्वरा जाण । तिजी विद्युल्लते समान । शुभ्रवर्ण चतुर्थं पै ॥७४॥

सर्वं जातं जाय मानं तदोंकारे प्रतिष्ठितं । विश्वंभूतंच भुवनं विचित्रं बहुधा तथा ॥१७५॥

मागा झाले जे उत्पन्न । पुढती होणार जाण । सकल चराचर भुवन । ॐकारीच प्रतिष्ठिले ॥७६॥

जातंच जायमानंच । तत्सर्वं रुद्र उच्यते । तस्मिन्नेवपुनः प्राणाः सर्वसोंकार उच्यते ॥१७७॥

भूत भविष्य रूप हे संसार । रुद्र रूपचि जाण चराचर । आणीक प्राण ओंकार । रुद्रामाजी उपस्थित ॥७८॥ शिव आणि ओंकार । अभेद जाणावे साचार । ऐसा तो ॐकारचि ईश्वर । नामरूप अभिन्न ॥७९॥ ऐसा वेदाचा उदय । ॐकारीच जाण निश्चय । आणीक एक विषय । आठवतो ये समई ॥८०॥ नृत्तावसानी नटराज । वाजवी डमरू नवपंचवार सहज । सनकादि सिद्धांच्या उद्धारा निज । शिव सूत्रजाल प्रकटले ॥८१॥ ते चतुर्दश सूत्रे जाण । माहेश्वराणि सूत्राणि । माहेश्वर प्रसादाने । पाणिनीसी लाभले ॥८२॥

नृत्तावसाने नटराज राजो । निनादढक्कां नवपंचवारं । उद्धर्त्तु कामः सनकादि सिद्धानेतद्विमर्शे शिवसूत्र जालं ॥१८३॥

येनाक्षर समाम्नाय मधिगम्य महेश्वरात् ।

प्रणव आणि शिव । एक रूपचि सदैव । तया पासोनि वेद समुह । म्हणोनि शिवचि शास्त्र योनि ॥८४॥ सकळ विद्यांचा ईश । जाणिजे

हो महेश । भूताधिपति ब्रम्हाधिपति सर्वश । तो जाण सदाशिव ॐकार ॥१८५॥ वेदांची अंगे सहा । छंद कल्प व्याकरण पहा । शिक्षा ज्योतिष्य निरुक्त सहा । शब्द सृष्टीसी साक्ष देती ॥८६॥ पुढे जाणा अष्टादश स्मृति । एकावी त्यांची गणती । जे का धर्मा धर्मांचे न्याय सांगती । मानवांसी ॥८७॥ मनु, अत्रि, विष्णु, हारित । याज्ञवल्क्य, उशना, आपस्तंभ, संवर्त । अंगिरस, कात्यायन, गुरु, पराशर, विश्रुत । व्यास, शंख दक्षस्मृति ॥८८॥ गौतम शातातप वसिष्ठ । या स्मृति जाण दशाष्ठ । या नांव धर्म शास्त्रे श्रेष्ठ । मनु मुनींनी कथियेले ॥८९॥ आता अष्टादश पुराण । ऐका नांवे विचक्षण । स्कंद, कूर्म, लिंग वामन । वराह, मत्स्य, मार्कंडेय ॥९०॥ ब्रम्हांड, वायु, भविष्य । आणीक शिवपुराण हे दश । शैव पुराणे विशेष । लोकामाजी प्रसिद्ध ॥९१॥ भागवत गारुड वैष्णव । नारद पुराण चार वैष्णव । पाद्म, ब्रम्ह, दोन्ही ब्रम्हदेव । ब्रम्ह वैवर्त, अग्नि, अनलाचे ॥९२॥ ही झाली अष्टादश पुराणे । ईश, केन, कठ, मुंडक, जाण । मांडुक्य, छांदोग्य, ब्रम्हदारण्य । ऐतरेय तैतरीय श्वेताश्वतर दश ॥९३॥ महानारायण, नारायण । हंस कालाग्नि रुद्र कात्यायन । बृहज्जाबाल परम हंस बाष्कळ जाण । तेजोबिंदु, ब्रम्हबिंदु ॥९४॥ प्रश्न, आरुणिक, अमृतबिंदु । बोद्धायनीय वाजसनीय नादबिंदु । अश्वलायनीय, मैत्रायणीय, वृद्ध । सांख्यायणीय शौनकीय ॥९५॥ शिवसंकल्प भागुरायणीय । तळवकार मुद्गल मैत्रेय । कौषीतकी ब्राम्हणादि पहावे । उपनिषदे हे षट्त्रिंश ॥९६॥ अथर्व शिर अथर्वशिख । भस्मज्जाबाल रुद्राक्षजाबाल देख । तैसेचि योग शिख । अष्टोतर शत उपनिषदे ॥९७॥ ऐसेही उपनिषदे । शताधिक असती विशद । कर्मकांडाविरहित प्रसिद्ध । शिवज्ञान प्रतिपादिती ॥९८॥ आता ऐकावे आगमांचा भेद । कामिक, योगज, सुप्रभेद । कारण अजित, वाम, दीप्त, सिद्ध । सूक्ष्मागम, सहस्रांशु ॥९९॥ विजय, निश्वास, स्वायंभुवागम । अनल, पाशुपत, चंद्रज्ञान । ललित, मुकुट बिंबागम । किरणागम, शांत प्रोद्गीत ॥२००॥ सर्वोत्तर पारमेश वातुल । वीरागमादि अष्टाविंश निश्चल । दिव्य सिद्धांत शास्त्रे विपुल । जाणावे हो सर्वज्ञे ॥२०१॥ वेदवेदांतादि, उपपुराण । उपवेद अष्टादश विद्या जाण । आणिक षण्मत शास्त्रे प्रमाण । शास्त्र समूह षट्त्रिंश ॥२॥ अनेक देशभाषा बहुळ । यांसी शतार्ध मातृकाची मूळ । हें सर्वही शब्दजाल । जन्मले पहा ॐकारी ॥३॥ इवलेसे दिसे वटबीज । तयांमाजीच जन्मला वृक्षराज । हा बीज वृक्ष न्याय सहज । सुप्रमाण असे की ॥४॥

यो वेदादौस्वरः प्रोक्तो वेदांतेच प्रतिष्ठितः । तस्मै प्रकृति लीनस्य यः परः स महेश्वरः ॥२०५॥

वेदाच्या आदि जे स्वर । वेदाच्या अंती प्रसिद्ध थोर । तया प्रकृतीत लीन साचार । म्हणती परात्पर महेशत्या ॥६॥

आदिप्रणवपीठंस्या दकारोमध्य मेवच । उकारो गोमुखंचैव मकारो वर्तुलं तथा ॥२०७॥

नालोबिंदुर्महा तेजो प्रणवश्चाखंड लिंगकं ।

तो महेश्वरचि लिंगाकार । आदि प्रणव पीठाधार । मध्य जाणिजे अकार । उकार हे गोमुख ॥२०८॥ मकार तेचि वर्तुळ । बिंदुमहातेजो नाळ । नादश्चाखंडलिंग केवळ । प्रणवते लिंगरूप ॥९॥

नकारश्चादिपीठंच मकारो मध्यमेवच । शिकारो वर्तुलंचैव वकारो गोमुखं तथा । यकारो बिंदुरेवस्या त्प्रणवो लिंगमुच्यते ॥२१०॥

आदि पीठ हे नकार । कटि जाण मकार । वर्तुळ जाणावे शिकार । गोमुख वकार जाणावे ॥११॥ बिंदू ते जाणिजे यकार । ऐसे हे प्रणवाक्षर । लिंगरूपचि साचार । जाणावे हो निरंतर । सद्भक्ती ॥१२॥

मूलमंत्रस्वरूपाय मूलमंत्रात्मरूपिणे । मूलप्रकृतिसंज्ञाय मूलस्तंभाय शंभवे ॥२१३॥

तू मूल मंत्राचा स्वरूप । आणि मूल मंत्राचा आत्मरूप । मूल प्रकृति तुझे नामरूप । मूल स्तंभाय शंभवे नमो ॥१४॥ आणिक ऐके प्रणव लिंगरूप । षटस्थलात्मक स्वरूप । जो इष्ट प्राण भावरूपे । अंतरंगा वेधला ॥१५॥

आचारं गौरवं वृतेर्मध्येलिंगं व्यवस्थितं । गोमुखे चरलिंगंच प्रसादो वर्तुले तथा ॥२१६॥ गोलकेचमहद्रूपं मिष्टं षड्विध मीरितं ॥२१७॥

वृत्तपीठी आचारलिंग । कटिमाजी गुरुलिंग । वर्तुळ ते शिवलिंग । गोमुख चरलिंग जाणिजें ॥१८॥ नाळयकार प्रसादलिंग । गोळक ॐकार महालिंग । ऐसे षडवर्णात्मक शिवलिंग । सद्भक्तानी जाणावे ॥१९॥

वेदादिमूलं प्रथमस्वराणां त्रयोदशस्थं शशि सूर्य बिंबं । नादात्मकं सुप्तभुजंगरूपं त्रितत्वतीतं प्रणमंनमामि ॥२०॥

जो वेदादिकांसी आहे मूळ । स्वरामाजी प्रथम स्वर केवळ । त्रयोदशस्थानी अढळ । रवि शशि बिंबे प्रकाशतो ॥२२१॥




तो आहे नादरूप । निजेला जैसा घटसर्प । आणीक तो त्रितत्वातीत । ऐशा प्रणवा नमन असो ॥२२॥ ऐसा हा प्रणव साकार । अक्षर समूहासी आधार । तोचि जाण इष्टलिंग थोर । अंतनापार मनोवाक्का ॥२३॥ ऐसा उपदेश ऐकिला बालयोगी । तल्लीन झाला लिंगसंगी । श्रवणमात्रे झाला वाग्मी । म्हणती पूर्वीचा योग भ्रष्ट ॥२४॥ कोणी म्हणती अंशावतार । कुणी म्हणे अवतरला शंकर । हा केवळ शिवयोगी साचार । वृत्ती मावळल्या निजलिंगी ॥२५॥ मग सकल सज्जन । विनविती सद्गुरु लागुन ।

मरिदेवा अत्याचार सल्लक्षण । करावेजी गुरुवर्या ॥२२६॥ तव तथास्तु म्हणोनि गुरुदेव । सकळ सुविचार सांगती स्वयमेव । आमंत्रिती शुभ कार्यास्तव । यावे सहपरिवारे म्हणुनी ॥२७॥ सकल पूजोपचार संग्रहिले । गुरु आल्यासी श्रृंगारिले । दीक्षा मंडप सुसज्ज केले । सद्भक्तानी तेधवा ॥२८॥ चांदवा देवोनि मठा भीतरी । तयासी लाविले हंडे झल्लरी । चित्रविचित्र नानापरी । भिंती चित्रे रेखिली ॥२९॥ दीक्षा मंडपा लागोनी । कर्दळी स्तंभे रोविली सुलक्षणी । पंचपल्लव आणोनी । श्रृंगारिती मंडप ॥३०॥ सामुद्रिकासी बलाउन । पाहाती बाळयोगीचे कर चरण । तव शंख चक्र पद्म रेखा धन । दिसती शुभ चिन्हे आयुरैश्वर्यादि ॥३१॥ द्वय चरणी श्रेष्ठ पद्म । सामुद्रिकासी उतरले श्रेष्ठतम । आजानु बाहु आकर्ण नेत्र परम । शिवयोगी निश्चये म्हणताती ॥३२॥ सुवर्ण कांतीं अंग सोज्वळ । आरक्त सुकोमल करपाद तळ । करपाद शाखा मृदुल सरळ । रक्त कमळा समान ॥३३॥ चंपक नाशिका विशाल भाल । दंतपंक्ति अति निर्मळ । बिंबोष्ठ आरक्त सुकोमल । ध्वनि मंजुळ गंभीर ॥३४॥ सकल सुकृतांचा पुंज । एकवटोनिया सहज । अवतरले की शिवराज । भक्तोद्धारा कारणे ॥३५॥ शास्त्रज्ञ म्हणती तेधवा । जैसा भक्ति भंडारी बसवा । तोचि द्वितिय शंभु आला जाणावा । हा भक्ति भंडारी निश्चये ॥३६॥ ज्ञानामाजी चन्न बसव । वैराग्यामाजी प्रभुदेव । औदर्यामाजी स्वयमेव । भोळा शंकर जाणिजे ॥३७॥ सदाचारी क्रियावंत । चतुःषष्ठी शील संयुत । जंगम प्राणी होईल निश्चित । सत्यसत्य त्रिवाचा ॥३८॥ बसवलिंग गुरुवर्य । श्रवण करोनि सुखभाव । आनंदे भरोनि अष्टभावे । बाळयोगीसी हृदयी धरी ॥३९॥ अंगशुद्धि कारणे तेधवा । क्षौरकर्म करविती बरवा । धिक्केशान्वपेन्मंत्रे तेव्हां । केशवपना करविती ॥४०॥ इमंमेगंगे यमने । म्हणोनि करविती पंचामृते स्नान । संयोजननी मंत्राने । पंचगव्य प्राशविती ॥४१॥ औट हस्त प्रमाण । भूशुद्धीच्या कारणे । कोळसे खर्पर अस्थि जाण । काष्टे शिला शोधिती ॥४२॥ मृत्तिका शोधोनी सत्वर । सप्त मृत्तिके केले प्रपूर । माजी पंचरत्ने परिकर । शुभ्र मृत्तिके संम्मार्जिले ॥४३॥ षटसंमार्जने करोन । पंचरंग मेळवून । अष्टदळ कमळ रेखुन । रंगवल्ल्या घालिती ॥४४॥ मंडपाच्या चतुर्द्वारी । दर्पणादि बांधिती कुसरी । दिव्यांबरे तयावरी । आच्छादिती मंडपा ॥४५॥ दोभागी दोन समया । दिव्य तेजे झळकतीं ज्योतिया । तव सुगंध दशांगे धूपारतिया । सुगंधाने धूपति ॥४६॥ गद्दिगीवरती शुभ्र कंबलासन । घालिती गुरुवर्या लागुन । पुढती पंचकलश स्थापोन । तीर्थोदकें भरिताती ॥४७॥ माजी पंचरत्ने घालिती । उपरी पंचपल्लव ठेविती । पंचवर्ण वस्त्रे झांकिती । कलशावरी ॥४८॥ सप्त मृत्तिका आणिले । पत्रपुष्प संग्रहिले । षोडशोपचार सिद्ध केले । नैवेद्यांत करोनी ॥२४९॥ तव भृत्याचारिया

करवी । पंच कलश पूजिती लवलाही । आचार्यावाहन करोनि पाही । पंचाचार्य बैसविती ॥२५०॥ आचार्यं पूजा करोन । सांग केले कलशार्चन । एकेक कलशा द्विभाग दक्षिणा । महाचार्यासी पूर्णभाग ॥५१॥ वृत्याचार्यासी अर्धं भाग । ऐसा आहे त्याचा भाग । अपहारी जो अन्य भाग । नर्क भोग तया घडे ॥५२॥ आगम पारमेश्वरी । सांगती गिरिजेसी त्रिपुरारी ।

॥ पाशुपत आगमे ॥ एवं शास्त्रोक्त विधिना । पंचमान्कलशानपि संपुज्य फल नैवेद्यस्सतांबूलैः सदक्षिणैः ॥२५३॥
दशधा तत्रनिक्षितैः रर्हणैः परिपूजयेत् ।
॥ पार्वत्योवाच ॥ पंचैवकलशास्तत्र निक्षिपैः परिपुजितः । किमर्थे दशधातेषां मर्हणादीनि निक्षिपेत्तू ॥२५४॥
॥ ईश्वरोवाच ॥ महाचार्याः पंचविध । वृत्याचार्यांश्च पंचधा । एवं दशविधानांतु । भागश्च परिकल्पितः ॥२५५॥

पालाश, वेणु, अश्वत्थ, वट, बिल्व, । तांम्र, कांश, रजत, स्वर्णं, लोह । सद्योजातादि पंचमुख जाणावे । कलशा परत्वे ठेविले ॥५६॥ शूलि स्वरूप जाणोन । करिताती अष्टविधार्चन । देशिके पंचपंचाक्षर स्मरोन । वस्त्राच्छादन करिती वरी ॥५७॥ मूल सूत्रासी जाणोन । मूल मंत्र अष्टोतर शत जपोन । पात्र पूजा करोन । पंचामृतादि अभिषेक ॥५८॥ त्रिविध मुद्रादिकां अभिषेकिले । आसनावरी स्थापिले । वस्त्र दक्षिणादि अर्पिले । सद्भावे करूनी ॥५९॥ मग करिती चरार्चन । षोडशोपचारे करोन । विरक्त चरपट्ट देशिक जाण । सद्भक्तगण आलेती ॥६०॥ सभाभ्यः सभापतिभ्यश्च वोनमः । म्हणोनिया चरमूर्तीना । देती कंबलासना । गुरुदेवे तये क्षणा करी घेती रजतपात्र ॥६१॥ त्यामाजी वरह दक्षिणा । ठेवोनि वस्त्राच्छादिले जाण । मरिदेवासी साष्टांग नमना । गुरुचरणासी करविती ॥३२॥ शिष्याचे मांसपिंड । करावया मंत्रपिंड । चरमूर्तीना अखंड । अनुमतीस मागती ॥६३॥ तव गुरुदेवे आज्ञा दिधले । गुरुनिरूपे ऊठ म्हणितले । ससूत्रे बैसविले समक्षम आपुल्या ॥६४॥ करिती वैदिके लिंग संस्कार । तैसेचि पूजिती शिरउरकर । त्रिसप्त वेळा परिकर । काय शुद्धि करिताती ॥६५॥ तव भेरी जयघंटा कहळिया । करणी करताळ सनया । तम्मट्टादि नपेरिया । दशविध वाद्ये वाजती ॥६६॥ भूरि संभ्रमे अभ्याचार । भूतिपट्ट दीक्षा करी गुरुवर । आच्छादोनि पट्ट वस्त्र । मंत्रराज षडक्षर उपदेशी ॥६७॥ अयंमे हस्तो भगवान् । म्हणोनि वाम करतळी देती भगवान् । यावज्जीव तव शरीरान्न । वियोजय म्हणोनी ॥६८॥ तव पादार्चन करवोनी । पादोदक गुरुलिंगा अभिषेकुनी । गुरुस्वयें सेवुनी । शेष घ्यावया आज्ञापितीं ॥६९॥ तव शिष्ये नमस्कारोनी । भवभूज कुठाराय म्हणोनि । अज्ञानगिरिवज्राया लागुनी । पादतीर्थायतेनमः ॥७०॥



॥ श्लोक ॥ भवभूज कुठाराय रोगपंकस्य भानवे । अज्ञानगिरि वज्राय । पादतीर्थायते नमः ॥२७१॥

सप्त सागरा जावोनी । जाहला जरी समुद्र स्नानी । गुर्वंघ्रि जलबिंदू लागुनी । सहस्रांसे न पुरती ॥२७१॥

॥ श्लोक ॥ सप्त सागर पर्यंतं तीर्थस्नान यथा सलं । गुरोरंघ्रि जलबिंदु सहस्रांशे नपूरयेत् ॥२७२॥

पादोदके लिंगा अभिषेकिती । त्रिविधोदक सेविती । त्रिविध मळ निश्चिती । पादोदके धूतले ॥७३॥

॥ श्लोक ॥ जंगमं पादतीर्थंच लिंगमज्जन मुतमम् । पंचांगुल्युध्धरेद्देवी सद्योन्मुकिनसंशयः ॥२७४॥

शरण सतीचे लग्न । लिंगय्या सवे लाविती जाण । मंगळाष्टके म्हणोन । अक्षतारोपण करिताती ॥७५॥ ॐ ब्रम्हणे धारणंमे अस्तु । म्हणोनि शिष्य कंठी बांधिती चिद्वस्तु । मग सकळ चरमूर्ति स्वस्त्यस्तु । म्हणोनि आशिष देताती ॥७६॥ गुरु नाम ते शिष्य नाम । शिष्य नाम ते गुरु नाम । शिष्यचि पुढती गुरु जाण । सजीव शरदः शतम् ॥७७॥ आत्मा वैपुत्र नामासी । अधिकारी झालासे निश्चयेसी । पादुका स्वामी म्हणोनि ते समयासी । शुभ नामासी प्रसिद्धले ॥७८॥ तांबूलामाजी लिहून । बांधिती मणिबंधी गुरु कंकण । मग देती आशिर्वचन । सजीव शरदां शतम् ॥७९॥ मग आपुले आश्रमा अनुसरोनी । कंथा कमंडलूकपनी । किरीट कुंडले ठेवुनी । देती अश्वत्थ दंडाग्र ॥८०॥ सभांगणी भिक्षाटण । करितीं पादुका स्वामी ते क्षण । करितीं दक्षिणा गुरुसी अर्पण । नमस्कार पूर्वक ॥८१॥ दिधले शिष्या चरपट्टाधिकार । तैसेच ते दिव्यांबर । उत्तमांगी शिरपेंच सुंदर । मौक्तिक तुरा खोविले ॥८२॥ कंठी घालितीं चंद्रहार । मल्लिका माला सुगंध शुभ्र । अंगुळी मुद्रिका मनोहर । रत्न कोंदणी झळकतसे ॥८३॥ मग सुखासनावरी आरूढवोनी । सकल विरुदावळीसह ते क्षणी । गज तुरंगावरी आरूढोनी । चालिले मिरवणुकी चरवर्य ॥८४॥ सद्भक्त माहेश्वरांची मांदी । दर्शना जावया नाही सांदी । मंगळारत्या घेवोनि आनंदी । गाती ललना मंगळगीते ॥८५॥ अनेक वाद्यांचा गजर । नादे कोंदले अंबर । द्रोणपुरींचे जन निर्भर । जयजयकारे गर्जतीं ॥८६॥ चारी बाजार मिरविले । जयजयकारे मठासी आले । मंगळारतीं ओवाळिले । नव गुरुवर्या लागोनी ॥८७॥ सयस्रावधि नारिकेळ । फोडोनि प्रसाद वांटितीं सोज्वळ । मूल गुरु समाधीसी तये वेळ । साष्टांगेसी नमितातीं ॥८८॥ येवोनिया ते समई । सिंव्हासनी आरूढती लवलाही । कासपट्टि फोडोनि पाही । अधिकारियां वाटिती ॥८९॥ पट्टाधिकारी आणि चरमूर्ती । देशिक आणि ग्रहस्थी । अधिकारा परत्वे देतीं । कासपट्टि तेधवा ॥९०॥ तव महा गणाराधना । मठामाजी रचिले जाणा । सर्वत्रांसी अन्न संतर्पणा । देवोनि तृप्ती करितातीं ॥९१॥ परस्थळीचे ग्रामीचे । जनमन केले तृप्त साच । बाळ वृद्ध गर्भिणींचे । डोहळे पूर्ण होतातीं ॥९२॥ आलिया अतिथीना । यजमान देतीं तांबूल दक्षिणा । पट्टचराधिकारियाना । भरजरी अहेर करिताती ॥९३॥ सर्व जीव दयापर ।

अर्पिताती अन्नवस्त्र । अतीत अभ्यागत सहस्त्रांवर । तृप्त करिती गुरुवर्य ॥२९४॥ ऐसे अधिकार परत्वे । अहेर अर्पिती स्वामीप्रत । तैसेचि अहेर दक्षिणा शिष्य सद्‌भक्त । श्रीगुरुसी अर्पिती ॥९५॥ ऐसे घेवोनि पाहुणचार । सेविती आपुले ग्रामांतर । समस्त गुरुजना बोलावोनि सत्वर । स्थिर होती गुरुवर्य ॥९६॥ मग नव गुरु ह्मवगि स्वामीसी । सदाचार सत्क्रिया उपदेशी । विशद करूनि मंत्रार्थासी । मंत्रमय शरीर दाविले ॥९७॥ जीवासी झाले संसार बंधन । याचे ऐकावे वर्णन । जैसे स्वप्नीचे राज्य धन । पाषाण सुरधेनू निष्फल ॥९८॥ मृगजळाचिये परी । असाच असोनि भासे नेत्री । इंद्र धनुष्याची कुसरी । भासमान ॥९९॥ ऐसा हा नाशिवंत संसार । सर्वस्वी खोटे निर्धार । यद्दृष्टं तं नष्टं खरोखर । सत्य जाण श्रुति वाक्य ॥३००॥ मनचि आहे जाण । बंधमोक्षासी कारण । आसक्त झाले विषई निशिदिन । तेचि बंधन तयासी ॥३०१॥ विषई अनासक्त जे मन । निर्विषई म्हणू तया लागुन । तेचि होय मोक्षा कारण । आप्त वचन साच हे ॥२॥ स्वर्ग नर्क जनन मरण । सुख दुःख बाल्य तारुण्य । असत्य नव्हेति कां सुजाण । जगामाजी ॥३॥ बाल्य वृद्धत्व पराधीन । तेथे स्वातंत्र्य कोठून । विषय सुखी भुलोनि मन । यौवनी विषई परतंत्र ॥४॥ एका एका विषयासी । भुलोनि प्राणी मुकले जीवासी । तयाची परी कैसी । ऐक निश्चये तनयारे ॥५॥ सुगंधासी मुकला भ्रमर । रसा लागी मत्स्य सत्वर । रूपासी भुलोनि संहार । पतंगाचा जाहला ॥६॥ स्पर्श विषई बंधन गजासी । शब्द विषई मृग सर्पासी । एकचि विषय एकेकासी । मरणा बंधना कारण ॥७॥ तरी मानवाची बंधन सामग्री । एक नाही या संसारी । शब्द स्पर्श रूप रस गंधांतरी । पंच विषयी मानव गुंतला ॥८॥ काय क्लेश मनो क्लेश । वाक्लेश इंद्रिय क्लेश । आत्म क्लेशादि पंच क्लेश । जीव कष्टला संसारी ॥९॥ षडविकारे सप्त व्यसन । अष्टमदे मत्त झाले मन । तरी कसे चुकेल भवबंधन । भवपाशादी जीवासी ॥१०॥ जरी शरण गेला सद्‌गुरूसी । वंचिला तो जन्म मरणासी । ना तरी अंधतमी निश्चयेसी । प्रवेशावे लागेल ॥११॥ काळाचे असे ओदन । नाशिवंत शरीर जाण । लक्ष चौऱ्यांशी माळेतुन । सुटका करून घेई जो ॥१२॥ तोचि केला जन्माचा सार्थक । ना तरी जन्मोनि निरर्थक । उणे असती का श्वान सूकरादिक । तैसाचि हा एक नारकी ॥१३॥ जळो जळो तयाचे जिणे । जो केवल भवसागरीच निमग्न । पैल तीरीचा विश्राम । घेईल कैसा बापुडा ॥१४॥ जन्मालागी एकटाचि आला । मरण समई एकटाचि गेला । मध्यंतरीचा गोतवळा । कारण झाला भवपाशा ॥१५॥ क्षणभंगुर विषय सुख । अंती देतसे महा दुःख । केलासे बुडती देख आयुष्याचा मूढमती ॥१६॥ तापत्रयाग्नीत हुरपळला । परी सुखचि मानी तयाला । नागफणाच्या छायेसी दर्दुर सुखावला । क्षणभंगुर ॥१७॥ नागाननिचा दर्दुर मूख । भक्ष्य पाहे मक्षुक । काळाच्या जबड्यांतील मानव देख । संसारासी हपापला ॥१८॥ कीजे त्यासी करी ना ।

न कीजे त्या करी प्रयत्ना । दुःखे भोगीतसे नाना । उमज नव्हेचि पामरा ॥३१९॥ जैसे पक्षी अस्त मानी । विश्रमिती वृक्षी बैसुनी । उदय होता जातीं उडोनी । उदरं भरणा कारणे ॥२०॥ तैसे जाणिजे बंधुबांधव । एकवटले संसार वृक्षी सर्व । ऋणानुबंध असे जव । तव वरी स्थिर असतीं ॥२१॥ ऋणानुबंध सरले । जैसे आले तैसे गेले । हाटी सकळी एकत्र जमले । गेले साहित्य घेउनी ॥२२॥ नाना प्रकारे कष्ट करोनी । धन संचिला अति प्रयत्नी । रक्षिला कांता पुत्रा लागोनी । मायेच्या बंधनी सांपडला ॥२३॥ आले यमाचे आमंत्रण । तव कोणी न जातीं सवे जाण । हा एकलाचि आपण । भोगीतसे कृतकर्म ॥२४॥ मलमूत्राचे आगर । पूय शोणित लाळेचे घर । अशुद्ध दुर्गधीचा पाझर । नवद्वारांतुनी फुटलासे ॥२५॥ ऐसिया अमंगळ तनूसी । सुमंगळ मानोनीं अभिलाषी । सूकरापरी विषय सुखासी । भुलला प्राणी निशिदिनी ॥२६॥ एका एका योनी । कोटि फेरा घेउनी । नाना कष्टे भोगुनी । विषय न त्यागी कुश्चळ ॥२७॥ कोटि जन्मार्जित पुण्ये करून । शिवभक्तींचे होय ज्ञान । तव गुरु कृपा संपादून । जन्म मरणा मुकतसे ॥२८॥ गुरु माउली वर्षोनिघन । शिष्याचे शमवी तापत्रयाग्न । तव होतसे पावन । मानव जन्मा येउनी ॥२९॥

॥ श्लोक ॥ तनुत्रयगतानादी मलत्रय मसौगुरुः । दीक्षात्रयेण निर्दग्ध्वा लिंगत्रय मुपादिशेत् ॥३३०॥

तनु त्रयींचे मलत्रय । दीक्षात्रये दग्ध करी स्वये । उपदेशुनी लिंगत्रय । षड्लिंगा आश्रय करीतसे ॥३१॥ तेचि बारे षटस्थल ज्ञान । नरदेहीच साधे विशेषेण । हे चुकता कवणे देही शिवज्ञान । संपादितीं मानव ॥३२॥ तव मरि देवे प्रार्थिती । गुरुदेवा षटस्थला प्रती । सांगाकीजी विस्तारे संप्रतीं । शरणागतासी ये समई ॥३३॥ तव गुरुवर्यें आज्ञापिती । बाळा ऐक षटस्थला प्रती । एकोत्तर शतस्थल विस्तृती । षोडशोत्तर द्विशतस्थले ॥३४॥ ऐके आता एकोत्तर शतस्थल । जे षटस्थलांतूनि विस्तारले । तरी तीं षटस्थले । जन्मलेसे त्रिलिंगी ॥३५॥ ऐसा हा लोमविलोम । याचा ऐका उदय क्रम । जे ऐकता निःसीम । शिवधाम प्राप्त होय ॥३६॥ एकोत्तर शतस्थल । हेंचि शिवज्ञानाचे मूळ । यासी परतत्वचि आधार केवळ । याचा समूळ ऐके आता ॥३७॥ एको रुद्रो न द्वितीयायतस्थे । शिवरुद्रादि संज्ञित । तयाचा आदि अंत । न कळे कवणा लागुनी ॥३८॥ तोचि स्वशक्ति क्षोभमात्रेण । स्थल झाले द्विविध जाण । तयाचे नामांकित लक्षण । विस्तारेसी ऐकावे ॥३९॥ तया पर शिवस्थलापासोनी । अंगस्थल लिंगस्थले दोनी । जैसे एका बीजा पासोनी । पूर्वोत्तर द्विपत्रे ॥४०॥ दोन मृद्घट जन्मले । माजी आकाश द्विभागले । प्रभेदने एकवटले । अंतराकाश तेधवा ॥४१॥ मूल शिवचि लिंगस्थल । जीवचि झाला अंगस्थल । सत्तावन्न झाले लिंगस्थल । चव्वेचाळीस स्थलांगे ॥४२॥ जैसे शिवलिंगस्थल द्विध. झाले । तैसी द्विधा झाली शक्तीं अपुल्या बळे ।

अर्धनारीश्वर म्हणितले । शिव शक्तीसी ॥३४३॥ समान धर्मिणी रूपे । संयोगे वर्ततसे साक्षेपे । विभक्त होय भिन्न रूपे । भक्त वत्सला कृपाळू ॥४४॥ अधोमखी जव होय । तव म्हणवी मायिक माय । जव होय शक्ति निर्माय । तव तीं भक्ती म्हणवीतसे ॥४५॥ शक्तीस म्हणती प्रवृत्ती । भक्तींस म्हणती निवृत्ती । प्रपंच वाढविते शक्तीं । प्रपंच विलय भक्तीने ॥४६॥ शक्तीने येती उपास्यत्व । भक्तीने जाणा उपासकत्व । ऐसे हे शक्ति तत्व । समान धर्मिणी नव्हे कां ॥४७॥ शिव आहे स्वयंभूलिंग । तयासी आत्मा झाला अंग । दोघांचे सामरस्यचि संबंध । हेचि लिंगांग समरस ॥४८॥ सवितु पद जाणावे अंग । भर्गपद ते शिवलिंग । धीमही पद समरस अभंग । गायत्री चांग सांगतसे ॥४९॥ तत्पद ते जाणिजे लिंग । त्वंपदा म्हणिजे अंग । संबंध हे असि पद अव्यंग । तत्वमसीचा निर्णय ॥५०॥ अंगचि शक्ति जाणावे । लिंग हे शक्तिमान स्वभावे । ऐक्य विज्ञान ते ऐकावे । संबंधासी म्हणतातीं ॥५१॥ ऐसा हा लिंगांग संबंध । जाणावे हो शास्त्र शुद्ध । ऐकावे तयाचा भेद । पुढतीं निश्चल मनाने ॥५२॥ जैसे स्वशक्त्या लिंगस्थल । बहु प्रकारे वाढले । तैसे भक्तीने अंगस्थल । तेही झाले अनेक ॥५३॥ शक्तींने जैसे वाढे लिंगस्थल । भक्तींने आत्मा होय अंगस्थल । शक्त्या उपास्यत्व पावे शिव निष्कल । होय आत्मा उपासक भक्तांग ॥५४॥ ऐसे हे पूज्य पूजक । आणीक ही साध्य साधक । तैसेचि देव आणि भक्त । गुरु शिष्यत्व जाणावे ॥५५॥ आता एकचि लिंगस्थल । भाव, प्राण, इष्टलिंग सकल । भाव लिंग हे निष्कल । भाव ग्राह्य परात्पर ॥५६॥ मनो ग्राह्य प्राणलिंग । सकल निष्कल म्हणतीं अभंग । तत्प्राणेष्वंतर्मनसो लिंग । माहुरिति श्रुति म्हणे ॥५७॥ आता ऐका इष्ट लिंगस्थल । दृक्कला ग्राह्य सकल । तया म्हणतीं इष्ट लिंगस्थल । इष्टार्थ प्राप्तीकारक जो ॥५८॥

॥ श्लोक ॥ इष्टमूर्ज्यन्तु भक्तानामनुयच्छेति सर्वदा । इष्टलिंगमितिप्राहतस्मादाथर्वणी श्रुतिः ।

भक्तांच्या इष्टार्था पूर्ण करिते । पूजकांच्या भाग्यासी उदिते । म्हणोनि अथर्व श्रुति म्हणते । इष्टलिंग या नाम ॥५९॥ सद्रूपते भावलिंग । चिद्रूपते प्राणलिंग । आनंद रूपचि इष्टलिंग । आचार्यांनीं कथियेले ॥६०॥ भावलिंग हे परतत्व । प्राणलिंग सूक्ष्म तत्व । इष्टलिंग हे स्थूलतत्व । लिंग त्रितत्वे जाणावें ॥६१॥ ऐसे हे त्रिलिंग स्थले । एकेका माजी द्विधा झाले । तेचि षडलिंग नामे निश्चल । चित करोनि ऐकावे ॥६२॥ महालिंग प्रसादलिंग । द्विविध जाणावे भावलिंग । जंगमलिंग शिवलिंग । प्राणलिंग द्विभेद ॥६३॥ गुरुलिंग आचारलिंग । द्विभेद हे इष्टलिंग । ऐसे उद्भवले षडलिंग । त्रिलिंगामाजी पै ॥६४॥ आता षडलिंगेचि सत्तावन्न । कैसे विस्तार पावले विभिन्न । त्यांचा संपूर्ण विवरण । ऐके सत्पुत्रा या पुढती ॥६५॥ आचारलिंगाचे नऊ प्रकार । प्रथम दीक्षा गुरुस्थल साचार । द्वितीय शिक्षा गुरुस्थल

निर्धार । ज्ञान गुरुस्थल तृतीय पै ॥३६६॥ चतुर्थ ते क्रियालिंगस्थल । पंचम ते भावलिंगस्थल । षष्ठ ते ज्ञानलिंगस्थल । स्वयं जंगमस्थल सप्तम ॥६७॥ चर जंगमस्थल अष्टम । पर जंगमस्थल नवम । ऐसे आचारलिंग निःसीम । जाणावे हो नवविध ॥६८॥ आता गुरुलिंगाचे नऊ भेद । ऐके बाळा विशुद्ध । क्रियागम, भावागम शुद्ध । ज्ञानागम तृतीय ॥६९॥ सकाय, अकाय, परकाय । धर्माचार, भावाचार, ज्ञानाचार । गुरुलिंगाचे हे नऊ भेद । शिवलिंग स्थल ऐकिजे ॥७०॥ कायानुग्रह इंद्रियानुग्रह । भावानुग्रह कायार्पित । करणार्पित भावार्पित स्थल । शिष्य, शुश्रूषा, सेव्य स्थले नऊ ॥७१॥ झाले शिवलिंगाचे नऊ प्रकार । पुढे जंगमलिंगहीं नवविध साचार । जीवात्म, अंतरात्म, परमात्मस्थल तिसरे । चवथे निर्देहागम ॥७२॥ निर्भावागम पंचम । नष्टागम सहावे । आदिप्रसादी, अंत्यप्रसादी आठवे । सेव्यप्रसादी नववे पै ॥७३॥ प्रसाद लिंगाचेही नऊ भेद । दीक्षा पादोदक, शिक्षा पादोदक शुद्ध । ज्ञान पादोदक प्रसिद्ध । तिसरे स्थल जाणावे ॥७४॥ क्रिया निष्पत्ती भाव निष्पत्ती । सहावे जाण ज्ञान निष्पत्ती । पिंडाकाश बिंद्वाकाश निश्चिती । महदाकाश स्थले नऊ ॥७५॥ ऐकावे महालिंगाचा विस्तार । झाला तो द्वादश प्रकार । क्रिया प्रकाश भाव प्रकाश साचार । ज्ञान प्रकाश तिसरे पै ॥७६॥ चवथे स्वीकृत प्रसादी स्थल । पांचवे जाण शिष्टोदन स्थल । चराचर लय स्थल । पहावे जाण गुरुपुत्रा ॥७७॥ भांड स्थल भाजन स्थल । अंगालेपन स्थल स्वपराज्ञा स्थल । भावा भाव लय स्थल । ज्ञानशून्य स्थल द्वादशवे ॥७८॥ आचारादि महालिंगांत । सत्तावन्न जाणा लिंगस्थले निश्चित । अंगस्थले चव्वेचाळीस सांप्रत । ऐके प्रेमळ अधिकारिया ॥७९॥ जैसे एका लिंगस्थळी त्रिविधलिंग । तसेचि त्रिभेद झाले अंग । त्यागांग, भोगांग, योगांग त्रिविध प्रकारे विभागले ॥८०॥ त्यागांगामाजी भक्त, महेश । भोगांगी प्रसादी प्राणलिंगी विशेष । योगांगी शरणैक्य निःशेष । षडंगभेद पहावे ॥८१॥ भक्तामाजी पंचदश भेद । त्याचा विस्तार ऐका विशद । पिंडस्थल पिंड ज्ञानस्थल शुद्ध । संसार हेयस्थल तिसरे पै ॥८२॥ मग गुरु कारुण्य लिंग धारण । भस्म धारण रुद्राक्ष धारण । मंत्रस्थल भक्ति स्थल नवम जाण । उभय स्थल ते दहावे ॥८३॥ त्रिविध संपत्ति चतुर्विध साराय । उपाधि माट निरुपाधि माट चतुर्दश पाहे । सहज माट जाणावे । भक्ति स्थल हे पंचदश ॥८४॥ आता ऐका महेश स्थल । तयामाजी नऊ स्थल । प्रथम ते महेश स्थल । लिंग निष्ठा स्थल द्वितीय पै ॥८५॥ पूर्वाश्रय निरसन अद्वैत निरसन । आव्हान विसर्जन अष्टमूर्ति निरसन । सातवे सर्वांगत निरसन । शिव जगन्मय आठवे ॥८६॥ भक्त देहिक स्थल नवम । महेश स्थलाचे भेद जाण । प्रसादि स्थल सप्त प्रकाराने । वाढले ते ऐकावे ॥८७॥ प्रसादी गुरु माहात्म्य । लिंग माहात्म्य जंगम माहात्म्य । भक्त माहात्म्य शरण माहात्म्य । प्रसाद माहात्म्य सप्तम ॥८८॥ आता प्राण लिंगीचे विवरण । त्याचे पंच प्रकार जाण । प्राणलिंगी प्राणलिंगार्चन । शिवयोग

समाधी तीन पैं ॥३८९॥ चवथे निजलिंग स्थल । पांचवे जाण अंगलिंग स्थल । ऐसी पंचस्थले विमल । प्राणलिंगीचे जाणिजे ॥९०॥ शरण स्थलाचे भेद चार । शरणं स्थल प्रथम साचार । द्वितीय तामस निरसन दुष्कर । तृतीय निर्देश चतुर्थं शील संपादन ॥९१॥ सहावे जाण ऐक्य स्थल । त्याचेही जाण चार स्थल । ऐक्य स्थल सर्वाचार संपत्ति स्थल । एक भाजन स्थल सह भोजन ॥९२॥ ऐशी अंगस्थले चव्वेचाळीस । लिंग स्थले सत्तावन्न विशेष । पिंडादि ज्ञान शून्यांत समरसे । झाली एकोत्तर शत स्थले ॥९३॥ पिंडादि ज्ञान शून्यांत । स्थले जाण एकोत्तर शत । अंग स्थले समस्त । महालिंगांत लीन होतीं ॥९४॥

॥ श्लोक ॥ तनुत्रयगतानादी मलत्रयमसौगुरुः । दीक्षात्रयेणनिर्दग्ध्वा लिंगत्रय मुपादिशेत् ॥३९५॥

तनुत्रय गतअनादी । मलत्रये व्यापिली देह बुद्धि । तीं मलत्रयें जाण त्रिशुद्धि । आणव, माया, कार्मिक ॥९६॥ आणव मलाचा स्थूल देह । रजवीर्यचि आणव मल पाहे । मल संयोगाचा मलिन देह । स्थूल देह जाणावे ॥९७॥ ऐसे आणव मलिन अंग । क्रिया दीक्षे करोनि भंग । तयासी म्हणविले त्यागांग । तेथे इष्ट लिंग स्थापिले ॥९८॥ दारापुत्र बंधुजन । यासी म्हणिजे माया मल सघन । माया मोहे आवृत्त झाले मन । अंतःकरण सूक्ष्म देह ॥९९॥ मनु दीक्षे करुनि शुद्ध । मायाजालाचा केला विच्छेद । तया म्हणविला भोगांग प्रसिद्ध । प्राण लिंग संबंध तया केला ॥४००॥ कारणांगीचे कार्मीक मळ । वेधा दीक्षे धुवोनि निर्मळ । तया म्हणविला योगांग सोज्वळ । भाव लिंग अविरळ धारण केले तयासी ॥४०१॥ हेचि त्रिअंग त्रिलिंग । षडविधाकारे वाढले लिंगांग । हेचि एकोत्तर शत स्थल सूक्ष्म अभंग । लिंगांग समरस तत्वज्ञान ॥२॥ आणीक सूक्ष्मतर शिवज्ञान । म्हणतीं तया षोडशोत्तर द्विशत जाण । नवलिंग सकील ज्ञान । तयासीच म्हणताती ॥३॥ एकोत्तर शत स्थल । किंवा षोडशोत्तर द्विशत विमल । हे शिवानुभव शास्त्राचे कील । जाणावे हो सद्भक्तीं ॥४॥ ते हे लिंगांग समरसा ज्ञान । लिंगवंता आवश्यक जाण । या विरहित आन ज्ञान । वीरशैवां असंबंध ॥५॥ सर्वोपनिषदांचे सार । सकळ तत्व ज्ञानाचे आगर । सर्वार्पण योगाचे माहेर । लिंगांग समरस तत्व ज्ञान ॥६॥ शनैः शनैः पर्वत शिखरी । जैसा जाय पादचारी । तैसा षटस्थल मार्गी परोपरी । लिंगामाजी समरस तो ॥७॥ अंगलिंगा वेधले । तव अंग हे लिंग गणा आले । मनही लिंग ध्यानी रमले । तन्मय झाले मन लिंग ॥८॥ अंग मन झाले एक सूत्र । भाव केवी होय अन्यत्र । लिंग भाव झाले सर्वत्र । अवस्था त्रयही लिंगमय ॥९॥ अंगलिंगा पूजू बैसले । इंद्रियादि उपकरणे सिद्ध केले । मन हे ध्यान चिंतनी रमले । मनोभावे संयुक्त ॥१०॥ दुर्भाव आणि कुभाव । यांचा झाला अभाव । मन झाले लिंग भाव । बाह्याभ्यंतर अभेद ॥११॥ म्हणोनिया अक्का बोलिली । एका वचने अनुभव सांगितली । ते अमोलिक वचन ये वेळी ।

उपसंव्हारे ऐकावे ॥४१२॥ अंगलिंगव वेधिसि अंगलिंग वायित्तु । मनलिंगव वेधिसि मनलिंग वायित्तु । भावलिंगव वेधिसि भावलिंग वायित्तु । चन्नमल्लिकार्जुनय्या निम्मोलिमेय संगदलिर्दं स्वयंलिंगियादेनु । तुमचिया प्रसन्नतेच्या योगे । स्वयंलिंग झाले सवेगे । आता नुरले नाही मागे । अंगलिंग भेदभाव ॥१३॥ ऐसा हा सुलभ शिवानुभव । शिवशास्त्री याचा गौरव । कैसे हे चुकले जीव । चिंतामणीसी टाकोनी ॥१४॥ कांचासीं म्हणतीं दिव्यमणी । परिसासी उल्लंघोनी । गारगोटया संग्रहितीं अज्ञानी । पढतमूर्ख लौकिकी ॥१५॥ तैसे स्वधर्मरूपी शिवज्ञान । टाकोनि शेविती इतर ज्ञान । सुलभोपाय वीरशैवा लागन । शिवलिंगांग सामरस्य ॥१६॥ सद्गुरू बसवलिंग देवे । उपदेशिती शिवज्ञान अतिगुह्य । ऐकोनि कृत कृत्य झाले पाहे । हावगिलिंग सच्छिष्य ॥१७॥ हा चतुर्थाध्याय जे पठण करिती । तया न भोवे संसृति । लिंगांग समरसे निश्चिती । शिवत्वा प्रती पावती ॥१८॥ हा अध्याय शिवज्ञान वासरमणी । जयाच्या हृदयी उदय पावे झणी । अज्ञान तम परिहरोनि तत्क्षणी । शिवप्रकाशी स्वतंत्र ॥१९॥ श्रीगुरु हावगिलिंग लीलामृत । श्रवणे प्राशन करा सद्भक्त । होताल जन्ममरणा विरहित । बसवलिंग बोलत भालपुरीचा ॥२०॥ इतश्री हावगिलिंग लीलामृते । शिवानुभव उपदेशोनाम चतुर्थोध्याय गोडः । श्रीगुरु हावगिलिंगार्पण मस्तु । श्रीरस्तु । मंगळमस्तु ।

—★— चतुर्थोध्याय समाप्त —★—

– एकोत्तर शतस्थल पट्टिका –

# परवस्तु प्रथम स्थल

## ४४ अंगस्थल

| त्यागांग | | भोगांग | | योगांग | |
|---|---|---|---|---|---|
| १५ भक्ति स्थले | ९ महेश स्थले | ७ प्रसादी स्थल | ५ प्राणलिंगि स्थल | ४ शरण स्थल | ४ ऐक्य स्थल |
| १ पिंड स्थल | लिंग निष्ठा | प्रसादी | प्राणलिंगी | शरण | ऐक्य |
| २ पिंड ज्ञान | पूर्वाश्रय निरसन | गुरु महात्म्य | प्राणलिंगार्चन | तामस निरसन | सर्वांचार संपत्ति |
| ३ संसार हेय | अद्वैत नि. | लिंग म. | शिवयोग समाधी | निर्देश स्थल | एक भाजन |
| ४ गुरु कारुण्य | आव्हान विसर्जन | भक्त म. | निजलिंग | शील संपादन | सहभोजन |
| ५ लिंग धारण | अष्टमूर्ति निरसन | शरण म. | अंगलिंग | | |
| ६ विभूति धारण | सर्वगत नि. | प्रसाद म. | | | |
| ७ रुद्राक्ष धारण | शिवजगन्मय | | | | |
| ८ मंत्र स्थल | भक्तदेहिक | | | | |
| ९ भक्ति स्थल | | | | | |
| १० उभय स्थल | | | | | |
| ११ त्रिविध संपत्ति | | | | | |
| १२ चतुर्विध साराय | | | | | |
| १६ उपाधि माट | | | | | |
| १४ निरुपाधि माट | | | | | |
| १५ सहज माट | | | | | |

## ५७ लिंगस्थल

| इष्टलिंग | | भावलिंग | | प्राणलिंग | |
|---|---|---|---|---|---|
| ९ आचार-लिंग | ९ गुरुलिंग | ९ शिवलिंग | ९ जंगमलिंग | ९ प्रसाद लिंग | १२ महालिंग |
| दीक्षागुरु | क्रियागम | कायानुग्रह | जीवात्म | दीक्षा पादोदक | क्रिया प्रकाश |
| शिक्षा गुरु | भावागम | इंद्रियानुग्रह | अंतरात्म | शिक्षा पादोदक | भाव प्रकाश |
| ज्ञान गुरु | ज्ञानागम | प्राणानुग्रह | परमात्म | ज्ञान पादोदक | ज्ञान प्रकाश |
| क्रियालिंग | सकाय | कायार्पित | निर्देहागम | क्रिया निष्पत्ति | स्वीकृत प्रसादी |
| भावलिंग | अकाय | करणार्पित | निर्भावागम | भाव निष्पत्ति | शिष्टोदन प्रसादी |
| ज्ञानलिग | परकाय | भावार्पित | नष्टागम | ज्ञान निष्पत्ति | चराचर लय |
| स्वय जंगम | धर्माचार | शिष्यस्थल | आदीप्रसादी | पिंडाकाश | भांड स्थल |
| चर जंगम | भावाचार | शुश्रुषा | अंत्यप्रसादी | बिंद्वाकाश | भाजन स्थल |
| पर जंगम | ज्ञानाचार | सेव्यस्थल | सेव्यप्रसादी | महदाकाश | अंगलेपन स्थल |
| | | | | | स्वपराज्ञा स्थल |
| | | | | | भावाभाव लय स्थल |
| | | | | | ज्ञानशून्य स्थल |

| | |
|---|---|
| १५ भक्ति स्थले | ९ आचारलिंग स्थले |
| ९ महेश स्थले | ९ गुरुलिंग स्थले |
| ७ प्रसादी स्थले | ९ शिवलिंग स्थले |
| ५ प्राणलिंगी स्थले | ९ जंगमलिंग स्थले |
| ४ शरण स्थले | ९ प्रसादलिंग स्थले |
| ४ ऐक्य स्थले | १२ महालिंग स्थले |
| ४४ अंगस्थले | ५७ लिंगस्थले मिळून |

१०१ एकोत्तरशत स्थले संपूर्ण

श्री गुरु विरूपाक्षलिंगाय नमः । श्री गुरु हावगिलिंगाय नमः । श्री गुरु बसवलिंगाय नमः ।



॥ आर्या ॥ नव हावगिलिंग देवा गुरुराये भक्तिमार्ग बोधिधले । ते बसवराज चरिता श्रवण करावे म्हणोनि विनवियले ।:१॥

एकदा कैलास शिखरी । भक्ति संधान नायका सत्वरी । विनवितसे श्रीगौरी । भय भक्तीने तेधवा ॥२॥ जंगम लिंगाची महिमा । अवर्णनीय हरि ब्रम्हा । समुद्र सिकता अगणित जाणा । तेवी जंगम महिमा अगणित ॥३॥

॥ श्लोक ॥ आदि मध्यांत शून्यश्च । सर्वानंद मयो विभुः । अनादि जंगमो देवी । शिव रुद्रादि पूजितः ॥४॥

शून्य शून्यं परं परं शून्यं । निःशुन्यं निष्कलं तथा । आदि मध्यांत शून्यं च ह्यनादि जंगस्थलम् ॥५॥

जंगम महिमा ऐके देवी । आदि म्हणोनि जन्म नाही । मध्य म्हणोनि तारुण्य नाही । अंत-मृत्यु विरहित ॥६॥ आणिक ही सर्व शक्तिमान । सदानंदी परिपूर्ण । ऐसा हा अनादि जंगम जाण । शिव रुद्रादि पूजित ॥७॥ तया जंगम लिंगासी । करोनि साष्टांग प्रणामासी । पुढती श्री चरित्रासी । बोलवील श्रीगुरू ॥८॥ श्रोती द्यावे अवधान । हावगिलिंग चरित्रा लागुन । जयाच्या श्रवणे करून । त्रिविध तापे नासती ॥९॥ श्रीगुरू बसवलिंग देव । उपदेशितीं हावगिलिंगा स्वय । भक्ति स्थलाचे सार सर्वस्व । बसवराज सुचरित्र ॥१०॥ आलिया अतिथि जंगमाचीं । तनुमन धने सेवा कीजे त्यांचा । ही षटस्थलाची । प्रथम पायरी जाणिजे ॥११॥ गुरू की जंगम की भक्त । सकळी भक्तिनेचि मुक्त । भक्ति लक्षण विरहित । दंभाचार जाणावे ॥१२॥ यत्र जीवस्तत्र शिव । हा जाणोनि सर्वात्म भाव । जो करी भक्तिचा गौरव । अन्यथा नावा कलंक ॥१३॥ म्हणोनिया गुरुराय सांगती । भक्ति भांडारीचा अनुभव । जो जन्मोनि केला वीरशैव । धर्मा लागी जिर्णोद्धार ॥१४॥ तो हा शिवशरण शिखामणी । गुरुलिंग जंगम प्राणी । जो सप्त दिन-दिनमणी । तटस्थ उभा केलासे ॥१५॥ तृण पुरुषा जीवदान । देवोनि केला सचेतन । मीमांसकाचे मुख भंजन । पंच पुरुषे केलासे ॥१६॥ तो हा द्वितिय शंभु बसवराज । भक्ति स्थलाचा फडकाविला ध्वज । राहोनि कल्याणी सहज । जगत्कल्याण साधिला ॥१७॥ तव म्हणती गुरुराय । एक बाळा मानवांचा ध्येय । म्हणती ज्ञानेचि मोक्ष होय । तरी क्रियेवीण ज्ञानांध ॥१८॥ क्रिया हीच भक्ति । अनुभवांचे ज्ञान शक्ति । तयासी रक्षाव भक्ति । अगत्य पाहिजे मानवा ॥१९॥ विबुधवर्य निजगुण योगी । कैवल्य पद्धतींत सांगे त्यागी । गुरुपाद सेवा शरणानुरागी । हरपूजा, करुणा, सद्विनय ॥२०॥ विरति, विद्या, विवेक । शम, दम, सत्यधर्म नावेक । शिव भक्तीचा सद्विवेक । नीति, निगमागमी विश्वास ॥२१॥ देही सदा निर्भय, जागृत । अपवादाचा मानितो भय । इंद्रिय निग्रही बलवंत पाहे । जीव भाव स्वये विसरला जी ॥२२॥ गुरु शंभु लिंगामाजो । लीन झाले तनुमन भावादो । भृंगी कीट न्याये सहजी । तन्मय झाला तद्रूप ॥२३॥ ऐसिया सद्गुणा विरहित । परमोक्ष साधू म्हणे जो संत । तयासी

शांती शाश्वत । न मिळे बाळा सर्वांसी ॥२४॥ जे तनुमन धनासी त्यागिले । सदैव गुरुलिंग जंगम पूजिले । मज माझे ममत्व विसरले । तया बसवदेवाचे भले चरित्र तुम्ही ऐकावे ॥२५॥ एके दिनी कैलास भुवनी । परिवारेसी बैसले शिव भवानी । नंदी भृंगी शिवगणे वेष्टुनी । हरि ब्रम्हादि दिक्पाल ॥२६॥ सर्व ही करिती शिवमुखावलोकन । आज्ञेचे करिती प्रतिक्षण । चरमूर्ती नारद तये क्षण । वीणा झंकारी कर-कमळी ॥२७॥ येवोनि साष्टांगे नमस्कारी । करकमळ जोडोनि स्तुती करी । स्थिर व्हावे त्रिलोक संचारी । शुभ संदेश श्रुत करा ॥२८॥ विनये बोले नारद मुनी । चंद्रशेखरा खट्वांग पाणी । मृत्युंजया मृत्यु लोकाहूनी । येणे झाले बाळाचे ॥२९॥ तरी मृत्यु लोकीची कहाणी । काय सांगू जी पिनाकपाणी । अधर्मी, अनाचारी, नास्तिक जनी । मृत्यु लोक व्यापिले ॥३०॥ सेविती ना गुरुलिंग जंगम । अष्टावरणी नाही प्रेम । सत्क्रियाचार नेम धर्म । केले त्याग सर्वस्वी ॥३१॥ जंगमे त्याग बुद्धि सोडुनी । भोगामाजी रमले निशिदिनी । जप तप ब्रम्हचर्ये लागुनी । तिलांजली दिधलेती ॥३२॥ विरक्ते विरती सोडिला । रक्तामाजी आसक्त झाला । त्यागाच्या नावे भोगू लागला । विषय भोग अहर्निशी ॥३३॥ गुरु जंगमांचीच नीति ऐसी । इतरांची वार्ता कायसी । आली ग्लानी धर्मासी । आता कैंची सद्‌गती ॥३४॥ पेटला अनाचाराचा अग्न । शांतवा वर्षोनि कृपाघन । नाही तरी भक्ति ज्ञान । नामशेष होताती ॥३५॥ जगज्जनका जगत्पालका । जगत्संव्हारका जगदोद्धारका । अवतरोनि मर्त्यलोका । पावन कीजे परमात्मा ॥३६॥ कृपादृष्टी पाहे महेश । द्वितिय शंभु नंदिकेश । अभेद असे मसी त्यास । माझाचि अंश निर्धारे ॥३७॥ धर्म स्वरूप सत्ताधारी । सद्‌गुणी आणि सदाचारी । धर्मा लागी उद्धारी । ऐसा सुविचारी दुजा नसे ॥३८॥ कृतयुगी चतुःपाद । धर्म होता की प्रसिद्ध । त्रेतायुगी त्रिपाद । द्वापारी द्विपाद एक पाद कलियुगी ॥३९॥ हा तरी केवळ धर्म स्वरूप । याच्या योगे धर्मा येईल रूप । करीता यासीच निरोप । देणे योग्य वाटते ॥४०॥ शिवे कृपादृष्टि अवलोकुनी । आज्ञापिती नंदी लागुनी । तव करकमळ जोडुनी । विनये उभा आनंदी ॥४१॥ बाळा येई नंदिकेश्वरा । त्वा जावे मर्त्य लोका त्वरा । जावोनि करी धर्मोद्धारा । भक्तोद्धारा वेगेसी ॥४२॥ एवढे धर्मोद्धार करोनी । यावे त्वा कैलासा लागुनी । ऐकता नंदिकेशे शिवचरणी । कर जोडोनि विनवितसे ॥४३॥ मुनी वचिले श्री प्रती । मृत्य लोकी मानव प्रवत्ति । अनाचाराकडे निगुती । झाली असे येधवां ॥४४॥ मी तरी अज्ञान । मर्त्या जावोनि काय करीन । माझी शक्ति नोहे जाण । धर्मोद्धार करावया ॥४५॥ आपण मज सवें येईजे । गुरू रुपे मज रक्षिजे । तरीच सहन करीन ओझे । धर्मोद्धार कार्यांचे ॥४६॥ तव शिव देवे बोलती । त्वां निश्चित असावे सुमती । येईन मी तुझिया सांगाती । पाठीराखा गुरु रुपे ॥४७॥ नंदिकेशे आज्ञा वंदिली । कैलासी वार्ता पसरली । की नंदिकेशा गर्भ कमळी । वास घडे मृत्युलोकी ॥४८॥

श्री हा.

द्वारपाळे वार्ता ऐकोन । हंसत मुखे बोले वचन । नंदिकेशा ! गर्भवास कठिण । वरी बाळपण परतंत्र ॥४९॥ दूध मागेल साय मागेल । रडेल आणि हंसेल । मूत्र पुरीषामाजी लोळेल । हा योग घडेल दुष्कर्मे ॥५०॥ तव जाता हरींद्र । हे शब्द कर्णी पडले छिद्र । यया द्वार-पाळाचे शिर । छेदू कांहो ये समई ॥५१॥ तव मनी विचार करिती । ही वार्ता श्रुत करु महेशाप्रती । म्हणोनिया माघारे येती । वार्ता सांगती अघोरा ॥५२॥ ऐकोनिया तव भर्ग । तुम्ही सुचविला हा सुमार्ग । नंदी सवे जावोनि सवेग । तिथेचि निंदका शिक्षिजे ॥५३॥ तव द्वारपालका बलाउनी । म्हणती निंदका नुमजोनी । नंदिकेशा अपहास्य वचनी । निंदिले त्वा शतमूर्ख ॥५४॥ तया अपराधे करुन । भूलोकी चालुक्य वंशी जाण । मूढा जन्म घेई जाउन । शापिले शिवे दूतासी ॥५५॥ सर्वापराधी मी अजाण । म्हणोनि घाली लोटांगण । मज पापिया श्री चरण । केव्हां प्राप्त होती की ॥५६॥ तुज भक्तद्रोह घडेल । शिव भक्ती तुझे शिरच्छेदितील । तव तुज मुक्ति मिळेल । येणे होईल कैलासा ॥५७॥ ऐसा उःशाप त्रिदंडीसी । दिधलासे व्योमकेशी । प्रथम जाई त्वां मर्त्यासी । नंतरी येती शिवगण ॥५८॥ अपराधी शिवाज्ञा वंदुनी । जाता झाला वेत्रपाणी । मर्त्यलोकी येउनी । चालुक्य वंशी जन्मला ॥५९॥ तव षडानन गजानन । वीरभद्र आणीक रुद्रगण । आले त्रिषष्टि पुरातन । सकळी नमिती शिवगौरी ॥६०॥ आज्ञा द्यावी शिवशंका । सांगाती जाऊ नंदिकेश्वरा । संपोनिया लोकयात्रा । येऊ सुचरित्रा कैलासा ॥६१॥ तव पशुपती हर्षे बोलती । तुम्ही गेलिया नंदीशा प्रती । साह्य होताल निश्चिती । धर्मोद्धारा कारणे ॥६२॥ कलह प्रिया आपणही जावे । राजद्वारी सतत वसावे । नंदीश कर्तव्या निंदावे । वाढेल महत्व त्या योगे ॥६३॥ मग तुझेही दोष परिहार । होती निःशेष । षण्मुखा तू षटस्थल विशेष । प्रकाश करी शिवज्ञान ॥६४॥ शरभा तूं सर्वांचे मनोमल । धुवोनि स्वच्छ की विमल । गणपते तू महाप्रसादी अविरळ । निष्प्रपंची तू होई ॥६५॥ भृंगी तू विडा देणार । ब्रह्मा तू गणितकार । उपेंद्रा तू दंडण करणार । शिवद्रोह्यांचे शिरकमळ ॥६६॥ जगन्माता अपुली चित्कळा । पाठवीतसे भुतळा । गंगा वाही ते वेळा आपुली चित्कळा पाठवी ॥६७॥ इतर शिवगणी मिळोनी । आपुलिया इष्टस्थळी जन्मुनी । कायकचि कैलास म्हणोनी । प्रसिद्धी करावे भूलोकी ॥६८॥ ऐसी शिवाज्ञा शिरसावंदुनी । जयजयकारे गर्जना करोनी । येती मर्त्य लोका लागुनी । प्रथमाग्रणी आनंदे ॥६९॥ ऐका मर्त्य लोकीचा इतिहास । छप्पन देशी कर्नाटक विशेष । जे अनेक तीर्थ क्षेत्रास । जन्म भूमी झालीसे ॥७०॥ तया पुण्यमय प्रांती । बागेवाडी नामे वस्ती । तया अग्रहारी शिव ब्राम्हण राहती । तया माजी अधिपती मादिराज ॥७१॥ तया रायाची पट्टराणी । मादांबा पतिव्रता चूणामणी । पुण्यवती अन्नपूर्णा जनी । उभय कुल पवित्रिणी ॥७२॥ एकदा नंदिकेश मंदिरी । पुराण प्रवचनाचे अवसरी । गेलीसे मादांबा सुंदरी । पुराण श्रवण

बैसती ॥७३॥ तया शिव शास्त्रामाजी । निघे कथा निपुत्रिकांची सहजी । अपुत्रस्य गतिर्नास्ति पहाजी । मानवासी निश्चये ॥७४॥ जया सतिपतीसी पुत्र नाही । पुत् नामे नरक पाही । प्राप्त होय निश्चई । गृहस्थासी जाणिजे ॥७५॥ तया नरकांतुनी तारितो । म्हणोनि पुत्र नामासी धरितो । पुत्र विरहित दांपत्य । निष्फल वृक्षा जैसे ही ॥७६॥ ऐसे ऐकोनि प्रवचन । मुग्ध झाली मादांबा जाण । गृह शून्य संतानाविण । ज्योत्सनेविण रात्र पै ॥७७॥ खिन्न मने दर्शन घेउनी । आलीसे मादांबा गृहा लागुन । कोठे ही स्थिर नोहे मन । अंतःकरण शून्य झालेसे ॥७८॥ दूती म्हणती काहो माता । किं निमित्त खिन्न दिसता । काय उणेजी चित्ता । म्हणोनि चिंतातुर मन ॥७०॥ तव मादिराज आले निगुती । साशंक होवोनि दूता बोलती । कांरे बसलो दुश्चिती । काय उणे भासले ॥८०॥ कांहो नाही बोलता । किं निमित्त खेद करिता । बोले मादांबा तत्वता । कायसे दुश्रित पुरुषांसी ॥८१॥ ऐश्वर्य असोनि काय संभ्रम । की राघोविण पिंजरा शून्य । तैसे पुत्ररत्नाविण । दिसते शून्य गृह मज ॥८२॥ स्मशानातील सुवृक्ष छाया । कवण अपेक्षी वांझोट्या गाया । अगणित संपत्ति असोनि वाया । प्रपंच शून्य पुत्राविणे ॥८३॥ कायसे त्या दारिद्र्या घरी । दहापांच पुत्रपुत्री । अन्नवस्त्रा फिरतीं दारोदारी । देहीं देही म्हणोनिया ॥८४॥ आम्हासी का दुर्लभ झाले । का गतजन्मीचे कर्म ओढवले । म्हणोनि संतानहीन झाले । जगामाजी वंध्यत्व ॥८५॥ म्हणोनि मादांबा खिन्न वदने । बोलतसे राया लागुन । तव मादिराज हास्य वदने । बोलताती सतींसी ॥८६॥ कामधेनु चिंतामणी । सदैव असता आपुल्या सदनी । फलहीन वृक्षा लागुनी । अपेक्षिजे कासया ॥८७॥ तैसा देवाधि देव शंकर । कुलदैवत असता निर्धार । शिलादाप्रती नंदिकेश्वर । शिवाराधने लाभला ॥८८॥ आणिकही मृकंडू मुनी । घोर तपस्या आचरोनीं । चिरंजीव मार्कंडेया लागुनी । प्राप्त करूनि घेतला ॥८९॥ आम्हासी का नाही देणार । तो सच्चिदानंद शिवशंकर । इच्छिले ते देणार । मृत्युंजय जगत्पति ॥९०॥ आमुचे ग्राम दैवत नंदीश्वर । तयाची सेवा करू निरंतर । पूर्ण करील बसवेश्वर । सद्भक्तांची सदिच्छा ॥९१॥ ऐसे सुविचार करोनी । षोडशोपचार पूजा सिद्ध करोनी । जाता नंदिकेश पूजे लागोनी । शुभ चिन्हे आढळती ॥९२॥ दोघी सुवासिनी पूर्ण कुंभे येतीं घेउनी । दधि पक्व फळे भरोंनी । संमुख येतीं सुवासिनी ॥९३॥ मंगल वाद्ये वाजती । ऐकोनि दंपती हर्षती । शुभ चिन्ह पाहोनि संतोषे जाती । वृषभेशाच्या मंदिरा ॥९४॥ जावोनि साष्टांगे नमिती । सोज्वळ दीपाराधना करिती । पंचामृते अभिषेकिती । वृषभेशासी सप्रेमे ॥९५॥ गंधे आयुष्यवर्धन । अक्षतें शत्रु नाशन । पत्र पुष्पे ऐश्वर्य सघन । दुर्धर पापक्षय धूपाने ॥९६॥ दीपाप मृत्यु हर । नैवेद्ये तृप्ति अपार । तांबूले मोक्ष साचार । अष्टविध प्रकार पूजेचे ॥९७॥ ऐसे अष्टोपचारे । दंपती पूजितीं अत्यादरे । पुष्पमाळा भासिंग तुरे । खोवितीं मस्तकी नंदीच्या ॥९८॥ षड्रसान्न

निवेदिती । तांबूलासह दक्षिणा अर्पिती । प्रदक्षिणा नमस्कार करिती । अष्ट भावे करोनी ॥९९॥ देव देव वृषभेश्वरा । पुत्र रूपे शिलाद मुनिवरा । अवतरलासी द्वितिय शंकरा । दयाळुवा बसवेशा ॥१००॥ अवलेवरी कृपा करी । दासीचे वंध्यत्व दूर सारी । मातृपद झडकरी । देई देवा दयानिधे ॥१०१॥ कासया स्त्रियांचा जन्म । जिने सुपुत्रा नाही दिधले जन्म । ती अधमाहुनी अधम । करंटे जन्म तियेचे ॥२॥ ऐसी प्रार्थना करोनी । येती दंपती स्वसदनी । पूजितीं नंदिकेशा प्रतिदिनी । भक्तियुक्त मनाने ॥३॥ कैलासी तिकडे नंदीशाप्रती । परशिवे आज्ञा देती । भूलोकी बागेवाडींत निश्चिती । शैव ब्राम्हण सद्वंशी ॥४॥ मादांबा मादिराज अभिधानी । शिवभक्ति तत्पर दंपती सुलक्षणी । तयासी तू अपत्य होउनी । उद्धार कीजे भक्तांचा ॥५॥ शिवाज्ञा शिरसा वंदुनी । आले नंदी बागेवाडी स्थानी । ते दिवशी दंपती हर्षे करोनी । नंदीश पूजना गेली ती ॥६॥ पूजा संभार अर्पुनी । नैवेद्य तांबूल देउनी । साष्टांग प्रणिपात करोनी । प्रार्थिती दंपती नंदीशा ॥७॥ जगदोद्धारा जगत्पती । उत्पति स्थिति लय तुझे हाती । जगाच्या रक्षणाप्रती । अवतरतोसी वृषभेशा ॥८॥ शिलादासी कुमार होउनी । प्राशन केलासी क्षीरोधी लागुनी । उपेंद्राच्या नंदनवना जाउनी । विश्वं शिलासी उपवन ॥९॥ युद्ध करोनिया विष्णूसी । हृदयी ठेविलासी पदकमलासी । वत्स लांछन या नावासी । झालासी तू कारण ॥१०॥ पर शिवा सवे युद्ध करोनी । शेरवी वाहन झालासी भर्गा लागनी । आम्हा पतितासी पावन करोनी । पुत्रदान देईजे ॥११॥ ऐसी प्रार्थना करिती । नंदिकेशा पदर पसरिती । कृपाळू नंदीश दंपतीं प्रतीं । प्रसाद रूपे वर दिधले ॥१२॥ मरतकीचे मंगळ पुष्प । सतीच्या पदरी पडले अमूप । दंपतींच्या आनंदासी माप । नाही की हो ते वेळी ॥१३॥ तव कृपा प्रसाद घेउनी । येती दंपती गृहा लागुनी । नंदीशाचे प्रसाद सेवुनी । सुखे असतीं शिवध्यानीं ॥१४॥ दंपतीच्या व्रता लागुनी । षोडशमास झाले तये क्षणी । तव उद्यापना लागुनी । यथासांग आरंभितीं ॥१५॥ तव सहस्र जंगमार्चना । मिष्टान्ने तृप्त करितां जाणा । दानधर्म दक्षिणा । यथा सांग देताती ॥१६॥ ऐसे माहेश्वरांचा आशिर्वाद । घेतीं दंपतीं अत्यानंदे । पुढती नंदिकेश्वर प्रसादे । गर्भिणी होय मादांबा ॥१७॥ एक दोन तीन मास । गर्भी स्थिर झालासे नंदीश । भूक तहान विसरली आसमास । निशिदिनी ध्यास नंदीचा ॥१८॥ भक्ति भंडारी गर्भी येता । सुरुची ते कुरुची झाली तत्वता । मुख कमळावरी शुभ्रता । पसरलीसे देवीच्या ॥१९॥ शील संपन्न उदरी राहिला । पर पाकाचा तिरस्कार झाला । योगनिद्रा भोवली मादांबेला । सदा समाधी रमलीसे ॥२०॥ नीलकंठ भक्त उदरी आला । कालिमा आली कुचचूचुकाला । स्थूलता आली कटीला । शिवयोगींद्रा कारणे ॥२१॥ अनुगमन मंद झाले । शरीरासी जडत्व आले । राव डोहळे पुरविले । पांच मासी तेधवा ॥२२॥ देव पूजेचा हव्यास । जंगमार्चनी भक्ति विशेष । शिव स्मरणी रात्रंदिवस ।

निद्रा नव्हे ती योगनिद्रा ॥२३॥ ऐसे सात आठ नऊ मास। झाले पूर्ण गर्भिणीस। गर्भ कमळामाजी नंदीश। सिद्धासनी स्थिर झाला ॥२४॥ मग तो पूर्ण कुंभक साधी। उच्छ्वास निश्वास निरोधी। चिद्दीप पेटवोनी त्रिशुद्धी। [illegible] साधिला महालिंगी ॥२५॥ चतुर्दळाहूनि षड्दळा गेला। करूनिया गुरुलिंग प्रदक्षिणेला। जप ध्यान करूनि ते वेळा। दशदळी गेला शिवलिंगा ॥२६॥ करोनिया प्रदक्षिणा जप ध्यान। गेला द्वादश दळीच्या जंगम लिंगा लागुन। करूनि प्रदक्षिणा जप ध्यान। षोडशदळी प्रविष्ठला ॥२७॥ तेथे प्रसाद लिंगा संदर्शुनी। प्रदक्षिणा जप ध्यान करोनी। तव गेला अग्निचक्रा ओलांडुनी। त्रिकूट गिरीच्या महालिंगा ॥२८॥ तया महालिंगा संदर्शनी। प्रदक्षिणा जप करोनी। तिथूनि सहस्रारा जाउनी। निष्कल लिंगा संदर्शी ॥२९॥ तयासीही करोनि प्रदक्षिणा। आणिक तैसेची जप ध्याना। त्रिदळा जाय तये क्षणा। निरंजन लिंगासी ॥३०॥ तयासी प्रदक्षिणा जप ध्यान करोनी। पश्चिमी जाय एकदळा लागुनीं। तया निःशून्य लिंगा संदर्शिता क्षणी। वृत्ती झाली निःशून्य ॥३१॥ ऐसा हा भ्रूणयोगी। गर्भींच लिंगानंद भोगी। स्वयं लिंगानुभवी त्यागी। लिंगानंदी समरसला ॥३१॥ परलोकाहूनि आलो नाही। इहलोका जाणे नाही लिंगमय वत्ति झाली पाही। त्रयावस्था विरहित ॥३२॥ कैसा पहा महानंदी। तन्मय झाला लिंगानंदी। मी आहे कवण्या धुंदी। कवण देश कवण ठाव ॥३३॥ देश काल परिस्थिती विरहित। शून्य लिंगी रमला निश्चित। त्रिवत्सरे झाली व्यतींत। मादांबा व्यथित झालासे ॥३४॥ नवमास द्वादशमास। झाली संपूर्ण दोन वर्ष। तिसरे ही संपतसे वर्ष। कष्टी झालीसे मादांबा ॥३५॥ जनीं स्त्रिया प्रसवतीं। नव मासाची तयासी मितीं। आता तरी झाले अती। प्रसूत काळ अतिक्रमला ॥३६॥ झाले हो एक वर्ष। म्हणे चुकले दिवसमास। त्रि वर्षं होतीं या समयास। काय होईल कोण जाणे ॥३७॥ हा का असेल उदर। जया म्हणतीं जलोदर। गर्भिणीच मी खरोखर। तरी दिवस विलंब का होतीं ॥३८॥ चालण्यासी शक्ति नाही। बोलण्या अवसान नाही। श्वासोच्छ्वास पाही। वरतीं वरतीं येतातीं ॥३९॥ ऐसे कैसे माझे जन्म। केळी कर्कोटक वृश्चिका सम। प्रसूत होताची जाण। देहांत होय तयासी ॥४०॥ तैसीच होईल का माझी गती। कैशी पुत्रशा उद्भवली चित्ती। का मागितले संताना प्रति। प्रायश्चित मज दिले ॥४१॥ वेदना नाही कष्ट नाही। भूक नाही तहान नाही। लिंग पूजेचा हव्यास पाही। जंगमार्चनी बहु प्रेम ॥४२॥ जड देह जड नाही झाले। लौकिकी आश्चर्य करिती भले। कितीक ललना प्रसूत झाले। तीन वत्सरा माजी पैं ॥४३॥ गर्भ नव्हे हा जलोदर। किंवा वातोदर कफोदर। की हा पूर्ण कर्म दुस्तर। गर्भिणी नामे भोगवितसे ॥४४॥ मंचकावरी पडोनि असावे। शिव चिंतनी चित्त रमवावे। हाचि झालासे स्वभाव। मादांबेचा त्रिकाळी ॥४५॥ मादिराज म्हणे ते समई। मंचकासी जड झालो पाही। देव दर्शना जावोनि

श्री हा.

जावोनि येई । उदयीक सख्या घेउनी ॥१४७॥ कैसे हे दुष्कर्म ओढवले । आम्हीच कां देवा मागितले । का संततीस नाही दिले । पूर्वजांसी ते काळी ॥४८॥ ऐसे देवासी बोलती । दंपती अत्यंत कष्टी होती । कवण विधी पाठीसी म्हणती । दुस्तर आहे न कळे का ॥४९॥ तव मादांबा दुजे दिनी । स्नान पूजादि करोनीं । फल पुष्पादि घेउनी । नंदि मंदिरा जातसे ॥५०॥ हंस गति येऊनि मंदिरा । प्रणाम करी वृषभेश्वरा । अर्पोनिया षोडशोपचारा । मंगळार्तिक्य ओवाळिले ॥५१॥ मग नंदीश्वराच्या कंठी । मादांबा घालोनि मिठी । आळवीतसे जगजेठी । नंदिकेशा लागोनी ॥५२॥ मी तुजसी पुत्र मागावा । तू मजसी कष्ट भोगवावा । ही गर्भवास दिली म्हणोनि दावा । साधिलासी वृषभेशा ॥५३॥ आता नको देई कष्ट । मज ओढवले हे अरिष्ट । आता केलें मी धारिष्ट । प्राणार्पणाचा तव चरणी ॥५४॥ मी प्रसूत होईन । बाळाचे मुख कमळ पाहीन । बाळासी खेळवीन गाईन । पालखा माजी आनंदे ॥५५॥ हे स्वप्नीचे मनोराज्य । सत्य मानीत होते सहज । ते सर्व विफल दिसे आज । या समयासी मज लागी ॥५६॥ आता सरो की मरो । तुझिया चरणी आर्ती पुरो । कर्ता हर्ता तुजसी स्मरो । निशिदिनी वृषभेशा ॥५७॥ मी नाही पुण्य केले । दुजियांच्या सुखदुःखा नोळखिले । दरिद्र गर्भिणीसी दिले । नाही अन्नवस्त्रादी ॥५८॥ काखेंत बाळ नऊ मासाची गर्भिण । अंग सर्व उघडे दिसते जाण । आणीक बाळे दोन तीन । पाठी लागून रडताती ॥५९॥ ऐसि या विधवेसी पाहुन । इतुका कागे उपद्व्याप म्हणोन । हसोनिया तिरस्कारून । अभय न देता पाठविले ॥६०॥ म्हणोनिया नाना परी । आळवोनि मादांबा सहोदरी । नंदिकेशाचे चरणावरी । पडोनि शोकाकुल होय ॥६१॥ हा तुमचाचि नोहे का प्रसाद । लोकी वाढेल की अपवाद । खरोखरी तुमसी वाद । करीतसे मी सलगीने ॥६२॥ आता उदयीक दर्शना येईन । हा भरंवसा नाही जाण । जरी मुक्त करिसी या बंधनातुन । सुवर्ण कळस चढवीन ॥६३॥ सोन्याचा पालख बांधीन । सहस्र जंगमार्चन करीन । दर्शना येईन । राजहंसा घेउनी ॥६४॥ नाही तरी हीच भेट । झाली उमजावे ताटा तूट । आता एकचि मोकळी वाट । कैलासाची ॥६५॥ ऐसे नयन विमलांबु धारे करून । अभिषेकितीं नंदीशा लागुन । डोळे भरोनि वृषभेशा पाहून । रूप हृदयी सांठविली ॥६६॥ पुनः येते मी बसवराया । ऐसे बोलणे वाटते वाया । आता ही नश्वर काया । मायाडंबर मृगजळ ॥६७॥ ऐसे बोलोनि नंदीशाप्रतीं । पुनः नमन करोन सती । हंसगमनी आली दुश्चिती । सायंकाळी गृहासी ॥६८॥ येउनि मंचकी पहुडली । राणीसी नावेक झोंप आली । तेधवां स्वप्न देखिली । मादांबेने अवचित ॥६९॥ कवणे एक माहेश्वर मूर्ती । येवोनि बोले मादांबे प्रती । माये कष्ट झाले अती । आता निश्चित होइजे ॥७०॥ उदयकाल जवळी आलिया । अंधःकार जातसे विलया । तैसे सुकृता तुझिया । पार नाही पाडसे ॥७१॥ तव गर्भ कमळीचा सुकुमार । करील हो जगदोद्धार । कलिमल

श्री
हा.

हारी भक्तीचा भांडार । लोकामाजी उघडील ॥१७२॥ हा केवल द्वितिय शंकर । तव गर्भ कमळीचा नंदिकेश्वर । हा उतरविल भूभार । भक्तिमार्ग शोधोनी ॥७३॥ दुष्टांचा निग्रह करील । शिष्टांचा पालक होईल । कर्माचा खंडन करील । वाढवील धर्मासी ॥७४॥ आता तू सोडी दुश्चित । राही आता निवांत । जन्मलिया कुमाराप्रत । नाम ठेवी बसवेश ॥७५॥ देवी तात्काळ जाग्रत होय । कुणी नाही जवळी पाहे । स्वप्नावस्था तरी ऐसी आहे । होईल काय न कळे मज ॥७६॥ मग मादिरायासी बोलाउनी । कळवी स्वप्नावस्थे लागुनी । सानंद आश्चर्य करी मनी । कैसे म्हणावे हे स्वप्न ॥७७॥ तिकडे गर्भवासी । पर शिव बोले नंदीसी । आलासी कवण्या कार्यासी । बैसलासी योगासनीं ॥७८॥ ऐसे ऐकता नंदिकेश्वर । खडबडोनि उठला सत्वर । तो जो ध्यानी होता सर्वेश्वर । सन्मुख उभा देखिला ॥७९॥ हरहर मी अपराधी । विसरलो तवाज्ञा कृपानिधी । आज्ञा वंदोनि त्रिशुद्धी । उदयोन्मुख होतसे ॥८०॥ शक शालिवाहन । दहासे सदतीस जाण । वैशाखी शुक्लपक्षी सोमवार दिन । चतुर्थी अर्धोदय पर्व ॥८१॥ मन्मथ नामा संवत्सर । तत्समई कर्क लग्न रोहिणी नक्षत्र । प्रभात काळ अति शुभ कर । नंदिकेश्वर अवतरला ॥८२॥ नाही कवणही विकार । बाळ दिसे पूर्ण चंद्र । प्रभा फांकली सहस्र । किरणाची हो अंतर्गृही ॥८३॥ लौकीक प्रसव वेदना । पाहिली नाही राज ललना । जैसी केळी सुलक्षणा । प्रसवे निर्मल फलासी ॥८४॥ स्वप्नामाजी प्रसूत झाली । जागृतीं सुकुमारा पाहिली । आश्चर्य चकित जाहली । पूर्ण चंद्रा पाहुनीं ॥८५॥ सहस्रावधि दिवस । राजसा मजसी कष्टविलास । आजिचा हा लीलाविलास । अगम्य अनुपम अवर्णनीय ॥८६॥ तुझिया दर्शने धन्य झाले । बसवा माझे आर्त पुरले । चकोराचे मन तृप्त झाले तव मुख चंद्रा पाहुनी ॥८७॥ जागे अधिपतींना सुचवा । म्हणोनी आज्ञा करी तेधवा । दूती जावोनिया राया । सांगताती शुभ वार्ता ॥८८॥ यावे जी पूर्ण चंद्र उदेला । अंधःकार सर्व पळाला । बाई ! कांहींच नाही गलबला । प्रसूतीचा जाणा हो ॥८९॥ रायासी अत्यानंद झाला । त्रिवत्सराचा भार उतरला । जोशियासी बोलाविला । मादिराये तये क्षणी ॥९०॥ पूर्वी मारुतात्मज जन्मला । तीच असे कीं अमृत वेळा । तो भूवरी योगी म्हणविला । हा भोग संपन्न राज योगी ॥९१॥ करील हा धर्मोद्धार । उतरील अवनीचा भार । यया कुंडलीचा निर्धार । करवेनाजी अगाध ॥९२॥ तव जात कर्म केले । सर्वत्रासी आनंद झाले । रथावरी शर्करा वाटिले । राज मंदिरी आनंद ॥९३॥ तव मंगल वाद्ये वाजतीं । वांटिली राये अमित संपत्ति । दीनदुबळयांची आर्ति । पूर्ण करी राजेंद्र ॥९४॥ स्तनपान करीना । डोळे मिटेना रडेना । पान्हा फुटला स्तना । मादांबेच्या ते काळी ॥९५॥ उदयापासोनि अरत झाले । स्तनपानचि करी ना भले । म्हणो यासी काय झाले । मांत्रिकासी बोलवा ॥९६॥ मांत्रिक येती अंगारा लाविती । ज्योतिषी येती शुभ वेळा म्हणती । वैद्य येवोनि नाडी पहाती ।

त्रिदोष विरहित प्रकृतीं हे ॥१९७॥ देवादिका ज्याचा अंत कळेना । मानव पाहतीं काय लक्षणा । पाहोनिया पुत्र रत्ना । दिग्मूढ झाले सर्वत्र ॥९८॥ एक दोन तीन दिवस । निराहार बाळ बसवेश । कोडे पडले सर्वांस । कैसे विपरीत म्हणताती ॥९९॥ कुचकमंडली दुग्ध भरले । सर्वांग माझे तडाडू लागले । पीयीरे बाळा पुरे झाले ! सूड घेणे सरलेना ॥२००॥ एका परी समाधान । तरी दहा असमाधान । कां ? करूनि आलासी अमृत पान । भूक तहान गेले कुठे ॥२०१॥ दुग्ध न पीसी मध न चाटिसी । मिठी पडली का तुझिया वदनासी । मरण का न ये मजसी । तरी निश्चिंत राहते मी ॥२॥ मी मृत झालिया । तुज दुग्ध पाजवितील कुणी दाया । त्यांचेचि दुग्ध पिऊनिया । वाढसील बाळारे ॥३॥ मज तुज नाही संबंध । त्रिवर्षा पासूनि झाला बोध । तुझे जन्म मज विपद । होय सुखद केवी मज ॥४॥ ऐसे एक ना दोन । अनेक विचारे भ्रमले मन । जिकडे तिकडे असमाधान । राजगृहा माझारी ॥५॥ ऐसी चिंताग्नी भडकता । आले शिवयोगी मेघ तत्वता । कृपाघन वर्षोनिया चित्ता । शांतवितीं तत्काळ ॥६॥ यावे यावे स्वामी । दयाळुवा भक्त प्रेमी । पाट घाला गे स्वामी लागुनी । शुद्धोदक घेऊनिया ॥७॥ ते सुवर्ण ताट आणा विमळ । प्रक्षालन करा पदकमळ । गुरुदेवा बैसउनी ते वेळे । पद कमळ क्षालिती ॥८॥ धूळोदक प्रोक्षण करितीं । मादांबा शिरी वंदितीं । बाळासह नमन करिती । मादिराज तये क्षणी ॥९॥ मादांबा स्वामीसी तये वेळा । श्रुत करी बाळ लीला । आजीच धूळोदकाला । घेतला हो मुख पसरोनी ॥१०॥ आजिचा हा चवथा दिवस । मुखी घातिला नाहीं स्तनास । चाटे ना की मधास । मुखी घालिता हस्ते वारी ॥११॥ हे कां रोग की अपस्मार । कळे ना की लीला अपार । ज्योतिषज्ञ भिषग्वर । सकळी मुग्ध जाहले ॥१२॥ तरी कृपा दृष्टी अवलोकुनी । पहाजी काय झाले या लागोनी । यथाचिया नादी पडोनी । झाले अपार सुख दुःख ॥१३॥ तव योगी म्हणती माये । कासया चिंता करिता पाहे । हा लिंग प्राणी जन्मला आहे । जगदोद्धारा कारणे ॥१४॥ षट्संमार्जन करा त्वरीत । बेलफूल आणवा पंचामृत । स्नान करोनिया त्वरित । शुद्धोदका घेऊनिया ॥१५॥ स्नान करितीं तये क्षणी । षट्संमार्जन करितीं कुणी । देतो गंधाक्षता सिद्ध करोनी । आणिती कुणी शुद्धोदक ॥१६॥ गुरवे बेलफूल आणिले । यतीं पंचसूत्री लिंग काढिले । यथा विधी करिते जाहले । लिंग संस्कार ते काळी ॥१७॥ ॐ धारणं मे म्हणोनी । लिंग धारण केले शिशू लागुनी । प्रथम दुग्ध लिंगार्पण करोनी । स्तन पान करवा म्हणतातीं ॥१८॥ हाचि नित्य नेम असावा । मग सुखे वाढेल बसवा । द्वादश दिनी पालख ठेवा । नाम ठेवा बसवा म्हणोनी ॥१९॥ आता मी जाईन । कप्पडी संगमी राहीन । चिंता गेली निरखुन । सर्वत्रांची तेधवा ॥२०॥ हा नव्हे सामान्य बाळ । तो द्वितिय शंभूचि केवळ । भक्तीने भरील भूमंडल । निःपात करील नास्तकांचा ॥२२१॥ शिव धर्माचा जीर्णोद्धार । करील हा

निर्धार । हा गुरु लिंग जंगमासी प्राणाधार । भक्ति रूपे मूल स्तंभ ॥२२२॥ षडरिपूसी दमन करील । साधन संपत्ति वाढवील । जगाचा कल्याण साधील । कल्याण रूपे ! कल्याणी ॥२३॥ महा दासोही होईल । असंख्य जंगमार्चना करील । हा दंड नायक म्हणवील । कलुचूर्य राजाचा ॥२४॥ भक्तीचा भांडार उघडील । भक्तींनेचि मुक्ती साधील । लोक संग्रह करील । पतितोद्धारक शिवप्रिय ॥२५॥ ऐसी बसव लीला गावुनी । गेले यतीं कप्पडी लागुनी । इकडे बाळ बसव अनुदिनी । सुखे स्तन पान करीतसे ॥२६॥ गुरूच्या आज्ञे वर्तती । लिंगार्पित करोनि स्तन पान करवितीं । ऐसे हटयोगी बाळा प्रतीं । नित्यनेमे वागवितीं ॥२७॥ तव माता पितया आनंद झाला । म्हणतीं हटयोगी खरारे बाळा । आहेसी एवढा चिमुकला । कैसा करशील उदयीक ॥२८॥ मग द्वादशवेदिनीं । पालक रोहणा कारणी । समारंभेसि तयें क्षणी सुवासिनीना बलाविती ॥२९॥ तव सुवासिनी ललना । वाणे घेवोनि येती सुशोभना । नव वस्त्रा भरणी नाना । अलंकारे शोभतीं ॥३०॥ मादांबा नेसलीसे पीतांबर । तैसेचि बाळासी वस्त्रालंकार । लेववितीं परिकर । रत्न जडित मोहनमाळा ॥३१॥ मग राजसा पालखा निजविती । पिकरचरे गायन करिती । नाम करण सांगा म्हणतीं । माता पितयासी तेधवा ॥३२॥ बसवराज हे नाम करण । ठेवावे हो गुरू-आज्ञेने । तव सकळ सुंदरी आनंदाने । बसवराज म्हणोन संबोधिती ॥३३॥ ऐसा पालखा रोहण । समारंभे केले रायाने । याचका दिधले दान । अन्न संतर्पण अगणित ॥३४॥ बाळें नूपुरे अंगुली मुद्रा । कर्णफुले पिंपळपान सुकुमारा । मौक्तिक माळा कंठी वृषेंद्रा । नवांबरे भूषवितीं ॥३५॥ बाळ बसवाची लीला वर्णन । कवण करील पंडित जाण । भक्ति भांडारियाचे गुण वर्णन । न करवेचि सर्वथा ॥३६॥ पोट ओढें गुडघ्याने चाले । लाला ताता बोबडे बोले । भिंतींवाटे चाले पळे । हंसे खेळे दूतीं सवे ॥३७॥ ऐसे बाल लीले माजी । गेले तीन चार सहजी । पांचवे वर्ष लागतीं आजी । विद्याभ्यासा प्रारंभू ॥३८॥ मग विद्या गुरुसी बोलाउनी । पाटी पूजा करिती ते क्षणी । श्रीकार प्रणव पंचाक्षरा लागोनी । प्रारंभ केले गुरुजी ॥३९॥ प्रातःकाळी स्नान करोनी । भाळी भस्म त्रिपुंड्र लाउनी । लिंगार्पित दुग्ध पिऊनी । शाळेमाजी जातसे ॥४०॥ नित्य नूतन अक्षराचा पाठ । ऐकताचि करी मुखपाठ । नित्य नवा पाठ । सांगा म्हणे गुरुजी ॥४१॥ गुरुसी वाटे अत्यंत प्रेम । केवळ अवतारिकचि निःसीम । श्रवणेचि आहे सुगम । निगमागम पाठांतर ॥४२॥ ऐसे सात आठ वर्षे झाले । मादिराज आचारिया बोले । अष्ट वर्षे होतीं ये वेळे । सुगुणी बसव कुमारा ॥४३॥ तरी उपनयनाचा विचार । करावाजी लौकर । तथास्तु म्हणे पुरोहित विप्र । सिद्धता करिती उपनयनाची ॥४४॥ हा समारंभ बसवेशे पाहुनी । कवण प्रसंग म्हणे ताता लागुनी । बाळा हा ब्रम्हकर्म तुज लागुनी । संबंध करणेचा विधी असे ॥४५॥ मज काय संबंध ब्रम्हकर्मांचा । मी तरीं केवल लिंगवंत साचा । लिंग संनिहितासी

कैंचा । कर्मरूपी बंधन ॥२४६॥ कर्म बंधने मोक्ष नाही । ऐसे श्रुती देतीं ग्वाही । हे समजोनि उमजोनि पाही । कर्मबंधनी केवी पडू ॥४७॥ एके दिवसी त्यागावे । आजि का तया स्वीकारावे । मोक्ष जेणे साधूनि घ्यावे । तेणे सर्वथा त्यागिजे कर्मासी ॥४८॥ शिव दीक्षेची मोक्ष होय । तव कर्मांचा आश्रय कां करावे । अदृढ नौकेंत बैसावे । बुडोनि जावे अज्ञाने ॥४९॥ आयत स्वायत संनिहित । त्रिविध रूपे लिंगवंत । अर्पिलो देह लिंगदेवा प्रत । आणिक भ्रांत नुरले मज ॥५०॥ या लागी कर्मांचा आडंबर । मज नाहीजी स्वीकार । म्हणोनि आपुला निर्धार । सांगताती बसवेश ॥५१॥ हा स्वधर्म कर्म वरिष्ठ । त्यागू नये महा श्रेष्ठ । स्वधर्म त्यागे महा अनिष्ठ । दुर्गती होय मानवा ॥५२॥ तूचि झालासी का ज्ञानी । वाटते आम्हा लागोनी । माता पितयांची आज्ञा न मानी । सत्पुत्र जनी तो नव्हे ॥५३॥ वडीलांची आज्ञा पाळावे । पूर्वापार धर्मे वर्तावे । शिव चिंतनी काळ घालावे । हे जाणावे वैदीक मत ॥५४॥ मज पूर्वापार धर्मांचा । संबंध नाही त्रिवाचा । हा दुराग्रहाचा । मार्ग सर्वथा सोडाजी ॥५५॥ नसता मी गुरु गृहा जाईन । तयांच्या सेवेंत राहीन । तुमचिया कर्म बंधने । भव बंधन वाढेल ॥५६॥ तव बसवराये तये क्षणी । निघती गुरु गृहा लागुनी । तया शिवभक्ती आडवे होवोनी । बसवराया राहविती ॥५७॥ नागमांबा नामे सुगुणी । बसवेशा राहविली आपुले सदनी । हा कैसा हो विचक्षणी । म्हणतीं अवघे कार्मिक ॥५८॥ पित्राज्ञा उल्लंघुनी राहिला अन्य गृही जाउनीं । म्हणूं मूढ तरी महा सुज्ञानी । वादी कुणासी नायके ॥५९॥ एके दिनी विद्या गुरू । शिष्या सांगे सुविचारू । उदयीक चदुर्दशी निर्धारू । स्नाने करूनीं लवकरि या ॥६०॥ प्रातः स्नाने करूनी । विद्यार्थी येतीं मिळूनी । जातीं नंदीश्वराच्या आस्थानी । बसवराया सहीत ॥६१॥ तेथील नंदि कूपामाजी । पाट्या धूती बाळें सहजी । मध्व भट्टाचा बसवंत पाजी । एका मुलासी कूपी लोटी ॥६२॥ तो केव्हाचि गेला पळोन । सांगातीही गेले तत्क्षण । पडलिया मुलाचे वर्तमान । माता पितया श्रुत झाले ॥६३॥ एकांताचि धावोनि येती । दुःखे आक्रंदोनीं हृदय पिटिती । बसवराज तेथेचि असती । हाचि लोटिला म्हणती तनया ॥६४॥ मारा हाणा यासीच म्हणती । लोटोनि उगा बसला म्हणती । तव बसवेश निर्भय वदती । नाही लोटिलो म्हणोनीं ॥६५॥ तुज वाचोनि येथे कोण । तुझेच नाव सांगती विद्यार्थी गण । कांही तरी खोटे बोलून । निघोनि जावे म्हणतोसी ॥६६॥ आमुच्या मुलासी आणूनि देई । म्हणोनि करिती एकचि घाई । तव बसवराये ते समई । निघाले हो स्वस्थाना ॥६७॥ हा कोण अपराध । लादिती मजवरी अशुद्ध । मज नयेचि अबद्ध । बोल खोटे नाटे हो ॥६८॥ ऐशा दुर्जनांच्या संगती । राहू नये की निश्चिती । तव नागमांबा भगिनी प्रती । बोलताती येऊनी ॥६९॥ संगमेशाची आज्ञा आहे । कीं तूं कुसंगामाजी राहू नये । म्हणोनि हा अपवाद पाहे । मजसी घातिले ॥२७०॥ या कारणे मी जाईन । नागमांबा म्हणे मीही

येईन । तव दोघेही जातीं पंथ लक्षून । शुभेच्छा धरुनि संगमा ॥२७१॥ ही वार्ता कळाली माता पितया । धावोनि येती तया ठाया । माझा बसवराज गे बया । सांगा कोठे गेला तो ॥७२॥ या या अपवादा कारणे । गेले संगमेश दर्शना । कोठे तरी राहो म्हणोन । आम्ही स्तब्ध राहिलो ॥७३॥ आम्हासी न कळविताचि गेला । कैसा कठोर हृदयी झाला । क्षणेक उभा राहविला । नाही कां गे राजेंद्रा ॥७४॥ कवणाच्या गृही तरी राहो । तयाचे मन समाधान होवो । गावांतचि आहे ना पाहो । केंव्हा तरी मुख कमळ ॥७५॥ दुष्टानी आळ घालुनी । राजसा दवडिला ग्रामांतुनी । कैसी कर्मगती म्हणोनी शोकाकुल दंपती ॥७६॥ बसवेश नागमांबा मिळोनी । जातीं कृष्णेच्या तीरा लागुनी । चाललीसे दुथडी भरोनी । बसवे कृष्णेसी विनविती ॥७७॥ माये मज जाणे असे । गुरु संगमाच्या दर्शनास । वाट देई या समयास । गंगाधर प्रिये झणी ॥७८॥ भ्रष्ट ब्राम्हणी पाठी लागले । तया हाती मज न देई माउले । पैल तीरा पाठवी ये वेळे । कृपाळुवे गंगांबा ॥७९॥ बसवरायाची ऐकोनि विनवणी । दुभंग झाली पतितपावनी । हर हर महादेव म्हणोनी । भगिनी सवें जातीं पैलतीरा ॥८०॥ पुनः नदी एक वटली । दुथडी भरोनि चालली । मागाहूनि विप्र येउनी । विनविताती बसवेशा ॥८१॥ आपण जाणे अगाध नव्हे । आम्हासी नेणे इष्ट आहे । यांतचि तुमचे महत्व पाहे । म्हणोनी वैदिकी विनविती ॥८२॥ पुनरपी बसवे विनविले । व्योमकेशे तुज शिरी वाहिले । करुणा पूर्णे विप्रा ये वेळे । मार्ग देई जननी ये ॥८३॥ ऐसी विनवणी ऐकोनी । पुनः दुभंगली गंगा जननी । तव ते ब्राम्हणी । पैल तीरा जातातीं ॥८४॥ बसवराये महाद्वारी । लोटांगण घालिती ते अवसरी । अंतर्गृही जावोनि सत्वरी । साष्टांगेसी नमिताती ॥८५॥ फल पुष्पादी ठेवून । चैतन्यं शाश्वतं म्हणोन । पुनः पुनः नमन करून । गुरु देवासी प्रार्थिती ॥८६॥ गुरुचि माय बाप । शरणांगताचे परिहरी त्रिताप । अनन्य भक्ता समीप । मोक्षद्वीप दाविसी ॥८७॥ श्रीच्या अग्रभागी । बैसले बसवराज योगी । निंदके आली सवेगी । बसवा लागी बोलतीं ॥८८॥ कायसी हा भक्तीं । ब्रम्हहत्या करोनि निगुती । मी एक महा भक्त म्हणोनि जगती । आडंबर दाविती ॥८९॥ तरी ती ब्रम्हहत्या जाण । सोडिली नाही रामा लागुन । केवी सोडील तुज लागुन । ओखटे भक्ति दाविसी ॥९०॥ करावे तैसे भरावे । चुकेना की ब्रम्हादिका बरवे । तरी यातुनी निसटुनी जावे । म्हणोनी आलासी देव द्वारा ॥९१॥ बोले तैसा चाले । तयाचे पदरज वंदिती भले । तयाच्या हृदयींच पाहिले । पाहिजे की शंकरा ॥९२॥ जीव हिंसा करोनी । पाठी पडतोसी देवाच्या येउनी । तरी आम्ही तुज लागुनी । कैसे सोडू बसवेशा ॥९३॥ तव बसवराये विप्राप्रती । हंसत मुखे बोलती । युवद्दे निंदिल्या गभरतीं । तोंड काळे कुणाचे ॥९४॥ बके निंदी मराळ मी तुजहूनि अति सोज्वळ । परी हिंसक अमंगळ । मीचि आहे म्हणेना ॥९५॥ तैसें गतीं माझी आहे । अनथ आळ घालिता पाहे ।

पापभीरू असोनि काय । निरुपाय ये समई ॥९६॥ वयोवृद्धासी काय करावे । ज्ञान वृद्धांचे पद वंदावे । ताड उंचावला तरी काय । दवणा चिमुकला देवा शिरीं ॥९७॥ तुम्ही तरी नाही लोटिला । साक्ष सांगावे आम्हाला । संगमेशा वेगळा । साक्ष कोण या विषई ॥९८॥ संगमेशा साक्ष बोलाबिता । मग काय आम्हा चिंता । तव स्नान करोनि तत्वता । पत्र पुष्पादि संग्रही ॥९९॥ बसवे पूजा वेगळे सारी । गौळपती म्हणे ते अवसरी । का आमुच्या पूजेंत त्रिपुरारी । साक्ष बोलत नाही का ? ॥३००॥ सत्यचि तो बोलेना । दांभिक पूजा तुमची नाना । पोटासाठी श्रंगार नाना । करी तसा लौकिकी ॥३०१॥ एका करवीर पुष्पाची सरी । अर्क पुष्पे सहस्री । करवीर एका सहस्री । एका द्रोण पुष्पा सम ॥२॥ द्रोण पुष्पें सहस्र । एक मल्लिका पवित्र । ऐसे मल्लिका सहस्र । तया बकुल एक श्रेष्ठ पैं ॥३॥ सहस्र बकुले शिव पूजिला । तरी सम नोहे एका उत्पला । सहस्र उत्पले लिंग पूजिला । एका कमला सम नये ॥४॥ एका धत्तूर पुष्पाप्रती । सहस्र कमळे सरी न पावती । एका कर्णिका प्रति । सहस्र धत्तूर सम नोहे ॥५॥ सहस्र कर्णिकाहूनि विशेष । एक शांडिल्य पुष्प देख । हजार शांडिल्याहूनि अधिक । एक बिल्वं शिवार्पणं ॥६॥ हजार बिल्वार्चनाहून । एक भक्ति विशेष जाण । ऐसा हा आगम प्रमाण । बसवराजे बोलती ॥७॥

॥ वीरागमे ॥ श्लोक ॥ अर्कपुष्पसहस्रेण करवीरं विशिष्यते । करवीर सहस्रेण द्रोणमेकं विशिष्यते ॥३०८॥<br>
द्रोणपुष्प सहस्रेण मल्लिकैका विशिष्यते । मल्लिकानां सहस्रेण बकुलंतु विशिष्यते ॥३०९॥<br>
बकुलानां सहस्रेण चोत्पलंहि विशिष्यते । उत्पलानां सहस्रेण पद्म मेकं विशिष्यते ॥३१०॥<br>
पद्म पुष्प सहस्रेण धत्तूरंतु विशिष्यते । धत्तूरंच सहस्रेण कर्णिकारं विशिष्यते ॥३११॥<br>
कर्णिकार सहस्रेण बिल्वमेकं विशिष्यते । बिल्वपत्र सहस्रेण । भक्तिमेकं विशिष्यते ॥३१२॥

अष्टभावे षोडशोपचारे पूजून । निष्ठा भक्तीने पूर्ण होऊन । बोलती सद्गुरुनाथा भृष्ट विप्र जन । आळ मजवरी घातिली ॥३१३॥ मी जरी असेन अपराधी । तूचि शिक्षा करी आधी । मज या द्विजांची उपाधी । अधिक झालीसे मृत्युंजया ॥१४॥ एकचि देव तू जगत्रयी । सर्वांभूती गूढ निश्चयी । सर्वव्यापी अव्ययी । अंतरात्मा भूतांचा ॥३१५॥ सर्वाध्यक्षा सर्व भूताधिवासा । साक्षी चैतन्य सगुण निर्गुण विशेषा । सत्य सत्य वदे साक्षा । अपराधांतूनि मुक्त करी ॥१६॥ तव काय चमत्कार झाले । हजार विजा कडाडले । सकळांचे कान टाळे बसले । पडले देऊळ भासते ॥१७॥ विप्र सैरावैरा धांवती । आता बरवी नाही गती । ढुंकोनिया मागे पाहती । प्रशांत दिसे

सर्वत्र ॥३१८॥ तव विप्र धाऊनि आले । महा गंभीर ध्वान ऐकिले । मध्य भट्टाच्या बसवरसे लोटिले । विचारा जा मृतात्मया ॥१९॥ अपराधी म्हणती आम्ही विप्र । दयाळू तू शंकर । तव बोले बसवराजेंद्र । पतित पावन संगमेशा ॥२०॥ पूजा कवणाची वरिष्ठ । भर्गो देवा सांगिजे स्पष्ट । निष्काम भक्ती ही श्रेष्ठ । मोक्षार्थ पूजा बसवाची ॥२१॥ तव द्विजांचे मुख म्लान झाले । अपराधी म्हणोनि लोळती ते वेळे । क्षमस्व परमेश्वरा तुज आगळे । दैवत नाही त्रिभुवनी ॥२२॥ अपराधी आम्ही बसवेश्वरा । तू द्वितिय शंभू सर्वेश्वरा । अज्ञ आम्हा पामरा । महिमा तुझी कळाला ना ॥२३॥ सर्वज्ञ गुणवंत तुम्ही । अल्पज्ञ अवगुणी आम्ही । क्षमा कराजी स्वामी । म्हणोनि पायी लोळती ॥२४॥ चंदनासी उगाळिले । किंवा इंधनी जाळिले । अपुल्या सद्‌गुण गंधासी भले । पसरील की वाता सवे ॥२५॥ इक्षु दंड घाण्या माजी पिळिले । रस कडाईत शिजविले । गुड शर्करा होय निर्मळ । सर्वत्रांसी अति प्रिय ॥२६॥ कर्पूर स्वये जळून जाय । मंदिर सर्व सुगंध होय । सज्जना दुखवता ही पाहे । जनी जनार्दना सुखविती ॥२७॥ जावोनिया मृतात्म्यासी । बलाऊनी आणा या समयासी तया मुखे जन समूहासी । साक्षी बोलूनि दावीन ॥२८॥ मृत देही कैसा येईल ? । तो माझी अवज्ञा न करील । बसवराये बोलाविती चाल । ममाज्ञा तया श्रुत करा ॥२९॥ तव द्विजे लगबगी जाती । बसवरायाची आज्ञा कळविती । झडकरोनि उठला क्षिती । कोठे बसवराज म्हणतसे ॥३०॥ तया मुलासी पाहता क्षणी । आश्चर्य पावती सकळ जनी । तव जननी जनका लागुनी । अत्यानंद जाहला ॥३१॥ शिवचि हा बसव । परिहरिला आमुचा गर्व । आता जाऊ चला सर्व । बसवराया सन्निध ॥३२॥ तया बाळा घेऊन । येती माता पिता सर्व जन । बसवरायासी लोटांगण । येऊनि सकळी घालिती ॥३३॥ तव बसवराये विचारिती । कुणी लोटिले कवण तुज प्रती । सत्य सांगे वर्तली संगती । सकळा समक्ष या समई ॥३४॥ मग तो कुमार बोले । मध्वानजेचि मज लोटिले । म्हणोनि धाडकन पडिले । कलेवर भूमीसी ॥३५॥ तव सकळासी विचित्र झाले । माता पिता शोक सागरी बुडाले । अपराध क्षमा कीजे ये वेळे । मृतात्म्यासी जीववा ॥३६॥ हा एकुलताचि कुमार । झालो वृद्धापी जर्जर । कृपादृष्टी अवलोकोनि सत्वर । कुमारा जीवदान देइजे ॥३७॥ माता पिता दुःखित होती । बसवरायाच्या चरणी लोळती । अश्रुधारे चरण क्षाळिती । कृपा करा म्हणती दीनावरी ॥३८॥ बसवराये तये क्षणी । ऊठ बाळा म्हणोनी । कृपादृष्टी अवलोकुनी । उठविताती कुमारा ॥३९॥ तव उठताचि कुमार । बसवराया चरणी लोळे सत्वर । तुमचिया दये मृत्युद्वार । लाथाडोनि आलोजी ॥४०॥ तुम्हीच माझे माता पिता । तुम्हीच बंधु बांधव आता । तुजवीण मज त्राता । कोणी नाही झालेती ॥४१॥ म्हणोनिया कुमार । कृतज्ञत्वे वांकवी शिर । माता पिता येऊनि सत्वर । बसवेशाशी नमिताती ॥४२॥ आणीक येऊनिया

श्री. हा.

ब्राम्हणी । प्रणाम करिती बसवा लागुनी । कृपादृष्टी अवलोकुनी । रक्षावेजी म्हणताती ।।३४३।। तव बसवराये बोलती । एको रुद्र न द्वितीय बोले श्रुती । हा भाव धरोनिया चित्ती । सदा सर्वदा वागावे ।।४४।। जावे तरी नदी भरली । विनविती बसवा विप्र मंडळी । बसव कुमारे गंगा माउली । प्रार्थी ब्राम्हणा कारणे ।।४५।। तव गंगा माता दुभंगली । ब्राम्हणासी मार्ग दिधली । जाती आपुल्या ग्रामा तये वेळी । विप्रादीक सर्वत्र ।।४६।। प्रथम वादी जिंकिले । द्वितीय गंगा नदी दुभंगुनी गेले । तिजे संगमनाथा बोलाविले । सकळ जना समक्ष ।।४७।। पुनः एकदा वदविले । गंगा नदीतुनी द्विजा आणिले । सहावे मृतात्मया आणविले । सजीव तया लागुनी ।।४८।। तयासी साक्ष बोलाविले । सर्वेच तयाचे जीव गेले । पुनः तयासी जीवविले । कृपादृष्टी करोनी ।।४९।। अत्यंत महात्मे नऊ जहाले । पर शिवचि जगी अवतरले । महिमा पुरुष लोकोत्तर म्हणविले । भक्ति भंडारी बसवेश ।।५०।। ऐसे कप्पडी माजी असता । संगमे जंगम रूप धरूनि तत्वता । बसवराया जवळी घेऊनि जगत्पिता । बोले महंता जगद्‌गुरो ।।५१।। लिंगांगिया पाहता क्षणी । केवल शिव रूप मानी । इच्छितार्था पुरउनी । पूजिजे त्वां सद्‌भावे ।।५२।। कल्याण पट्टणिचा अधिपती । बोलाविता जावे निश्चिती । वस्तु वाहनादि स्वीकारी निगुती । संग्रह करी शरणांचा ।।५३।। आलिया अतीता । विन्मुख न करीताता । चरदासोह चालवी आता । सदा सर्वदा भक्तीने ।।५४।। घातुकांचा निःपात करी । महाजनांची संगती धरी । सत्क्रिया सदाचारे वर्तन करी । हीच संपत्ती जाणावी ।।५५।। येईल अल्लम योगी । तयासी शरणांगत होई वेगी । षटस्थल मार्ग दाखवी जगी । प्रसिद्ध करोनि सर्वस्वे ।।५६।। शिव दीक्षा संपन्न झाला । शिवरूपीच मानावे तयाला । प्राकृत अप्राकृत म्हणविला । मानव जगामाजी पैं ।।५७।। वर्णाश्रम धर्मामाजी । दोन भाग जाणावेजी । कथिले एक शिव सहजी । तेचि शिव धर्म जाणिजे ।।५८।। ब्राम्हणादि, चातुर्वर्ण । ययासी तू प्राकृत जाण । पंचसूतकयुक्त जन । सूतका विरहित अप्राकृत ।।५९।। या कारणे शिव संस्कार युक्त । जाति भेद करू नये सर्वथा । इंधने अग्निमाजी दग्ध होता । पूर्व रूप कैंचे तया ।।६०।। तैसे शिव संस्कारिया माजी । भेद मानू नये सहजी । सर्व संस्कारामाजी । दीक्षा संस्कार श्रेष्ठ पैं ।।६१।।

।। सिद्धांत शिखामणी ।। विशुद्धा प्राकृताश्चेति । द्विविधा मानुषा स्मृताः । शिव संस्कारिणः शुद्धा । प्राकृता इतरेमताः ।।३६२।।

वर्णाश्रमादि धर्माणां व्यवस्थाहि द्विधामता । एका शिवेन निर्दिष्ठा । ब्रम्हणा कथिता परा ।।३६३।।

शिवोक्त धर्म निष्ठा तु शिवाश्रम निषेविणां । शिवसंस्कार हीनानां धर्मः पैतामह स्मृतः ।।३६४।।

शिवसंस्कार युक्तेषु जाति भेदं नकारयेत् । काष्ठेषु वन्हि दग्धेषु । यथारूपं नविद्यते ।।३६५।।

तस्मात्सर्व प्रयत्नेन शिवसंस्कार संयुतः । जाति भेदं न कर्तव्यं शिवभक्तो कदाचन ।।३६६।।

ऐसा हा शिव संस्कार । श्रेष्ठ जाणावे निरंतर । ऐकोनिया बसंव कुमार । दीक्षा संपन्न करा म्हणे ॥३६७॥ सद्गुरू तये क्षणी । आव्हानिती आचार्या लागुनी । मग आगमोक्त विधीनी । दीक्षा करिती नागांबेसह ॥६८॥ वेधा मनुक्रिया रूप । दीक्षात्रय संपादी सुखरूप । तव वरदहस्त निरुप । ठेविती मस्तकी बसवाचे ॥६९॥ जन समूह देखता । अंतर्धान पावले श्रीगुरु तत्वता । संगमेश गुण गान गाता । पंचमोध्याय संपला ॥७०॥ इति श्री हावगिलिंग लीलामृत । श्रवणे प्राशन करा सद्भक्त । होताल जन्ममरणा विरहित । बसवलिंग बोले भालपुरीचा ॥३७१॥

श्रीगुरु बसवलिंगार्पणमस्तु । श्रीगुरु हावगिलिंगार्पणमस्तु । शुभंभवतु । मंगळमस्तु ।

इतिश्री हावगिलिंग लीलामृते श्री बसव महिमा वर्णनं नाम

पंचमोध्याय गोडः ॥

श्री बसवराज दिनमणि जाउनि कल्याणि वाचि शिवलिखिता । बिज्जळ सिंव्हासनिचे धन पाहुनि भूप देत बहु सत्ता ॥१॥
चर दासोहा साधुनि निंदक जनतेस दावि महिमाते । लज्जित होउनि मानसि बसवेशा धन्य म्हणति निंदकते ॥२॥

ॐ तत्सवितुर्वरेणियम् । भर्गो देवस्यधीमही । धियोयोनः प्रचोदयात् ।

यया गायत्रीसी अधिपति । शिव सर्वोत्तम पशुपति । जया भर्गोदेव म्हणती । प्रणाम करिती चारी वेद ॥३॥

॥ तात्पर्य संग्रहांत ॥ वाच्यः किमस्य सविता सवितुर्वरेण्यैः किंवा भवानितिवितर्कपदं न शेषां । भास्वंतदेव विषयी कुरुतेन मंत्रः ।
शक्नोति वक्तु मधि दैवत मीश्वरत्वां ॥४॥

तेया सूर्यं देवाप्रती । प्रसविता पिता म्हणती । सवित्यासी जो वरेण्य जगती । तया म्हणती भर्गोदेव ॥५॥ जगाचा पिता सविता । कां ? भर्गो देव जगत्पिता । हे अनुमान वाक्य तत्वता । कोठेही ना सांपडे ॥६॥ भर्गोदेवासीच ध्याईन । परी सवित्यासी ध्यातो न म्हणे । जो बुद्धीसी प्रचोदन । करी सर्वांतरी बसूनिया ॥७॥ भूर्भुवः सुवरादिकासी । प्रकाशदाता सवितादिकासी । म्हणोनिया चतुर्दश भुवनासी । भर्गो देवचि अधिदैव ॥८॥ मैत्रायण श्रुतीचे वचन । रुद्रचि भर्गोदेव जाण । सांगतसे वैय्याकरण । भृस्ज धातु पाकार्थी ॥९॥ सकल जगासी एकवटून । प्रलय करणेचि पाक जाण । सकल जगाचा संहार कारण । कालाग्नि रुद्र नव्हे का ? ॥१०॥

॥ मैत्रायण श्रुति ॥ मैत्रायण श्रुतिरसौ तदिति प्रकृत्य । भर्गं भवंत मभिधाय विचिंतनीयं ।
रुद्रस्य भर्ग पद गोचरतां ब्रुवाण । सांतं प्रति क्षिपति भर्ग पदं पुराणे ॥११॥

स्मरण करावया लागी तुज । सांगतसे की हे गुज । कालाग्नि रुद्रा तुजचि सहज । भर्गोदेवस्य म्हणतसे ॥१२॥ तया सर्व शक्त भर्गासी ध्यातो । तोचि भगवान् रुद्र म्हणवितो । या विरहित सवितातो । उदयास्त ससीम ॥१३॥ ये विषई नैघंटुकार । सांगति तेचि विचार । हर स्मर हरो भर्ग साचार । त्र्यंबक त्रिपुरांतक म्हणोनी ॥१४॥ ते हे भर्ग नाम । जाणावे की परंधाम । असे ही उत्कृष्ट परम । सांब स्मृति म्हणे स्वयं ज्योती ॥१५॥ सांब स्मृति मंत्रोपनिषद । तोचि भावार्थ सांगती विशद । यया मंत्रातुनी सहज । कळो ये ॥१६॥

॥ श्लोक ॥ त्वमेत्र मंत्रोपनिषद्ब्रवीति तदित्यतोस्यं प्रदिपाद्यमर्थं । तदक्षरंतत्सवितुर्वरेण्यं प्रज्ञाश्च शब्दगो प्रथितान्स शब्दान् ॥१७॥

हे परशिवा अभवा । या, गायत्रीचा अर्थ बरवा । तुजसीच प्रतिपादी स्वयंभुवा । सूर्यां न सांगे मंत्रोपनिषद ॥१८॥ ते जाण अक्षर ब्रम्ह । तमो मेघाहूनि असीम । तमो मेघादि काल संक्रमणा ससीम । रवि किरणे ॥१९॥ तत्पदते स्वयं ज्योति । अंतर्बुद्धीसी चेतविती । बहिः

शब्दा प्रसिद्ध करिती । तैसा गभस्ती न करी की ॥२०॥ तरी सविता हा शब्द । तुझ्या ठाईच प्रसिद्ध । ज्योतिर्महा लिंगाचा प्रबोध । भर्ग शब्दे होतसे ॥२१॥ यज्ञवैभव खंडामाजी । सूते सांगितले शौनकालागी । हा भावार्थं सहजी । श्रवण कीजे सज्जनी ॥२२॥

योनो स्माकं धियश्चितान्यंतर्यामि स्वरूपतः । प्रचोदयात् प्रेरयच्च तस्य देवस्य सुव्रताः ॥२३॥
दीप्तस्य सर्वं जंतूनां प्रत्यक्षस्य स्वभावतः । सवितुः स्वात्म भूतंतु वरेण्यं सर्वजंतुभिः ॥२४॥
भजनीयं द्विजा भर्गस्तेजश्चैतन्य लक्षणं ।

हे द्विजवर्य सुव्रत । जो देव अमुच्या चित्ता प्रत । अंतर्यामी स्वरूपतः । प्रेरेपितसे निशिदिनी ॥२५॥ सर्व जीवांच्या हृदयी राहून । स्वयं प्रकाशे दीप्तिमान । तया भर्गाख्य स्वयंज्योती लागून । उपासना करू या ॥२६॥

॥ श्लोक ॥ स्वमायाशक्तिसंछन्नं जगत्सर्गादिकारणं । तच्छद्ब वाच्यं सर्वज्ञं । शिवरुद्रादि संज्ञितं ॥२७॥

तत्पदे तो परब्रम्ह । जगत्सृष्टयादि कारण । स्वमाया शक्ति संच्छन्न । अर्धनारी नटेश्वर ॥२८॥ शिवरुद्रादि नामे करून । विश्वरूपाय वैनमो म्हणून । श्रुतीने शतसहस्र नमना । तया भर्गासी करीतसे ॥२९॥ नीलग्रीव विरूपाक्ष । सांब मूर्त्यादिका उपलक्ष्य । जयाच्या भेणे सूर्यादिक । स्व स्वकार्यी रत असती ॥३०॥ तया आदित्य मंडळी बसून । जगच्चक्षु म्हणविला जाण । तया भर्गोदेवा लागुन । उपास्महे उपासूया ॥३१॥ कायापुरी गायत्री स्थळ । सूर्येदुज्ज्वळ वन्हि मंडल । तया वन्हि मंडळी महालिंग सोज्वळ । दर्शन करू गुरु मार्गे ॥३२॥ आता सिंव्हावलोकने करून । ऐका बसवेशाचे कथानुसंधान । संगमी नागांबेसह वर्तमान । करिती लिंगार्चन जपतपादी ॥३३॥ शिव कथा शिव गोष्टी जाण । वेदोपनिषदांचे विवरण । आलिया सद्भक्ता लागुन । सदुपदेशे काळक्रमी ॥३४॥ कैलासीचा त्रिदंडी । आलासे मर्त्य भवांडी । बिज्जळ नामे कुप्रजा दंडी । कल्याणी ज्याचे स्वराज्य ॥३५॥ करणिकामात्य राउत । आणीक ते हयगज रथ । भाट परिहासी कवी पंडित । गायक पुराणिक इतिहासी ॥४६॥ ऐसा चतुरंग सेना युक्त । आनंदे प्रजा पाळित । सिंव्हासन स्वर्णखचित । पंडितासहित शोभतसे ॥३७॥ सुखसंकथालापामाजी । पडलीसे लिपी सहजी । दूते दावी लगबगी । राया लागी तये क्षणी ॥३८॥ तव राये पंडितांसी बोले । कायसी लिपी पहा हो भले । पंडित प्रवर निरखोनि पाहिले । असाध्य लिपी म्हणताती ॥३९॥ इतर भाषिकां बोलाविले । न जाणो म्हणती अक्षर जाळे । ऐसा कैसा तुम्हा न कळे । अस्थान् विद्वान म्हणविता ॥४०॥ धिःकार असो तुमचिया जन्मा । खादोनि काय केलो इनामा । ऐसा कैसा ओनामा । पंडितांसी अतर्क्य ॥४१॥ तव राव बैसला चिंताक्रांत । बळदेव सचिव प्रज्ञावंत । माझा जामातृ

संयमीधीमंत । वरदहस्तिक संगमाचा ॥४२॥ द्वितीय शंभूचा अवतार । कलियुगी अवतरला साचार । सं ामनायाचा वरदपुत्र । सकळ शास्त्र जाणता ॥४३॥ तयासी बोलवा या क्षणी । ही लिपी वाचील तत्क्षणी । महापंडीत त्रिकाल ज्ञानी । अ ्य तयासी बं.लवा ॥४४॥ ऐसा जरी आहे सूज्ञ । आताचि बोलवी तू प्राज्ञ । तू का आहेसी अनभिज्ञ । राज्यकार्य धुरंधर ॥४५॥ तथास्तु म्हणोनि सवेग । बलावण्याचा केला सुयोग । पत्रिका लिहूनिया सुभग । संगमा पाठविती सेनाधिपा ॥४६॥ पत्रिका नेऊनि सेनापति । बसवरायाच्या करकमळी देती । हंसत मुखे वाचोनि म्हणती । सांगा विशेष काय ते ॥४७॥ तव बोले सेनाधिकारी । पत्र दर्शनी राजाज्ञा आतुरी । आले पाहिजे कल्याण नगरी । बलदेवेही विनविले ॥४८॥ आपण आलिया कल्याणासी । पार नाही आनंदासी । सर्वाधिकार आपुल्यासी । समर्पील भूपति ॥४९॥ ऐकोनिया बसवराजेंद्र । संगमदेवा करी साष्टांग नमस्कार । कर जोडोनि विनवी साचार । बिज्जळे सत्वर आमंत्रिले ॥५०॥ सेवकासी आज्ञा । सांगिजे की सर्वज्ञा । तव वियोग दीनासी प्राज्ञा । क्षणमात्र न साहे ॥५१॥ हे कैसे माझे दुर्दैव । तव दर्शनी वियोग सदैव । तुज वाचोनि अधिदेव । आणीक मज कोण ते ॥५२॥ तूचि माता तूचि पिता । तूचि बंधू सखा तत्वता । तूचि हर्ता तूचि त्राता । आणीक नाही चिंतिलो ॥५३॥ आता मज कांही सुचेना । काय सांगू राज मंत्रीना । होईल जैसी आज्ञा । तैसे सर्वज्ञा वागेन ॥५४॥ ऐकोनिया बसव विनवणी । संगमे जंगम रूप घेउनी । बसवरायासी कुरवाळोनी । आज्ञापिती तेधवा ॥५५॥ ममाज्ञा वंदोनि शिरी । जाइजे कल्याणा सत्वरी । सकळ सिद्धी तुझिया द्वारी । राबतील अनुदिनी ॥५६॥ वाक्परुषादि पंच परुष । तुज दिधली सहर्ष । तव हृदयीं वसोनि मी सर्वेश । इच्छितार्थ पुरवीन ॥५७॥ दुजे न बोले वचन । जाई बसवा ये क्षण । तुज होईल कल्याण । सत्य सत्य त्रिवाचा ॥५८॥ ऐसे देवोनि आशिर्वचन । लिंगामाजी झाले लीन । पुनः पुनः करोनि नमन । नागांबेसह निघताती ॥५९॥ दोघे सुखासनी बैसती । संगम स्मरणे कल्याणा येता । बसवा गमनाची वार्ता निश्चिती । ऐकोनि भूपति हर्षला ॥६०॥ तव पंच महावाद्ये सघन । वाजताती सुस्वरे करोन । बिज्जळे महाजना बलाऊन । दळभार घेऊनी समोर ये ॥६१॥ बसवरायासी आलिंगुनी । आनंदे आले नगरा लागुनी । बलदेव मातुला सदनी । राहविती बसवेशा ॥६२॥ राये स्व सदनाहूनी । सकळ साहित्य पाठवी तत्क्षणी । आनंदे लिंगार्चन करोनी । मातुला सवे बोलती ॥६३॥ तव राजदूत येती । बलदेव सचिवा सुचविती । मग बसवरायासह जाती । सभांगणा ते वेळी ॥६४॥ राये सिंव्हासन उतरोनी । बसव भानूचे करकमळ धरोनि । बैसवितसे सिंव्हासनी । दक्षिण भागी आनंदे ॥६५॥ राये लिपी आणविला । बसवेशा हाती दिधला । बसवराये शिरी वंदिला । लिपी घेवोनि तेधवा ॥६६॥ वाचोनि बोले रायासी । भाग्य लक्ष्मी उदेली या समयासी । सिंव्हासनाच्या

तळासी । अपरिमित धनरासी आहे हो ॥६७॥ अठ्यांसी कोटि सुवर्ण मुद्रा । असती सिंव्हासना तळी राजेंद्रा । आताचि काढि भूपेंद्रा । संशय न करी ये समई ॥६८॥ सफल वृक्षा पक्षी अपेक्षिती । गुळासी मुंग्या झोंबती । वनिता जन पुरुषाश्रयिती । नद्या मिळती समुद्रा ॥६९॥ तैसे लौकिकी जन । आश्रय करिती धन स्थान । धन वार्ता ऐकता क्षण । रायाची तनू रोमांचित ॥७०॥ बसवेशा तुझे अमृत वचन । जरी सत्य होईल जाण । तरी सर्वाधिकार तुज देऊन । गौरवीन सर्वस्वे ॥७१॥ सद्यः बोलवा गवंडिया । सिंव्हासनासी उकलोनिया । पहावे सत्यासत्य या समया । विलंब कासया करिताजी ॥७२॥ तव गवंडिया आज्ञापिले । येऊनि सिंव्हासन उकलिले । रांजणावरील झांकण काढिले । सर्वा देखत तेधवा ॥७३॥ तव सुवर्ण मुद्रा झळकती । काय नक्षत्रेचि भरिले रांजणा अंति । हूं काढा हो काढा म्हणती । भूपतीने अविवेके ॥७४॥ तव बसवराय बोलिले । अवसर न करा ये वेळे । भोजनांतर इतुले । काढू आम्ही धनराशी ॥७५॥ राये तथास्तु म्हणोनी । आज्ञा देई बसवेशा लागुनी । उपाहार करोनी । आला राव सभेसी ॥७६॥ आले नाही बसवदेवानी । असो काढा की येती म्हणोनी । दूतीं स्पर्शता धनासी ते क्षणी । अशुद्ध ओकुनी मृत झाले ॥७७॥ राव भयभीत झाला मनी । रे हे धनराशी नव्हे प्रळयाग्नी । उपयोग काय मज लागुनी । अप्रयोजन वाटते ॥७७॥ स्पर्शताचि जीव गेले । पाप राशी नव्हे का भले । राजाज्ञे प्राणासीं मुकले । बापुडे जीव ॥७९॥ भयग्रस्त होवोनि भूपाळ । बसवराया बोलवा तत्काळ । म्हणोनि पाठवी दूतास ते वेळे । जावोनि बसवेशा विनविती ॥८०॥ भूपे मार्ग प्रतिक्षा करीत । बैसले असती महाजना सहित । दयानिधीसी त्वरित । यावे म्हणोनि सुचविले ॥८१॥ ऐकोनि दूताची वाणी । बसवदेवासह येती सभास्थानी । येताचि बिज्जळे आपुली करणी । इत्थंभूत सांगितली ॥८२॥ बसवराये तये क्षणी । रायासी म्हणती कोपोनी । मी तरी गेलो सांगुनी । की अवसर तुम्ही न करावे ॥८४॥ करूनिया अस्थिर मन । बापुड्यांचे घेतले प्राण । का पळोनि जाते तुमचे धन । म्हणोनि अनुमान केलाती ॥८४॥ म्हणोनि बसवेश तये वेळी । प्रार्थोनि अंतःकरणी चंद्रमौळी । कृपा दृष्टीने न्याहाळी । सेवकांसी तेधवा ॥८५॥ उठे जैसा झोपेजला । उठती तैसे दूत ते वेळा । मृत की मूर्छित अवलीळा । लीला द्वितिय शंभूची ॥८६॥ तव दूती उठोनी । नमन करिती बसवा लागुनी । भूपांसह सभाजनी । प्रणाम करिती बसवेशा ॥८७॥ धन्य धन्य बसवा म्हणती । अवतरलासी लीलामूर्ती । आमुचे अपराध चित्ती । कृपाळुवा नाणावे ॥८८॥ तव काढा हो म्हणे धनराशी । दूतां हस्ते काढविले मुद्रेसी । हापापला जो धनासी । तो बिज्जळ मुखी अंगुली ठेवी ॥८९॥ तव दूती निर्भये काढिती । सभांगणी राशी घालिती । पाहणारांचे नेत्र दिपती । स्वर्ण मुद्रांच्या प्रकाशे ॥९०॥ ताजवे आणोनि भूपाळ । तोलविता मुद्रा सकळ । बसवेश परुष दृष्टीने सकळ । गणनातीत जाहले ॥९१॥

तव राये कृतकृत्य होउनी । लागे बसवरायाच्या चरणी । महिमा पुरुष तू जनी । लोकोद्धारा आलासी ॥९२॥ तव पत्रिका लिहोनि तत्क्षण । राजमुद्रावरती दावुन । सर्वाधिकाराची पदवी जाण । राये देतसे बसवेशा ॥९३॥ कनकांबर दुकूले । राव आणवी तये वेळे । शिरपेंचा मोत्किक तुरे झळझळें । बसव शिरी ठेविले ॥९४॥ गज तुरंगासी सजवोनी । बसवरायासी अंबारींत बैसवुनी । मिरविती राजमार्गांतुनी । चहु बाजारामाजी पैं ॥९५॥ वाजंत्री वाजती घनघोर । भाट गाती कीर्ती थोर । चतुर्दळ सैन्यासह परिवार । मिरवत येती राज सदना ॥९६॥ सभामंडपी आले । राये अर्धं सिंव्हासन दिधले । सकल प्रधाना सुचविले । की बसवेश्वर मुख्य मंत्री ॥९७॥ यांचेचि आज्ञे वर्तावे । अद्वेष्टे सर्वत्री वागावे । निर्विघ्नपणे राज्य चालवावे । बसवेशांच्या सन्मार्गी ॥९८॥ तव नूतन पुरातन राज भंडार । बसवराया सोंपवी राजेंद्र । आजिपासोनि राज्याचा भार । तुजवरी म्हणे बिज्जळ ॥९९॥ मग बसवेशांच्या अंजलींत । बिज्जळे अन्नराशी ठेवित । रक्षण करीं प्रजा समस्त । आपुलकीने अहर्निशी ॥१००॥ तव एक राजमंदिर । निर्माण करोनि अति सुंदर । बसवेश्वरासी निरंतर । तयामाजी राहविती ॥१॥ शिवगणांसह बसवेश्वर । राहती राजमंदिरी सुस्थिर । राजकार्यं धुरंधर । चालवीतसे अति हर्षें ॥२॥ तव एके दिनी मातुळ बलदेव । बसव मंदिरा येवोनि स्वये । बोले तुमचिया अर्धांगी ठाव । मम कन्येसी देइजे ॥३॥ एवढी अपेक्षा पूर्ण करी । म्हणोनि विनवी सुविचारी । कर्म विरहित आम्ही शिवाचारी । कर्माकर्मिया असंबंध ॥४॥ मजसी नगमे हा संबंध । आम्हा तुम्हा कर्मांचा निर्बंध । कर्म विरहित संबंध । आम्हा लागीं पाहिजे ॥५॥ बलदेव म्हणे तत्वता । स्वेच्छे स्वीकारावी दुहिता । तुमचिया परौता । माझा विचार नाहीच ॥६॥ मम कन्येसी दीक्षा संस्कार । कीजे लिंग धारणा पवित्र । तव सेवेंत घेइजे सुचरित्र । सुकन्येसी एधवां ॥७॥ बसवराये मम म्हणितले । मातुळासी अति हर्ष झाले । विवाहाची तयारी केले । आमात्यानी ते वेळी ॥८॥ भागवाडीसी आमंत्रुनी । बोलविली मादांबा भगिनी । वार्ता ऐकोनि तये क्षणी । मादिराज मादंबा अति हर्षली ॥९॥ आमुच्या पुर्वार्जित पुण्ये । म्हणविला आम्हासी नंदन । पुत्र एकोपि गुणवान् । निर्गुणेन शतैरपि ॥१०॥ हा वाक्यार्थं सफळ झाला । उदरी द्वितिय शंभूचि आला । आमुचा जन्म सार्थक केला । म्हणोनि येती कल्याणी ॥११॥ पाहोनि बसव कुमारा प्रती । माता पिता अति हर्षंती । बसवरायासी आलिंगिती । कुरुवाळिती सप्रेमे ॥१२॥ तव गंगांबेचे दीक्षा समारंभ । माहेश्वरा बोलवोनि करिती प्रारंभ । आगममार्गें स्वयंभ । दीक्षा संस्कार करिताती ॥१३॥ करण्या लग्न तिथीचा निश्चय । आमंत्रिती भक्त माहेश्वरा स्वये । गणाधिपति पूजूनि सुसमय । शुभ लग्नासी साधिती ॥१४॥

भवसंचित पापौध विध्वंसन विचक्षणं । विघ्नांधकार भास्वंतं विघ्नराज महंभजे ॥११५॥

तव बसव राये म्हणती । आमुचे शिव शरण मान्यता देती । तेचि राशी कूट निश्चिती । शुभ लग्नासी जाणावे ॥११६॥ जे माहेश्वर निश्चय केले । तीच लग्न वेळा निर्णिले । गुरुदेव जंगमा पत्रिका लिहिले । गुड जीरक बांधिले नववस्त्री ॥१७॥ चंद्रवीथी सूर्यवीथी । कल्याणी सर्वही श्रृंगारिती । षट्संमार्जने रंगवल्लिका रचिती । उभविती गुढी तोरणे ॥१८॥ महाद्वारें सर्व श्रृंगारिले । स्वस्तिक चिन्हे सुस्वागत रचिले । हरिद्रादि पंचवर्णी रंजिले । राज मंदिर सर्वही ॥१९॥ मंडप देवता प्रतिष्ठापुनी । नंदि मुख्यगणा आराधोनी । वधुवरा हरिद्रा लेपुनी । मग सुवासिनी गंगाव्हानिती ॥२०॥ तव सीमंत पूजा संभ्रमेसी । करीतसे बलदेव अति हर्षेसी । अपरिमित वस्त्राभरणे धनरासी । मातुळे समर्पी जामाता ॥२१॥ वीर माहेश्वर शिवशरणा । राव बिज्जळ आमात्याना । महाजन दैव सद्भक्ताना । ग्रामस्थ सज्जना बोलाविले ॥२२॥ बिज्जळें परिवारासहित । विवाहा आला वाजत गाजत । आणीक ग्रामीण समस्त । येती लग्ना स्वानंदे ॥२३॥ मंडपी रचित बहुले । वरी आचार्य स्थानापन्न झाले । पंचकलशा स्थापिले । यथाविधी ॥२४॥ तीर्थोदके भरिले कलश । प्रथम पूजोनिया विघ्नेश । आव्हानोनी आचार्यांस । पूजितीं कलश षोडशोपचारे ॥२५॥ गंगांबेसी मंगलस्नान । करिताती सुवासिनीजन । अष्टगंधे लावोनि उटणे । नवपीतांबर प्रावरितीं ॥२६॥ आणीक कुंकुम कस्तुरी । तिलक लाविती फणिवरी । दिव्यालंकार कुसरी । लेवविती वधूसी ॥२७॥ सर्व श्रृंगार एकवटोनी । आले गंगांबेच्या तनुस्थानी । सर्व मंगळेंची प्रति रूपिणी । श्रृंगार लेणी औपचारिक ॥२८॥ तैसेची वरासी मंगलस्नान । करवोनिया तये क्षण । सोवळें उत्तरीय प्रावर्ण । लाविती कुंकुम द्रव्यासी ॥२९॥ मग वधुवरासी तये क्षणी । बहुल्यावरी बैसविले गुरुजनी । गुरुसूत्र वधुवरा हातीं देवोनी । मंगळाक्षता वाटिती ॥३०॥ तव पुरोहित समुहूर्त साधोन । मंगलाष्टके सुमधुर गाऊन । गुरुजनांच्या साक्षीने । अक्षतारोपण करिताती ॥३१॥ मग वधुवरा हातीं अक्षता देती । स्व स्वमस्तकी अक्षतारोपण करविती । वामभागी बैसवुनी वधूप्रती । रुद्रग्रंथी बांधिले ॥३२॥ गुरुजन सुवासिनीजन । मंगलसूत्रासी स्पर्शून । वरा हाते वधु कंठी जाण । बांधविती ते समई ॥३३॥ मंगल वाद्ये वाजतीं सुमधुर । सुवासिनी गातीं कोकिल स्वरें । सतीसह बलदेव सत्वर । स्वर्णपात्रे कन्यादान करी ॥३४॥ अतीत अभ्यागत माहेश्वरा । दक्षिणे तोषवी बलदेव तये अवसरा । माहेश्वरी वधुवरा । आशिर्वचने दीधली ॥३५॥ भूपालादि परिवारासी । आणीक इष्टमित्र पाहुण्यासी । सुवासीक तांबूल क्रमुकासी । परिचारिक अर्पिती ॥३६॥ ऐसी ती विवाह विधी । सांगोपांग करिति सिद्धि । तव द्वितिय शंभु दयानिधी । शरणार्थ करिती सर्वत्रा ॥३७॥ तव गुरुजनी आज्ञापिती । सुखासनी बैसवोनि वधुवरा प्रती । मिरवणूक काढोनि संप्रती । पुढील कार्य साधिजे ॥३८॥ तव बसवराज कर जोडोनी । विनविती गुरु माहेश्वरा लागुनी । आपण आरूढावे

वाहनी । गज तुरंगावरी ये समई ॥१३९॥ तथास्तु म्हणोनि गुरु माहेश्वर । आरूढती वाहनी सत्वर । मागाहुनी सुखासनी बसवेश्वर । सपत्नीक बैसती ॥४०॥ अनेक वाद्यांच्या गजरी । सेनेसह निघे बिज्जळ ते अवसरी । सहस्त्रावधि लोकांच्या थरी । मिरवणूक निघाली ॥४१॥ करि तुरग रथ पदाती । आमात्य मुकुट वर्धन मंडलीक भूपती । अन्य राजे राजपुत्र समिती । स्वपरिवारे निघाले ॥४२॥ पुरजन आणि परिजन । सुवासिनी मंगळार्तिक्य घेऊन । मादांबा सुखासनी बैसुन । दासीजनासह निघताती ॥४३॥ नगारे नौबती सनया तुतुरे । कहाळे करणिया नपेरिया सुस्वरे । ढमामे गिढिबिडी ढोल धुरंधर । वाजता कर्णताळे बैसती ॥४४॥ छत्रचामरे अबदागिरी । धांवती पुढती रजत वेत्री । भाट गाती तये अवसरी । विजय शुभोदय म्हणोनी ॥४५॥ सहस्त्रावधि जनसमूहेसी । मिरवणूक निघाली बहु संभ्रमेसी । चहुं बाजारी मिरवोनि ते समयासी । आली मिरवणूक मंदिरा ॥४६॥ बलदेवे पाहुण्यांसी । तृप्त करी मिष्टान्नेसी । गंगांबेसह बसवराज ते समयासी । जंगम दासोही तृप्त झाले ॥४७॥ ऐसे चारी दिवस बलदेवे । तृप्त केला अष्टादश वर्णा स्वये । संपवूनि विवाह कार्यं । वधुवरा स्वगृहा बोळवी ॥४८॥ जामात कन्ये लागुन । बलदेवे दिधला वरदक्षिणा । सुवर्ण रत्ने बहु धना । वाजी सुखासन पालखी ॥४९॥ आणीक दिधले गोधन । वस्त्रालंकारादि सुशोभन । महावैभवे वधुवरा लागुन । स्वमंदिरासी पाठवी ॥५०॥ गुरुलिंग जंगम दासोह । चालवी बसवराये अहरह । शिवशरणांचा समूह । येती भेटावया बसवेशा ॥५१॥ मडिवाळ माचय्या हरळय्या । सोड्डळ बाचरस किन्नरि ब्रम्हय्या । केतिदेव मरुळय्या । हडपद्प्पण्णा कन्नद ब्रम्ह ॥५२॥ कलह केत ब्रम्हय्या बडिहारि ब्रम्हय्या । दसरि देव मुसुडि चौडय्या । आयदक्कि मारय्या मोळी मारय्या । चोर चिक्कय्या शूलाचा ब्रम्ह ॥५३॥ दासिमय्या शंकर दासिमय्या । अपार महिम एकांत रामय्या । गुंड ब्रम्हय्या । मुग्ध संगय्या । यलेश्वर केतय्या मारय्या तो निडगुडिचा ॥५४॥ बाऊरीचा ब्रम्हय्या । निजलिंग चिक्कय्या । डोहर कक्कय्या मादर दूडय्या । घट्टि वाळय्या शिवशरण ॥५५॥ ऐसे त्रिषष्ठि पुरातन गण । जन्मोनि येती कल्याणा लागुन । बसवेश्वरासी सहकार करून । अनुभव मंडपा जन्म देती ॥५६॥ बसवरायाची भक्ति असीम । जंगम दासोही अपरिमित प्रेम । एक लक्ष शाणव सहस्त्र जंगम । नूतन संकल्प अर्चनाचा ॥५७॥ झुंडीच्या झुंडी माहेश्वर । येती कल्याणा सत्वर । सत्कारा नाही पारावार । सतिपती आतुर सेवेसी ॥५८॥ आलिया अतिथी प्रती । स्नान पूजा करविती । पादोदक प्रसादा देती । तृप्त करिती इच्छा भोजने ॥५९॥ स्वग्रहचि वाटे जंगम्मसी । पट नाही वाचेसी । जैसा मायलेकरासी । अभेद प्रेम सर्वदा ॥६०॥ दासोहामाजी तत्पर । राजकार्यी धुरंधर । त्रुटि नसेची यत्रतत्र । सदा सर्वत्र सावध ॥६१॥ ऐसे प्रपंच आणि परमार्थ । चालवी बसवराज समर्थ । तनुमन धन दासोहा प्रीत्यर्थ । निर्वंचक सर्वदा ॥६२॥ यासी त्यांचे

वचनचि प्रमाण । त्यासी नाही आणीक प्रमाण । हे सेवेचे कंकण । कवण्या गुरुने बांधिले ॥१६३॥ सुवर्णांमाजी गुंजा एक । अन्नामाजी सीत एक । वस्त्रामाजी दोरा एक । राहो नावेक आजि उद्या ॥६४॥ राहुदे पाहिजे म्हणेन । तुमची आण प्रथमांची आण । कूडल संगमदेवा जाण । हेचि प्रमाण त्रिकाळी ॥६५॥ ऐसा जयाचा दंडक । मूर्ती ऐसी दुर्लभ देख । मानव हित साधिला निर्भीक । कर्म बंधन तोडोनी ॥६६॥ रामायणीची ऐकावी कथा । अपमृत्यु आले ब्राम्हण सुता । रामरायाच्या दरबारी तत्वता । आणोनि शवा टाकिती ॥६७॥ धाय मोकलोनि रडती । तुझिया राज्यी अन्याय म्हणती । वर्णाश्रमाचा उच्छेद क्षिती । झाली खंती नाही तुज ॥६८॥ म्हणोनि ऐसा आघात । आले सुतासी अपमृत्य । शोध लावी यथातथ्य । राज्यी अन्याय काय ते ॥६९॥ शोधा जातीं कर्मचारी । शोध लागला गंगातीरी । आदि जन एक तप करी । नाम शंबूक तयाचे ॥७०॥ समाचार घेउनी । येती दूत अयोध्ये लागुनी । रामरायासी तये क्षणी । श्रुत करिती संगती ॥७१॥ गंगेचिया तीरी । आदि जन एक तप करी । नाम तयाचे निर्धारी । शंबूक ऐसे जाणिजे ॥७२॥ तयानीच शूद्रासी । करण्याचे अधिकार तपासी । कवणे दिले चांडालासी । वेद विरहित कुमार्गिया ॥७३॥ आताचि तयासी आणावे । त्रुटि न लागता घेवोनि यावे । तया प्रायश्चित निश्चये । देहांताचे जाणिजे ॥७४॥ आज्ञा होताचि जाण । दूत जाती तत्क्षण । तया शंबूका लागुन । राजाज्ञा कळविती ॥७५॥ ऐकोनिया शंबूक । म्हणे मी निरपराधी देख । परशिवाच्या ध्यानी नावेक । संसार ताप दूर केलो ॥७६॥ परस्त्रिया आमुच्या माता । परधन हे विष्ठे परता । परापवादी मूर्खता । स्वीकारोनी बैसलो ॥७७॥ राजयाचे काय आणिले । कुणा भीकही न मागितले । अयाचिते दिवस काढिले । गंगातीरी आजवरों ॥७८॥ अरे शूद्रा नीचयाती । वेदाधिकार नाही तुज प्रती । कवण तू मुनिपतीं । तपश्चर्या करणार ॥७९॥ अधिकारा विरहित वागणे । तेचि दुष्काळ अपमृत्यूसी कारण । तुम्ही हीन याती सेवक जन । वर्णाश्रम धर्म अति क्रमिले ॥८०॥ म्हणोनिया राज्यीं अपमृत्य । ब्राम्हण पुत्रा आले अकस्मात् । राजाज्ञा तुज प्रती । तत्काळ भेटीसी येईजे ॥८१॥ शूद्र झाला म्हणोनि काय । देवाचे नाव घेऊ नये । कां उगेचि बैसू नये । देवध्यानी एकांतीं ॥८२॥ आश्रम धर्मा विरुद्ध । देवासी भजणे का अशुद्ध । कैसारे देवा आम्ही अशुद्ध । कवण आम्हा जन्म दिला ॥८३॥ अरे कवणे तरी दिला जन्म । लौकर चाल अयोध्ये लागुन । न्याय करणार तो श्रीराम । वर्णाश्रम धर्माचा ॥८४॥ म्हणोनिया पुढे घालिती । शंबूका अयोध्ये घेऊनि येतीं । प्रणाम करोनि रामा प्रती । उभा क्षिती कर जोडुनी ॥८५॥ तव विचारी श्रीराम । कवण आश्रम वर्ण धर्म । तुझा व्यवहार कवण । साद्यंत आम्हा श्रुत करी ॥८६॥ तव तो म्हणजी मी आदिवासी । त्रासिन्नलोजी संसारासी । स्वीकारोनि अयाचित वृत्तीसी ।

शिवध्यानी राहिलो ॥१८७॥ तुवां टाकुनिया स्वधर्म । कां स्वीकारिलें मुनिधर्म । तुज कवण दिधला अधिकार नेम । जपतप साधन करण्याचा ॥८८॥ ऐशा शूद्र चांडालानी । वर्णाश्रमा अतिक्रमोनि । आमंत्रिले अपमृत्यु लागोनी । नीच जावोनि उच्च झाले ॥८९॥ नाही रामराज्यी अपमृत्यु अवर्षण । प्राणि मात्र सुख संपन्न । अनधिकारी जपतप वेदाध्ययन । करोनि अपयश आणिले ॥९०॥ तुम्हा लागी देहांत प्रायश्चित । दुजी शिक्षा नोहे उचित । धनुष्या बाण लावोनि त्वरित । छेदिले मस्तक शंबूकाचे ॥९१॥ हा राम राज्याचा न्याय । का वैदिक धर्माचा दंडक होय । हा स्वयं राज्याचा निर्णय । वेदकाळीचा जाणावा ॥९२॥ भारत काळी भगवंत । वर्णाश्रम गुण कर्म सांगत । बुद्धाने मूठमातीं निश्चित । वर्णाश्रमा दीधले ॥९३॥ बसवराये अनुभव मंडप स्थापोनी । द्विविध भेद केले मानव जनी । भविभक्त हा निर्णय देउनी । शिव भजनी लाविले मानवा ॥९४॥ तयांचा हा वचन । श्रवण कीजे सुजन । जयाचेनि मानव कल्याण । साधिले ते कल्याणी ॥९५॥ देव देव विनतीं अवधारी । विप्रादिक अंत्यज निर्धारी । शिवभक्त झाले जरी । तरी मजसी समान ॥९६॥ ब्राम्हणादि श्वपच । असतीं जरी भवीच । तरी सर्वही मज साच । एकचि म्हणोनि भावितो ॥९७॥ ऐसे विश्वसिते माझे मन । या बोलिल्या वचनी तिलटोंका समान । संदेह असलिया जाण । दंत-नासिक पाडी छेदी ॥९८॥ म्हणोनिया कूडल संगमदेवा । न्याय मागती बसवा । उगीच कां बोलावा । बोले तैसे चालीजे ॥९९॥ कल्याणी राहोनि बसवेश । मानव कल्याण साधिले विशेष । अपिचेदसि पापेभ्यो तत्व अक्षरशः । पावन केले पतितांसीं ॥२००॥

॥ श्लोक ॥ श्वपचोपि मुनिश्रेष्ठो यस्तुलिंगार्चनेरतः । लिंगार्चनविहीनोपि ब्राम्हणः श्वपचाधमः ॥२०१॥

कोठे ते रामराज्य । कोठे हे बसवराज्य । अजगज न्याय सहज । यावरोनी दिसतसे ॥२०२॥

सिद्धांत शिखामणौ । काष्ठेषु वन्हि दग्धेषु यथा रूपं न विद्यते । शिवसंस्कार संपन्ने जातिभेदं न कारयेत् ॥२०३॥

चंदनादि बब्बुलांत जाण । काष्टे दग्ध केले अग्नीने । मग पूर्व रूपाची ओळखण । केवी होय परीक्षितां ॥४॥ तैसा मानव शिव संस्कार संपन्न । झाला जरी लौकिकी जाण । तया अभेद भावे करून । पंक्ति पावन करावे ॥५॥ याच्याही पैलीकडे गेले । बसवराज वचनी वचिले । कन्यादान करीन वहिले । शिवशरणांसी निश्चये ॥६॥ म्हणोनीच शिवभक्ति वल्लि । दश दिशांमाजी पसरली । सद्भक्तांसी आकर्षिली । अनुभव मंडपी कल्याणी ॥७॥ असो हे रामायण । श्रोती द्यावे अवधान । श्रवण करा कथानुसंधान । बसव लीला अभिनव ॥८॥ अमित जंगमार्चनेचा संकल्प । लक्ष शाणव सहस्राचा माप । उणे पडती षटसहस्र अल्प । म्हणती कैसे करावे ॥२०९॥

ज्ञात झाले काश्मीरी। महादेवरायाच्या मंदिरी। असतीं जंगम सहस्त्रवरी। जाऊ सत्वरी म्हणताती ॥२१०॥ तव कोरि शट्टि होवोनी। जाती काश्मीरा लागुनी। तेथील राजा शिवभक्त शिरोमणी। दंपती महादेव महादेवी ॥११॥ तये राये राजमंदिरी। राहविलें माहेश्वरा सह परिवारी। त्रिकाळी माहेश्वरा तृप्त करी। इच्छा भोजने वाढोनी ॥१२॥ हे शोध घेवोनि सत्वर। जाती काश्मीरा बसवेश्वर। असती जया मठी माहेश्वर। राजदूती करितीं विचार। कवण देश ग्रामीचे ॥१३॥ मी आहे कल्याण प्रांतीचा। नेम असे जंगमार्चनेचा। मठामाजी प्रवेशाचा। अधिकार द्यावे आम्हासी ॥१४॥ तथास्तु जाइजे। नित्यनेम उरकोनि येइजे। आज्ञा घेवोनि बसवराज। मठामाजी प्रवेशतीं ॥१५॥ जाताचि विचारितीं माहेश्वर। कवण देश काय समाचार। साष्टांगे नमूनि बसवेश्वर। प्रांत कल्याणी म्हणताती ॥१६॥ कोरी शट्टी देहा नाम। नित्य जंगम पूजेचा नेम। आजि झाले दिवस तीन। राहिले लिंगार्चन जंगमाविणे ॥१७॥ आपुली ऐकोनिया कीर्ती। आलोकीजी फिरस्तीं। देवोनि पादोदक प्रसादाप्रतीं। पुनींत कीजे सेवका ॥१८॥ धन्य धन्य तुम्ही सद्भक्त। कैसी जंगम दासोही प्रीत। तीन दिवस निश्चित। जंगमाविणे निरशन ॥१९॥ शिवशिव हा खडतर नेम। कीजे आता लौकर स्नान। येऊ तीर्थं प्रसादा कारण। विलंब न करा सर्वथा ॥२०॥ बसवराये स्नान केले। तत्काळ स्वयंपाक रांधिले। याजी तुमची पदकमळे। तेचि लिंगार्चन मज लागी ॥२१॥ तव टाकोनि कंबलासन। वरी माहेश्वरा बैसउन। पदकमळे स्वच्छ धुऊन। धूळोदक प्रोक्षिले ॥२२॥ सविधाने पादोदक। करिती बसवेश सम्यक। शरणार्थी म्हणता देख। जंगमे पादोदक सेविले ॥२३॥ मग बसव देवे पादोदक। पंचांगुले करोनि लिंगाभिषेक। स्वीकारितीं भवहारक। मुक्तिदायक सद्यः जे ॥२४॥

॥ श्लोक ॥ जंगमं पादतीर्थंच लिंगमज्जन मुत्तमं। पंचागुल्युद्धरेद्देवी सद्योन्मुक्ति नसंशयः ॥२२५॥

सत्क्रिया खंडित करोनी। वाढण घेतीं लिंगार्पिता लागुनी। काय काय वाढू या क्षणी। आज्ञा स्वामीनी देइजे ॥२६॥ एकाची पात्रामधून। वाढिती माहेश्वरा इच्छा भोजन। यावे यावे स्वामी म्हणोन। इच्छा भोजनें तृप्त करिती ॥२७॥ सहस्त्रावधि माहेश्वर। जेऊनि तृप्त होती समग्र। यावे यावे लहान थोर। बैसोनि सुस्थिर तृप्त करिती ॥२८॥ तव येती माहेश्वर ललना। बैसती आनंदे भोजना। अम्मा तुमचा लेकरू जाण। येईना वाढण्या मज लागी ॥२९॥ माय लेकरा कवण लाज। उचित असेल ते मागा सहज। ऐसे बोलोनि हितगुज। इच्छा भोजने तृप्त करितीं ॥३०॥ तव म्हणतीं माहेश्वर। इतुका तुमचा भक्त्याचार। बसवेश्वरांचा आचार। कैसा असेल न जाणो ॥३१॥ बसवराये गाला बडवुनी। धन्य धन्य म्हणतीं त्यांची करणी। ते मानव नव्हेती भूमी लागुनीं। द्वितिय शंभू अवतरले ॥३२॥ आम्हासी

बसवदेवासी । गांठी भेटी होईल कैसी । आम्ही परतंत्र दूर देशी । प्राक्तनहीन आमुचे ॥२३३॥ स्वामींची इच्छा असेल जाण । चला दावीन बसव कल्याण । नवविधा भक्तीं एकवटून । मूर्ती घडिली परमेश्वरे ॥३४॥ जंगम प्राणी प्रसादावधानी । जंगम वाक्यचि प्रमाण । इच्छिले पुरवीत जंगमा लागोनी । तनुमनधनी निर्वंचक ॥३५॥ आम्हासी महादेवराये । बंधनी घालोनि ठेविले पाहे । इच्छा भोजन देती स्वये । परी जीवन परतंत्र ॥३६॥ जैसे पिंजऱ्यामाजी कीर । बांधुनी देतीं फलाहार । स्वातंत्र्य विहाराचा सुख थोर । मिळणार काय तयासी ॥३७॥ इच्छा असेल तरीं यावे । माझिया हसवींत प्रवेशावे । घेउनि जाईन स्वये । सर्वत्रासी कल्याणा ॥३८॥ ऐकोनि माहेश्वर जन हंसतीं । विनोद करिता आम्हा म्हणती । शिव शिव अपराधी चरणा प्रतीं । विनोद कैसे करीन ॥३९॥ मी जे बोलिलो वचना । अन्यथा समजूचि नये जाणा । या हसवींत डोकाऊनि पहाना । कल्याणाचा राजमार्ग ॥४०॥ माहेश्वरी डोकाऊनि पाहिले । तव राजमार्ग दिसू लागले । एकामागे एक चालिले । मुलें बाळे स्त्रियादी ॥४१॥ आमुचे कार्य झाले । म्हणोनि बसवराये उठिले । राजद्वारांतुनी बाहेर आले । कल्याणासी तत्काळ ॥४२॥ पुनः ग्रहामाजी असतीं । माहेश्वरांचा सत्कार करितीं । गंगांबेसह पाद प्रक्षालितीं । आसने देती बैसावया ॥४३॥ सर्वेच करविती स्नान । करविले पंचामृते लिंगार्चन । देती पादोदक प्रसाद भोजन । स्वेच्छे सर्वां करवितीं ॥४४॥ विडे देतीं त्रयोदश गुणी । दक्षिणा देवोनि नमस्कार करोनी । क्षणभरी वामकुक्षी करोनी । विचरा म्हणती नगरांत ॥४५॥ स्थान मान तयासी । कल्पोनि दिधले सकुटुंबासी । जेथे कवण्याही भोगासी । त्रुटि नसे सर्वथा ॥४६॥ ऐका काश्मीरचे वर्तमान । वाजविती डंका नित्यनेमे । जंगमार्चनेच्या समई जाण । नित्यनेमे दूतानी ॥४७॥ एक दोन तीन वार । सूचने सरसी येती माहेश्वर । समय अतिक्रमिले माहेश्वर । किं निमित्त दूता म्हणती ॥४८॥ रागा रुद्र झाला राव । म्हणे जंगमा आला गर्व । किती वेळ तिष्ठत बैसावे । नेमाचा वेळ ढळलासे ॥४९॥ मंदिरी लहान थोर । भुकेजले ती फार । तिळमात्र नाही विचार । यया जंगम लोकासी ॥५०॥ आम्ही एक धरिलो नेम । जंगम तृप्ति हा आपुला स्वधर्म । मिष्टान्ने जेउनी जंगम । त्रासलेती वाटते ॥५१॥ नित्य ऐसाच की वेळ । कैसे नेम धरिले नृपाळ । काय जंगमासी दुष्काळ । पडिला आहे अन्नाचा ॥५२॥ म्हणोनि त्याना राहविले । भोजन आणि वेतन आगळे । काम ना धंदा भले । राणी ही तिरस्कारे बोलतीं ॥५३॥ दूत आले परतोन । माहेश्वरांचा नाही ठिकाण । मुले बाळे स्त्रिया जाण । गेले कोठून कवण्या ठाया ॥५४॥ राव म्हणे कोठे गेले । तत्काळ द्वारपाळा बोलाविले । आम्ही तरी महाद्वारीच भले । रात्रंदिन जागृत ॥५५॥ आम्हासी जंगमाचा नेम । म्हणोनि आला सद्भक्त निःसीम । प्रवेश दिलो तयासी जाण । स्वामी अपराध हा माझा ॥५६॥ तो आला तैसा गेला । आणीक माहीत नसेजी

मजला । माहेश्वरांचा समूह गेला । कुणीकडे न जाणो ।।२५७।। ग्रामा भीतरी जावे । चहूदिशा शोधोनि पहावे । कवण अपराध झाला म्हणावे । आमुचेनि सर्वथा ।।५८।। दूता शोधार्थ पाठविती । जावोनिया ग्रामी शोध करिती । दृष्टी न देखिलो म्हणतीं । एकाही माहेश्वरासी ।।५९।। समस्त ग्रामा दूत पाठविले । म्हणतीं एकही माहेश्वर नाही आले । कवण जाणो कुठे गेले । काय उणे पडले तयासी ।।६०।। सर्वही दूत येती । रायासी वर्तमान कळविती । थांग नाही जंगमांचा म्हणती । कवण्याही ग्रामी ।।६१।। आमुचा प्रयत्न व्यर्थ । बसवेशे साधिला स्वार्थ । माव करोनि माहेश्वरा यथार्थ । कल्याणा प्रत नेलासे ।।६२।। भंग करोनि अमुचा नियम । साधिलासे अपुला नियम । हा कैसा हो जंगम प्रेम । स्वार्थ साधू नव्हे कां ? ।।६३।। दूता लागी आज्ञा करी । जावे आताचि कल्याणा सत्वरीं । शिक्षा करोनि बसवासी झडकरी । जंगमा लौकरी आणावे ।।६४।। सांगोनि दूता पाठविले । कल्याणासी त्वेषे आले । बसव मंदिरा येता तये वेळे । द्वारपाळे बोलती ।।६५।। माहेश्वरां वांचून । प्रवेश नाही मंदिरी जाण । दूतीं ऐकोनिया वचन । स्थगित होतीं तेधवां ।।६६।। येतीं काषायांबर लेवून । कंठी इष्टलिंग बांधून । भाळी चर्चिले त्रिपुंड्र भस्म । रुद्राक्ष माळा गळयांत ।।६७।। मग बसव मंदिरा येतीं । महाद्वारीचे दूत नमस्कारितीं । मंदिरांत प्रवेशले संप्रतीं । पहाता सतिपतीं नमियेले ।।६८।। उष्णोदके पाद प्रक्षाळिले । देवा स्नान कराजी भले । थकोनि भागोनि ये वेळे । आले असताल दुरोनी ।।६९।। दूत करवितीं माहेश्वरा स्नान । दिधले सकळ पूजोपकरण । पंक्तींमाजी बैसऊन । पादोदकासी देताती ।।७०।। सकल माहेश्वरांसहित । भोजन केले कपटी महंत । नष्ट झाली दुर्भावना समस्त । अनन्य वृत्ती झालीसे ।।७१।। आलो आम्ही किं निमित्त । राजाज्ञेचा कवण हेत । विसरोनिया भाव समस्त । रमले एकनिष्ठ लिंगार्चनी ।।७२।। आजी ना उदयीक येतील । माहेश्वरा घेऊनि सकळ । ऐसे काश्मीरी भूपाळ । मार्ग प्रतिक्षा करिताती ।।७३।। गेले वार पक्षमास । दूतांचा नाही मागमूस । कैसे नीच दूत आम्हास । गांठ पडले हो राजद्रोही ।।७४।। कोपोनि दुजिया पाठविले । तेही माहेश्वर होवोनि राहिले । वार्तालाप नाही ऐकिले । कल्याणाची आजवरी ।।७५।। आपणचि जावोनि यावे । काय झाले कांहीच नेणवे । आमात्या सोपोनि राज्य वैभव । येई सहपरिवारे कल्याणा ।।७६।। वार्ता ऐकोनि बसव दंडेश । सीमेवरी पाठवी दूतांस । नगरद्वारी जावोनि ते समयास । वाद्ये भारेसी राहती उभे ।।७७।। परिवारेसी राव येतीं । पाहताचि बसवराये प्रणिपात करिती । आलिंगोनि राया प्रतीं । धन्य म्हणतीं मम दैव ।।७८।। गंगांबाही महादेवीसी । नमस्कारोनि प्रेमेसी । माये भेटूनि आम्हासी । पुनीत केलो म्हणताती ।।७९।। तव वाजंत्रीसंह सत्वर । मंदिरा येती समग्र । राजोपचारे सत्कारिले भूवर । भय भक्तीने बसवेश ।।८०।। कल्याणासी जावोनी । बसवासी शिक्षा करोनी । आणीन माहेश्वरा लागोनी ।

तत्क्षणी काश्मीरा ॥२८१॥ ऐसे रायाचे हृदया काशी । मेघाडंबर दिवस निशी । वाहोनि नेती पुरपट्टणासी । भासले होते सर्वत्र ॥८२॥ बसव भक्तींचा दक्षिण मारुत । झगटता राव कुटिल मेघाप्रत । विलय होवोनि राव हृदयाकाशांत । प्रशांत चंद्र उदेला ॥८३॥ मज सारिखा कोण भक्त । रायाचा उंचावलेला गर्व पर्वत । बसव भक्ति वज्र प्रहारे क्षणांत । झाले भूगत तेधवां ॥८४॥ राव भक्तींचा गज उन्मत । तुडवोनि बसव भक्तींचा गुन्हाळ समस्त । नाश करोनि साधू स्वहित । म्हणूनि कल्याणा आलासे ॥८५॥ बसव भक्तीचे सिंव्ह गर्जन । करिता राव गजेंद्र श्रवण । विनम्र होवोनि विसरला दुर्गुण । सुगुणी सज्जन पैं झाला ॥८६॥ नसती मजहुनी लहान । थोर नसती शिवभक्ताहून । माझे मन साक्ष जाण । तैसेचि तुझे चरण साक्ष ॥८७॥ कूडल संगमदेवा मज हेचि शपथ । श्रेष्ठ असती शिवभक्त । तयाहूनि जंगम वरिष्ठ । द्विविध एकचि म्हणोनि विश्वसिलो । कूडल संगमदेवा ॥८८॥ कृतयुगी केदार मूल स्थान । त्रेती वाराणसी सुलक्षण । द्वापारी पंपा विरूपाक्ष जाण । कलियुगी मूल स्थान श्री शैल ॥८९॥ या या क्षेत्रासी जावे । दर्शनावगाहने पुनीत व्हावे । हा भाव त्यजोनि स्वभावे । जंगमचि लिंग भाविलो ॥९०॥ लांच्छनासि विश्वसिलो । तयांचा अंतरंग नच जाणिलो । दासीची सेवा स्वीकारलो । अधिपतीचे वर्तमान मज कासया ॥९१॥ रत्न मौक्तिकांचे प्रतिरूप । कूडल संगी तुमचे शरणांचे स्वरूप । मज नाही विकल्प । कालत्रयी ॥९२॥ कवणांच्या मनी काय आहे । उत्तम मध्यम कैसे म्हणावे । शिवभक्त हा निश्चय । जंगमचि लिंग कूडल संगा ॥९३॥ तनु दुखउनी मना त्रासउनी । विनवितसे पाय धरोनि । हे वाक्य जावो जळोनी । कूडल संगम देवा ॥९४॥ शिवभक्तांचा दुःख । ते जाण लिंगासी दुःख । या विरहित आणिक । जाणे न मी ॥९५॥ वृक्षाचे मुख मूळ । जाणोनि शिंपिजे मूळी जळ । तव पल्लवित होवोनि सोज्वळ । फल भारेसी युक्त होय ॥९६॥ तैसे लिंगाचे मुख जंगम । हे जाणोनि षड्रस पंच पक्वान्न । तृप्ति कीजे सद्भक्तींने । पुढती प्राप्ती सकल पदार्थांची ॥९७॥ जंगमा देव म्हणोनि पाहिले । आणिक नर म्हणोनि निंदिले । चुकेना नरक भोग भले । कूडल संगम देवा ॥९८॥ जंगम निंदा करोनी । तत्पर होय लिंग पूजनी । शिव शिव कैसी ही अध्यवणी । सद्भक्ताची जाणूनी ॥९९॥ निंदक आणि पूजक । हा कैसा हो भक्तींचा उद्रेक । गुरूचा गुरू जंगम देख । कूडल संगाचे वचन असे ॥३००॥ बसव देवाचे ऐकोनि वचन । अखंड भक्ति अभिन्न वर्तन । जंगमचि माझे पंचप्राण । हे पाहोनि सदाचरण । धन्य धन्य म्हणे राव ॥३०१॥ धन मानाचा नाही मद । मी पणाचा नाही भेद । भक्तीचा भांडारी शुद्ध । अवतरलासे भूलोकी ॥२॥ कासया कीजे हो भक्ती । मागे पुढे निंदायुक्तीं । जळो ती नारकी भक्तीं । करोनि नरका जातसे ॥३॥ तैसी झाली माझी करणी । अधिकार मदे झिडकारोनी । अधिकाराची भीती दाउनी । पूजिले की

जंगमा ॥३०४॥ अन्नवस्त्रही दिल्लो । तुम्हा अधिक झाले म्हणितलो । पंक्तिभेद आचरिलो । अहर्निशी ॥५॥ आता पुरे राज्याचा संपर्क । राज्यांती निश्चयें नरक । सांडोनिया पाप कुतर्क । शरण जाऊ बसवेशा ॥६॥ मग तो महादेवराव । सांडोनि राज्याचा हाव । अपराधिया देवोनि शरणत्व । मुक्त कराजी म्हणतसे ॥७॥ म्हणोनिया बसवरायांचे चरण । किंकरत्वे धरी जाण । बसवराये जाणोनि निरभिमान । कायक महिमान सांगती ॥८॥ कायक म्हणिजे शारीरीक श्रम । सतत कीजें न्याये परिश्रम । प्रतिफल हेचि विश्राम । अहिंसेने मिळतसे ॥९॥ श्रमांतीजे प्राप्त होय । ते दासोही व्यय करावे । आशा न ठेवावे । संग्रहाची ॥१०॥ उदयीक होईल म्हणोन । संग्रहू नये किंचिद्धन । शिळे न होय देवानिवेदन । नित्य नूतन हा शिवार्पण योग ॥११॥ बसव वचनावरी ठेवोनि दृढ भाव । स्वीकारीतसे कायकत्व । मोळी विकोनि दासोह । करी नित्य पट्टणी ॥१२॥ भक्ति भांडारी बसव भानू । उदय झाला कल्याणी सुशोभनु । तत्प्रकाशे अज्ञान घनु । नाशियले अज्ञांचे ॥१३॥ ऐसा जंगमार्चनी नूतन प्रेमा । वाढली बसव वल्लीगरिमा । एके दिनी बसव महात्मा । जात होता राजगृहा ॥१४॥ राजमार्गीच कक्कयांचे सदन । करोनिया लिंगार्चन । उभे राहोनि अंगणांतूनि । पाहोनि म्हणतीं बसवेशा ॥१५॥ शेष प्रसाद सेवोनि जावे । बसवराया झडकरी यावे । आलो म्हणोनि बसवदेवे । पुढतीं पाऊल टाकिले ॥१६॥ ऐसा कैसा प्रसाद द्रोही । ऐकोनि पाहोनि स्वीकारीना संदेही । उल्लंघोनि जाय कीटक देही । शतवार जन्म घे ॥१७॥ हे आगमीचे प्रमाण । म्हणोनि द्वार झाकितीं जाण । अपराधी झालो की म्हणोन । माघारी ये बसवेश ॥१८॥ द्वादश वर्षे द्वार रक्षिती । परी कक्कय्या प्रसाद नच देती । कल्याणी जन म्हणती कायसे हे आश्चर्य ॥१९॥

॥ श्लोक ॥ श्रुत्वादृष्टवाच तत्तीर्थं । नपीत्वाह्य पतिष्ठती । सपापी कीटगर्भेच । जायते शतजन्मनी ॥३२०॥

राजकार्यीं त्रुटि । चरार्चनी नोहे हिंपुटी । नित्य अठयांसी महात्मे प्रकटी । पंचपरुषे करोनी ॥२१॥ एके दिनी बसवराय । कक्कयाच्या द्वारी स्वये । तिष्ठता आली पिपीलिका पाहे । प्रसाद मुखी घेउनी ॥२२॥ तव शर्करा टाकिता तिजसी । टाकोनि प्रसाद सेवी शर्करेसी । धन्य म्हणोनि प्रसादासी । घेतीं बसवेश वस्त्रांत ॥२३॥ आजि पुण्योदय झाले । जंगम प्रसाद लाभले । हर्षे येतीं गृहा ते वेळे । बसवराय आनंदे ॥२४॥ अक्का हा प्रसाद घ्याना । येईन म्हणती करूनि स्नाना । वस्त्र गुंथी सोडूनि तत्क्षणा । सेवी प्रसाद नागांबा ॥२५॥ मास द्विमास होतीं । पालटली अक्काची स्थितीं । गर्भ चिन्हे दिसू लागतीं । नागांबेचे शरीरी ॥२६॥ मुख दिसे शुभ्रवर्ण । स्तन मंडली कृष्णवर्ण । कटिभाग होतसे विस्तीर्ण । नसे उमटोनि दिसताती ॥२७॥ विषयेची रुची गेली । भोजनी अपेक्षा नुरली । आलस्यता वाढली ।

शरीरामाजी ॥२२८॥ ऐसी स्थिती पाहोनी । काक निंदक वेळ साधुनी । राव बिज्जळा म्हणती ते क्षणी । ऐकिले का राजेंद्र ॥२९॥
बसवरायाची भगिनी । नागांबा नामे तरुणी । झालीसे गर्भिणी । अविवाहित दैवांत ॥३०॥ यासी म्हणावे कवण । थोरा गृहीचे आचरण ।
बोलता अपवाद आम्हा लागुन । नासले काय आमुचे ॥३१॥ आमात्या गृही ऐसा अविचार । इतरासी कोण पुसणार । जनतेवरी
अधिकार । चालेल कैसा न जाणो ॥३२॥ काय बोलता मंच्चंणा । ही वार्ता सत्यचि म्हणाना । चला आताचि करू विचारणा । जावोनि
बसव मंदिरा ॥३३॥ कुटिल निंदक कुसंगी । दुर्गंध भरिले राजांतरंगी । मंचण्णादि कुप्रसंगी । मिळोनि राव येतसे ॥३४॥ रायाचे पाहोनि
आगमन । बसवराये सामोरे जाऊन । म्हणती आगंतुक झाले येणे । किं कारण स्वामिया ॥३५॥ म्हणोनिया श्रेष्ठासनी । बैसविती राया
लागुनी । राव विचारी तत्क्षणी । वार्ता एक ऐकिती ॥३६॥ की भगिनी नागांबा सती । असोनि अविवाहित स्थिती । गर्भिणी झालीसे
म्हणती । सत्यासत्य न जाणो ॥३७॥ ही वार्ता कटकामाजी । पसरलीसे सहजा सहजी । वरिष्ठांच्या गृही आजी । वाळुका पचती
म्हणताती ॥३८॥ हे ऐकोनि विपरीत वर्तन । आलो सत्यासत्य शोधा लागुन । तरी ही विपरीत वार्ता कवण । प्रसार केला म्हणावे ॥३९॥
बसवामात्य म्हणती स्वये । ही विपरीत वार्ता नोहे । बोलतीते सत्य आहे । संशय कायसे या माजी ॥४०॥ कैसे हे नित्य सत्य । श्रुत
कराजी बसवामात्य । बसव म्हणे हा प्रसाद सामर्थ्य । इतरेतर कैसे होय ॥४१॥ नित्य सेविती की प्रसाद । गर्भ धारण झाले ना प्रसिद्ध ।
तरी आजि ऐसा विशुद्ध । गर्भ धारण असंभव ॥४२॥ लौकिकी अपवाद वाढले । जाणते न म्हणती भले । वादी निंदिती कुश्चळ ।
आम्हा निरुत्तर करिताती ॥४३॥ तरी चलाजी अंतर्गृही । म्हणोनि नेती अंतर्गृहीं । नागांबेसी ग्वाही । सांगा म्हणती बसवेश ॥४४॥
गर्भीचा शिशु तये वेळे । घन घन गर्जोनि बोले । रे ! निंदक हो न करा तळमळ । कुश्चळ विचारे भ्रमलाती ॥४५॥ अरे ! द्रोह्यानो
ऐका । कक्कयाचा हा प्रसाद देख । अवतरोनि भूलोक । पाखंड मत खंडीन ॥४६॥ हा शेष महिमा न जाणुनी । निंदितसा की अवाच्य
वचनी । मुख नव्हे तीं नरकाची खाणी । क्रिमी कीटानी भरेल ॥४७॥ ऐकता गर्भीच्या सिंव्हगर्जना । राव गज थरकांपतसे जाणा ।
नागांबेसी करोनि नमना । अपराध क्षमा मागतसे ॥४८॥ आणोनिया शालू कंचुकी । नागांबेसी अर्पी भूपती । आज्ञा घेवोनि जाती ।
राजमंदिरा तेधवा ॥४९॥ तव नागांबा सतीसी । नव मास पूर्ण होता शुभ दिवसी । शुभ मुहूर्ती अविनाशी । जगदोद्धारक जन्मला ॥५०॥
तव जात कर्म करोनी । प्रवृत्त झाले लिंग धारणी । गुरु जंगमाकरवी लिंग संस्कारोनी । धारण करिती सुकुमारा ॥५१॥ मग द्वादश
वेह्नी । सदनी पालख बांधोनी । समारा हे सुवासिनी । नामकरण ठेविती ॥५२॥ तव बसवरायासी विचारिती । कवण नामकरण सांगा

सांगा म्हणती । नागांबा बसवेश म्हणती । चन्नबसवेश संबोधा ॥३५३॥ तथास्तु म्हणोनि शिवशरणी । नामकरण ठेविती कमल नयनी । चन्नबसवेश म्हणोनी । संबोधितीं बाळा त्रिवार ॥५४॥ जो जो बाळा चन्नबसवेशा । जो जो सुप्रसाद तनुईशा । जो जो षटस्थल मार्ग प्रकाशा । जो जो षटस्थल चक्रवर्ति ॥५५॥ ऐसे विविध प्रकारे गाउनी । हरिद्रा कुंकुम स्वीकारोनी । स्वस्थळा जातीं शिवशरणी । स्वानंदेसी तेधवा ॥५६॥ इकडे माता नागांबिका । संरक्षी चन्नबसव बाळका । वाढतसे शुक्ल पक्षीच्या चंद्रासारिखा । गुणनिधि चन्नबसवेश ॥५७॥ ऐसे मासवर्ष होतीं । वाढतसे प्रसादमूर्ती । पंचम वर्षीं विद्यारंभिती । चन्नबसवाप्रतीं भंडारी ॥५८॥ ओं म्हणताचि ना म्हणे । मागुरु म्हणता शिवाय म्हणे । गुरुजी तये क्षणी । आश्चय चित्ती करिताती ॥५९॥ उच्चार करी आगामी स्वर । करिचिना पुनरुच्चार । हा कैसा विचक्षण किशोर । मानवेत्तर नव्हे हा ॥६०॥ कैसा हा एक पाठी । कधीच नोहे हिंपुटी । ऐकताचि पाठोपाठी । एकदाचि पाठ करी ॥६१॥ कैसा हा तैल बुद्धि । श्रवण करिताचि सुबुद्धी । पाठचि बोले त्रिशुद्धी । नलगता क्षणी ॥६२॥ ऐसा तो दश वर्षामाजी । निपुण झाला शब्दशास्त्री सहजी । तव दीक्षा समारंभ नियोजी । बसव भानू चन्नासी ॥६३॥ गुरु जंगमासी आमंत्रुनी । चन्नबसवांका दीक्षा देउनी । षटस्थलानुभव उपदेशुनी । नवलिंगानुभवी करितातीं ॥६४॥ तव वेदागमोपनिषद । श्रवण पठणे झाला प्रबुद्ध । कल्याणी झाला महा प्रसिद्ध । शिवानुभव मंटपी ॥६५॥ शिवानुभवी निपुण झाला । लिंगांग समरस अनुभविला । स्वानुभवे जनतेला । षटस्थल मार्ग विस्तारिला ॥६६॥ करण हसिगे मंत्रगोप्य । मिश्रार्पण अति गोप्य । आणीक वचनशास्त्र सोपे । लिहूनि उद्धरिले मानवा ॥६७॥ म्हणोनिया षटस्थल ज्ञानी । चन्नबसवेशा संबोधिती शिवशरण जनी । अनुभव मंटपाचा चिन्मयखाणीं । चन्नबसवेश प्रसिद्ध ॥६८॥ कल्याणी शरणांची गणना । षटस्थल ब्रम्ही द्वादश सहस्र जाणा । रक्षी चन्नबसव त्याना । शिवानुभव चर्चेत ॥६९॥ जिकडे तिकडे कल्याणी । माहेश्वरांच्या खाणी । बसवरायांच्या सदनी । आदरातिथ्य पावती ॥७०॥ दुग्धाहारी द्वादश सहस्र । घृताहारी द्वादश सहस्र । दध्याहारी द्वादश सहस्र । द्वादश सहस्र नेमी सायीचे ॥७१॥ शकरा नेमी सहस्र द्वादश । खर्जूर नेमीही तैसे । द्राक्षा नेमी विशेष । द्वादश सहस्र असतातीं ॥७२॥ अम्रफल नेमी फणसफल नेमी । पेरू नेमी रंभाफल नेमी । नारिकेळ नेमी करवंदे नेमी । कवठे अंजीर उदुंबर ॥७३॥ लिंबु आणि साखर लिंबु नेमी । कोणी जांभुळ पपया प्रेमी । फलाहारी बसव धामी । द्वादश सहस्र विरमतीं ॥७४॥ जैसा जयांचा प्रेम । तैसे चालवी दंडेश निस्सीम । नित्य शिवपूजनी परम । सावधाने अर्पितसे ॥७५॥ तैसेचि कामिक माहेश्वर । असती द्वादश सहस्र । तदिच्छा पुरवी कामेश्वर । बसवराज ततक्षणी ॥७६॥ जंगमाच ज्यांचा प्राण । जंगमचि लिंग जाण । जंगमचि सर्वार्थ साधन बसवराया ॥७७॥

ऐसे असता एके दिनी । तृणाचा जंगम करोनी । बसवराये जाता सभे लागुनी । कुटिल जैनी वदती तयां ॥३७८॥ अहो जंगम प्राणी । बसव दंडेशा भक्ताग्रणी । कुणी माहेश्वर रुसोनी । अमुचे आळींत बैसले ॥७९॥ कुणासीही न बोलती । कुणावरी रुसले आहे तीं । विचारोनि न्यावे सांगाती । उपवास असती त्रिदिवस ॥८०॥ ऐकताचि बसवराय । कुजनावरी कां रुसावे । सुजनी लौकरि चलावे । म्हणोनि नमिती बसवेश ॥८१॥ बसवरायांची अमृत दृष्टी । पडता क्षणी निर्जीव सृष्टी । सजीव होवोनि उठाउठी । बसवेशा पाठी चालिले ॥८२॥ निंदक जैनी दंग झाले । कृत्रिम जंगमा सजीव केले । मिचकाविती घारे डोळे । अघटित घटना म्हणोनि ॥८३॥ बसवामात्या चरणी । साष्टांगे लोळती जैनी । आम्ही अपराधी म्हणोनी । क्षम्यतां म्हणताती ॥८४॥ भिंतींवरी जंगम चित्रे । रेखोनिया अति विचित्रे । भंडारिया कळविती सत्पात्रे । बैसले रुसोनि अमुच्या गृही ॥८५॥ तरी महाजन आपण । येइजे तेथवरी जाण । उपवासिया लागुन । न्यावे आमंत्रुनी स्वगृहा ॥८६॥ तव तथास्तु म्हणोनी । आमात्य येती जैन सदनी । माहेश्वरा नमस्कारोनी । म्हणती रुसवा कवणा गृही ॥८७॥ चलावे की दयानिधी । म्हणता उठली जंगम मांदी । मुख भंगित होती दुर्बुद्धी । निंदक जन ते समई ॥८८॥ माहेश्वरां तये क्षणी । मंदिरा बोलाउनी आणी । षोडशोपचारे करोनी । लिंगार्चनी तृप्त करी ॥८९॥ एके दिनी बसवराय । बैसतां विष्ठरी बिज्जळा सवें । कांही वस्तु उचलावें । तैसे बसवे कर उचली ॥९०॥ ओहो म्हणोनि अमृत कर । वरती करिती अभय कर । मंचण्णादि म्हणती हा कुटिल कर । नृपशिरावर कां केले ॥९१॥ ऐसिया सभास्थानी । हस्तक्षेप करोनी । अवमानिले भूपा लागुनी । ही विपरीत करणी नव्हे का ? ॥९२॥ सभेंत आम्हासी अवमानिले । काय कारणे ऐसे केले । सांगिजे याचे इंगित ॥९३॥ बोलेन मी या समई । तरी ती आत्मप्रौढी होई । नाही बोलु तरी पाही । सभागृही अपहास्य ॥९४॥ बोलावे की न बोलावे । हा उभय संकट समय । जे झाले ते बोलावे । व्हावे हिंपुटी कासया ॥९५॥ त्रिपुरांतकेश्वराच्या कोणी । कपिलेश्वरा लागोनी । अमरगुंड मल्लिकार्जुनानी । सहस्र दुग्धघटे अभिषेकिले ॥९६॥ तया दुग्ध प्रवाहाने । मार्गी झाले कर्दम जाण । कवणे एका गोपिकेनं । दुग्ध विक्रया नेतसे ॥९७॥ तया कर्दमा माझारी । पाय घसरोनि पडता सुंदरी । बसवा बसवा संरक्षण करी । दुग्ध घागरी अबलेची ॥९८॥ तियेचे करुण वचन ध्वान । श्रवणपुटी पडले ये क्षणी । कर्तव्य कर्म जाणोन । धरिलो दुरडी तियेची ॥९९॥ पाहणे असेल प्रत्यक्ष । दूता पाठवी निरपेक्ष । तव तरी तुम्हासी साक्ष । घडले ते दिसेल ॥४००॥ भूपती आज्ञापी दूता । बोलवोनि आणिजे गोप दुहिता । जावोनि दूते तत्वता । गोप वनिता बोलावोनि आणिली ॥४०१॥ शिरी दुरडी दुग्ध घागर । कर्दमे भरले असे चीर । नरवर म्हणे वो गोपी सुंदर । घडला प्रकार सांगिजे ॥२॥

ऐकावेजी भूपति । दुग्ध विक्रया जाता निगुती । कर्दमी पद घसरोनि क्षितीं । पडता बसवा प्रतीं आठविले ॥३॥ हा पहा की चीर नीर । कर्दमे भिजले आरपार । बसव कृपे दुग्ध घागर । राहिले मस्तकी जैसे तैसे ॥४॥ बसवामात्यांचे उत्तर । तेचि वदली गोप नार । आम्हीच नीच निंदक थोर । बसवेशा अपार लीला तुमची ॥५॥ बिज्जळ राव तत्क्षण । बसव दंडेशा करी नमन । त्राहि त्राहि मी अपराधी जाण। क्षमापण याचितो ॥६॥ तव राये गोपिकेसी । नव दुकूलें अर्पी सायासी । पाठविला बहुमानेंसी । गोप वधूसी स्वगृहा ॥७॥ ऐसी महात्मे नित्य । कल्याणी दावी बसवामात्य । हा द्वितिय शंभूचि सत्य । लोकोद्धारा आलासे ॥८॥ नित्य जंगम लिंगार्चन । करिती बसवेश निर्वंचक मने । ही निष्काम मूर्ती तनमन धन । ठेविला भाग बांधोन दासोहा ॥९॥ जंगम दासोह राजकारण । ब्रसवरायाचे द्विचक्र जाण । तया सुरथी आरूढोन । धर्म स्थापन केलासे ॥१०॥ विषम वर्णं वाद कंटक वन । समता शस्त्रे छेदून । केलासे सीमोल्लंघन । चातुर्वर्ण्यं पर्वताचे ॥११॥ ऐसा हा वीरशैव शिखामणी । भक्तींचा भांडार उघडोनी कल्याणी । पतितांचा उद्धार केला झणी । अवतरोनी भूलोकी ॥१२॥ एके दिनी निरंजन जगद्गुरु । निराभारी चरवर्यं जगदोद्धारू । आलासे अल्लम प्रभुवरू । बसव भक्तीं कारणे ॥१३॥ कंठी धारण केला इष्टलिंग । भस्म चर्चिला सर्वांग । सकळ इंद्रिये व्यंग । फाटके अंगी कौपीन ॥१४॥ प्रवेशलासे कल्याण नगर । आळीमाजी फिरे स्वतंत्र । बहुरूपे दावी पाहणार । तो हा माहेश्वर नोहे म्हणतीं ॥१५॥ सर्वांसी केले दिशाभूल । विचित्र रूपे दावी कुश्चळ । डोळे चिपडे गळे लाळ । कुष्टी अमंगळ विद्रूप ॥१६॥ सामोरे आलिया जना । पुसे ब्रसवरायाचें सदन । बसवरायें जाणोनि खुणा । सामोरे तत्क्षणा येतातीं ॥१७॥ अष्टभावे दाटोन । करितातीं साष्टांग नमन । झाले म्हणती खंडण । जन्म मरण दासाचे ॥१८॥ धरोनिया गुरु कर कमळ । येती मंदिरी युगुळ । गंगांबा स्वर्ण झारींत उष्ण जळ । आणोनि पद युगुळ प्रक्षाळिते ॥१९॥ सुकोमल कुरळ केशे । पदकमळ झाडिले अविनाश । साष्टांगे नमूनि विशेष । पदरज शिरी वंदिली ॥२०॥ बसवरायाचे पाहोनि आदर । निंदक निंदिती अपार । किळस न वाटे किंचिन्मात्र । सति पतीसी नवलाव ॥२१॥ पूर्वी निर्मित शून्य सिंव्हासन । तयावरी आरूढविती प्रभुसीं जाण । आले सकळ शिवशरण । प्रभू अल्लम हाचि म्हणती ॥२२॥ व्योम मर्तासी सुगंध उटणी । गंगांबा नागांबा प्रेमे करोनी । गंधराज तैल माखुनी । उष्णोदके स्नपविति ॥२३॥ फल पुष्प पाणी युक्त । अष्टविध मंत्रे अष्टांग सहित । साष्टांगे नमूनि बसवादि प्रमथ । अर्चिती शिवभक्त प्रभुदेवा ॥२४॥ एकारत्यादी पंचारती । गंगांबा नागांबा ओवाळिती । शिवशरणही करितातीं । पंचारती प्रभुदेवा ॥२५॥ पादोदक सिद्ध करोनी । सद्भावे गुरुवर्यां अर्पुनी । जंगम देवासहित शिवशरणांनी । पादोदकासीं स्वीकारिती ॥२६॥ तव मणिमय

पात्री जाण । ओगरिती देवान्न दिव्यान्न । आणीकही परमान्न राजान्न । सुपक्वान्ने वाढिती ॥४२७॥ सरळ सेवया नखुलिया । गहुलिया
आणि परडिया । तिल सांडगे पापडिया । वाढिती प्रभुराया बहुविध ॥२८॥ आणीक पिष्टाचे कुरडिया । लाडू करंजे अनारसिया । बोंडे
कडबोळे फेणिया । तळिवान्ने अनेक ॥२९॥ दुग्धक्षीर मुग्दक्षीर । गोधूमक्षीर तंडुलक्षीर । आणीक साबूदाण्यांचा क्षीर । सुगंध सुमधुर
वाढिती ॥३०॥ तैलपक्व घृतपक्व जलपक्व उष्मपक्व । मधुराम्लक्षार सुपक्व । अर्पितातीं प्रभुदेवा ॥३१॥ तिलपोळी पीठपोळी । पुरणपोळी
फलपोळी । बदामपोळी चुरंजीपोळी । बहुविध पोळी वाढिले ॥३२॥ भाजी माठाची शेपूची । मेथीची अळूची कोबीची । तांदुळजाची
चुक्याची । आंबाड्याची हरभऱ्याची वाढिती ॥३३॥ कोथिंबीर मुळ्यांची । रताळू भुइमूग गाजरांची । कांदा बटाटे आल्यांची । भोपळा
दुधि भोपळा कोहाळे ॥३४॥ वाळूक पडवळ कारले । दोडके तोंडले घोसाळे । वांगे भेंडी कारले । रान कारले पपया ॥३५॥ हिरवी
मिरची लाल मिरची । भोंपळे मिरची शेवग्यांचीं । चवळी आणि अवऱ्यांचीं । नाना प्रकारचीं भाजीपाले ॥३६॥ कढिनिंब माका पुदीना ।
आंवळे आणीक चटण्या जाणा । खारांच्या त्या प्रकार नाना । वाढिती जेंवणा प्रभुराया ॥३७॥ तक्र कढि लिंबु कढी । कञ्चि कढी सार
कढी । सर्व सारांच्या कढी । वाढिती आवडी प्रभुदेवा ॥३८॥ दुग्ध मधु दधि घृत । शर्करादि पंचामृत । आणीक हिरवे पंचामृत ।
माधुर्याने युक्त जें ॥३९॥ अंबे रंभाफले जंबूफले । श्रीफल । कलिंगड फणसफल । पेरू बोरे करवंद संत्रे । अंजीर खजूर अक्रोड ॥४०॥
ऐसे भोजनी नाना प्रकार । पदार्थें वाढिती बहुपरिकरे । महालिंगार्पिता करिती नमस्कार । प्रभुरायासी तेधवा ॥४१॥ तव निरंजन जंगम
मूर्ती । सकल पदार्थें लिंगार्पित करिती । भक्ष्य भोज्यादि सेविती । लेह्य चोह्य पानीय ॥४२॥ सरले म्हणोनि वाढिले । मागुतेनि पहाता
पात्री नुरले । षड्रस पक्वांनादी पार झाले । लक्ष शाण्णव सहस्रांचे ॥४३॥ ग्रास लौकर खातीं । वरती सारांच्या फुरक्या मारितीं । पानीयादी
पिऊन टाकितीं । खातीं फळादिक लगबगी ॥४४॥ गंगांबेचे वाढण । जयांसी जे पाहिजे ते जाण । दृष्टादृष्टे जाणून । वाढी तत्क्षण
इच्छित ॥४५॥ गंगांबे जैसी चतुर वनिता । घाबरी झाली वाढिता वाढिता । भात वाढूनि कढि आणिता । भाताचा पता नुरेची ॥४६॥
कढी आणोनि वाढिले । भात आणण्या आंत गेले । भाताच्या पहिलेची कढी पीले । जेंवण चालले विलोम ॥४७॥ रोटी वाढोनि तूप
आणिले । तूप वाढिता रोटी नुरले । एकाचीं भेट एका न झाले । जेंवणे प्रभुचे अस्तव्यस्त ॥४८॥ रोटीसी घृत न भेटले । भातासी सार
नाहीं गांउले । चटण्यादीक सरले । वडे बोंडे कडबोळे ॥४९॥ क्षीरांचीं भेट दुग्धा नाही । दुग्धाचीं भेट तुपास नाही । बसव म्हणती कां
हो लवलाही । आणा की घृतादी ॥५०॥ सहस्रावधि जंगमार्चनी । वाढण्या गंगांबेसी प्रती न कोणी । आजि प्रभुदेवांच्या भोजनी ।

गंगांबा विलक्षण घाबरली ॥४९॥ हातो हाती देती दूत । एकासी एक नाही लागत । रांधिले ते पाक समस्त । म्हणती समाप्त जाहले ॥५०॥ दूत खरडोनि सावडोनि वाढिली । प्रभूची तृप्ति नाही झाली । अपयश आले माझे कपाळी । चंद्रमौळी रुसला मसी ॥५१॥ ऐसे कसे जेवण । सतिपति बोलती उद्विग्न मने । कैसे संकट समय जाण । नेणो म्हणती आम्हा वरी ॥५२॥ पाक तरी समाप्त झाला । परी अतृप्तीच प्रभूला । फळ फराळ भाजीपाला । निःशेष झाला काय करूं ॥५३॥ चन्न बसवाच्या गृहा जाई । आहे ते सर्व घेऊनि येई । वाढी आणोनि लवलाही । वेळ न लावी ये क्षणी ॥५४॥ आणीक शरणांच्या गृहा पाठविले । पक्वान्ने सर्व आणविले । काय पात्रचि गिळू लागले । की प्रभु हस्तस्पर्शें लय होती ॥५५॥ एक पदार्थ वाढुनी । दुजे येती घेउनी । कां पात्रचि पीतसे धुवोनी । ऐसा वाटे गंगांबेसी ॥५६॥ आता काय करू माय । गळताहेती हातपाय । संपले स्वयंपाक नुरला उपाय । केला दासोह व्यर्थ गेला ॥५७॥ एका माहेश्वराची तृप्ती । नाही झाली अमुच्या हातीं । लक्ष शाण्णव सहस्र गण तृप्तीं । कैशी झाली म्हणावे ॥५८॥ पेटला प्रभु वडवानळ । आटुनि गेला बसव भक्ति जळ । आणा कांही दाळगीळ । पोटी भगभग शांत नोहे ॥५९॥ बसव म्हणतीं वाढी दाळ । चण्याची मुगाची तुरीची सरळ । उडदाचीं लाखाचीं भेसळ । मसुरीचीं दाळ वाढिती ॥६०॥ हूं आणा की तू आणा । डाळी झाल्या चणे खणखणा । उडिद मूग तुरी मसूर जाणा । लाख वाटाणे वाढिती ॥६१॥ साळी तांदूळ वरई बरई । राळे बाजरी लांचणे पाही । सावे मक्का गहूं तेही । वाढिती लवलाही प्रभूसी ॥६२॥ अळसुंदे मटकी पावटे । गाजर मुळगे बटाटे । कोबी वांगे टोमटे । भेंडी रान भेंडी कारले ॥६३॥ तींळ कारळे जवस अंबाडी । कृष्णतिल आणि करडीं । भरोनि आणितीं परडी । दूतीं गडबडी वाढिती ॥६३॥ दूते सांगती बसवेशा । खोल्या झाडिल्याजी महापुरुषा । आणा कांही तरी बोलतीं भाषा । ऐसा कैसा प्रभू हा ॥६५॥ अठरा धान्ये सर्व । वाढिता सरेना हा पर्व । हा असुर की देव । कांहीं अंत लागेना ॥६६॥ अरे ! रायाच्या गृहा जावे । सर्व धान्य घेऊनि यावे । आता विलंब मात्र न करावे । सत्व हानीची वेळ ही ॥६७॥ म्हणोनि दूता पाठविती । अठराही धान्ये आणवितीं । आणणारे आणीत असती । वाढितातीं वाढणार ॥६८॥ म्हणे प्रभु लगबगे आणा । मज भूक तहान सहेना । विलंब करिता वाढण्या । आगंतुक दिसता म्हणतीं ॥६९॥ रायाचे सरले कोठार । कटकीचे धान्य ही झाले पार । स्वये पाहुनी स्पर्शूनी भाउनी सत्वर । वाढितातीं प्रभूसी ॥७०॥ पहाता एकासी दहा होती । स्पर्शांता शतमान भरतीं । भाविता लक्ष गणतीं । पंच परुषे वाढिती बसवेश ॥७१॥ ऐसे ते पंचपरुष जाण । मावळोनि गेले प्रभूच्या ईक्षणे । एकासी होय अर्ध मान । अर्ध ते पाद शून्य शेखी ॥७२॥ पाक धान्ये उसऱ्या फल । आणीक भाजीपाले । भूस कोंडा हीं वाढिले । थाली पाक झाले हो! ॥७३॥

तूप तेल केव्हांचि गेले । राजगृह झाडोनि आणिले । भक्तांची गृहे रिते झाले । कांहीं नाही वाढण्या ॥४७४॥ पुरे नको झाली तृप्ती । अजूनही नाही बोलती । बसवाच्या परुषा प्रती । हुंकारितीं गिळोनिया ॥७५॥ एक लक्ष शाण्णव सहस्र । जंगमार्चनेचा गर्व अजस्र । पंच परुषाचा अपस्मार । प्रभु पंचाक्षर पळविला ॥७६॥ काय केलो काय झाले । माझे मजसीच न कळे । गर्वाचे घर खाली झाले । मी पण मोहिले मजलागी ॥७७॥ चतुर्दश भुवनें जयाच्या उदरी । तया विश्वरूपा कवण तृप्त करी । कर्ताहंचे मूर्खत्व पदरी । पडले माझ्या निश्चये ॥७८॥ मी पामर अति मतिमंद । तुज तृप्त करिन मज छंद । मी पंच परुषी अगाध । असंख्य जना तृप्ति कर्ता ॥७९॥ प्रभूच्या तृप्तीची किं कथा । गर्वे फुगलो होतो वृथा । उमजली ही गर्वाची व्यथा । व्यर्थ मजसी कष्टवी ॥८०॥ आता मजहूनि आन पदार्थ । कोणता आहे शोधिला अर्थ । तू जगदात्मा अति समर्थ । मी पण पदार्थ ओगरितो ॥८१॥ म्हणोनि गंगांबा बसवराज । साष्टांगे धरिती प्रभु पदांबुज । निरहंभावे नयनांबुजे । प्रभु पदकंज धुवियेले ॥८२॥ पंच परुष मद अहंकार । भरले होते कीं अनिवार । उन्मत्त झालो होतो फार । पंचानने तू संहरिले ॥८३॥ त्राहि त्राहि महेशा । त्राहि त्राहि भवनाशा । त्राहि अज्ञान तमंधनाशा । ज्ञान प्रकाशा सहस्र किरणा ॥८४॥ गर्वाच्या डोही बुडता । काढिलासी धरुनी हाता । मी पण संनिपात मस्तका चढता । उतरिलासी तू धन्वंतरी ॥८५॥ गर्वोन्माद होता सहज । उन्मत्त गजांकुश देवोनि मज । उन्माद उतरिलासी रसराज । पूर्व पुण्ये येउनी ॥८६॥ निष्काम की सकाम । परोपकार दानधर्म । निरभिमाने करणे हे कर्तव्य कर्म । मानव धर्म मानवांचा ॥८७॥ स्वमने केले वा ऐकोनि केले । कृतकर्म ते दशविध बोले । गुरुलिंग जंगमासी भले । मीच कर्ता म्हणतसे ॥८८॥ ऐशा गर्वेचि नासलो । तव चरणासी दूर झालो । सहस्र अपराधी होवोनि उरलो । अहंपणे बुडलो सर्वस्वी ॥८९॥ तूचि माता तूचि पिता । तूचि बंधु तूचि भ्राता । तुजविणे या पामरा त्राता । नाही दाता त्रिभुवनी ॥९०॥ हो ! हो ! उठी बसवराया । माया मोह गेले विलया । पूर्णचंद्र आला उदया । अज्ञान तम निवटले ॥९१॥ म्हनोनिया निरंजन मूर्ती । झाली झाली म्हणती तृप्ती । तव तृप्तीची ढेंकर देतीं । पुनः पुनः प्रभुदेव ॥९२॥ करकमळे धरोनि उठविले । बसवेशा हृदयी धरिले । तुज सम दासोही पाहिले । नाही नाही त्रिजगतीं ॥९३॥ तरी मी पण दंभासुर । प्रवेशोनि तव हृदय मंदिर । भूंशिले म्हणोनि हा प्रकार । कारण झाला सर्वस्वी ॥९४॥ दानी होवोनि देई दान । प्रति ग्रहरूपी ये अभिमान । शिवसंकल्पी होता लीन । साधे शिवार्पण योग हा ॥९५॥ दान प्रतिग्रहाचा विवर । जाण दासोहचि सार । सोह दासोहाचा विचार । या माजीची भरलासे ॥९६॥ गुरुवर्या मज नाही उमजले । मी पण भूत मजमाजी संचरले । गुरू पंचाक्षरी तू येऊनि वहिले । दवडिले मी पण भूतासी ॥९७॥ कैसा उमजेल

बसवराया । म्हणितले मम माया दुरत्यया । जयावरी पडली तिची छाया । जाय वाया आयुष्य ॥४९८॥ तू द्वितिय शंभू जगी दाता । तुज संपर्क न करी मायिकता । जगा उद्धरी महंता । पंच परुषा घेउनी ॥९९॥ ऐसे उपदेशुनी बसवासी । आशिष देई व्योमकेशी । राहिले अनुभव मंटपासी । अध्यक्ष्य होवोनि प्रभुवर्य ॥५००॥ सिंव्हावलोकनी श्रवण करावे । लक्षावधि माहेश्वर समूह । गोधडयाचे पाहोनि हाव भाव । विसरला बसव म्हणती अम्हा ॥५०१॥ हा वेळ की काळ । नित्यनेमाचा टळला वेळ । लागली आम्हासी भुकेची तळमळ । नेणे काळ वेळ बसवेश ॥२॥ कुठोनि आला कवण स्थळ । अंग दिसे महा कुश्चळ । दुर्वास येतो अमंगळ । दूरोनि किळस वाटले ॥३॥ नव्हे हा जातींचा जंगम । वेषधारी दांभीक परम । मोहिला की अधम । आजि भोळ्या बसवासी ॥४॥ न विचारिता आचार । कैसे साधिले समयाचार । जाणत्यासी कवण सांगणार । म्हणती सदाचारी आम्ही असो ॥५॥ कोणता व्रत कोणता नेम । सर्व ही ठेविले आजि गुंडाळोन । यासी म्हणावे जगद्रंजन । वृथाभिमान दासोहाचा ॥६॥ काय जाणे हा बसव । जंगमांचा दासोह भाव । मेले की राहिले जंगम सर्व । नाही ठावे तयासी ॥७॥ भिकारी वेषधाऱ्या पाहुनी । कैसा भुलला जंगम प्राणी । उदयीक येता दुजा कुणी । कवण सन्मानी आमुते ॥८॥ चला हो चला जाऊ या । दुजिया दात्या पाहू या । अर्पिले का जीवन यया । बसवेशाच्या दासोहा ॥९॥ बहु जनासी बहुत मार्ग । बहुत असती दातृ वर्ग । विस्तीर्ण असे भूभाग । कासया चिंता करावी ॥१०॥ ऐसे करिता दुजा भाव । उमजले अंतरी प्रभुदेव । सर्वांतरीचा भाव । परिपूर्ण मूर्ती तो होता ॥११॥ सचराचरी भरोनि उरला । निरंजन मूर्ती प्रभुदेव भला । परिपूर्ण रूपे उरला । आणीक तो प्रत्येक ॥१२॥ स्वयं लिंगी तृप्त झाला । परी सचराचर तृप्तींने भरला । मी तू पणासी जो मूठमाती दिला । निरहंभाव मूर्ती जो ॥१३॥ परिपूर्णांतुनी विभागला । पूर्ण होवोनि राहिला । म्हणोनि सचराचर तृप्त झाला । पर शिव रूपे सर्वत्र ॥१४॥ निर्गमनाचा विचार । करिती जेव्हां माहेश्वर । स्निग्ध सुगंध सुमधुर । अन्नाचे ढेंकर येताती ॥१५॥ ऐसी कैसी तृप्ती झाली । चालवेना की पाऊल चाली । अंथरुणी लोळु ये वेळी । श्वासोच्छासा रीघ नसे ॥१६॥ ऐसे स्वगृही माहेश्वर । पत्नि पुत्रासी म्हणती सत्वर । मंचक तरी टाका बरे । वामकुक्षीं करू या ॥१७॥ सकळ चराचरा तृप्ती झाली । तव बसवरायांची मती चेइली । अहा ! मी अपराधी ! माहेश्वर मंडळी । विव्हळतींना भुकेने ॥१८॥ गुरुवर्यांच्या सत्कारीं । विसरलो की अनाचारी । पाचारोनि आणारे लौकरी । मम जीवन हेतूना ॥१९॥ दूती जावोनि ते वेळी । साष्टांगे नमिती माहेश्वर मेळी । क्षमा करोनि चला ये वेळी । लिंगार्चनासी सत्वर ॥२०॥ धन्य धन्य तो माहेश्वर । सामान्य नव्हे की प्रभुवर । तयांच्या सत्कारी विसर । पडला की हो बसवेशा ॥२१॥ तरी आन विचार न करावे । आपुलिया मंदिरा

चलावे । क्षुधाग्नीसी शांतवावे । जीवे भावे नमीतसे ॥५२२॥ कोपाग्नी, क्षुधाग्नी, तापाग्नी । त्रिविधाग्नी एकवटोनी । गालि प्रदाने करोनी । बसवाराध्या निंदिलो ॥२३॥ जंगमांच्या त्रितापा जाणितले । जागच्या जागी तृप्ती केले । अगम्य महिमा पुरुष भले । लोकोद्धारा अवतरला ॥२४॥ पहावे तुम्ही उदर । तुम्हा वाटेल झाले जलोदर । आकंठ तृप्तीने येती ढेंकर । काय करणार येउनी ॥२५॥ भोजन तरी नाही केलो । षड्रस रुचीने तृप्त झालो । बसव प्रभूची लीला उमजलो । नाही नाही ! अंतरी ॥२६॥ आता आपण जाइजे । भंडारिया विनविजे । की माहेश्वरी सहज । तृप्त झाले स्वस्थळी ॥२७॥ तिलमात्र नाही राग । झाला होता किंचित् विराग । परी बसव लीला अगाध । तृप्ती झाली न जेविता ॥२८॥ ऐसी माहेश्वरांची स्थिती । श्रवण करोनिया दूतीं । बसव दंडेशा श्रुत करिती । घडले वृत्त साहजिक ॥२९॥ तव धन्य ! धन्य ! म्हणतीं बसवेश । प्रभु लीलेचा हा विशेष । पुनीत केले आम्हास । अतिथि रूपे येउनी ॥३०॥ इकडे कटकी पावन मूर्ती । अगाध महिमा दावितीं । धान्यांची कोठारे भरोनि उरतीं । सर्वत्रांचे पूर्ववत ॥३१॥ तिकडे कोंड्डिमंच्चण्णादि वंचक । राजसभेसी येवोनि देख । म्हणती रायासी नावेक । विचित्र वार्ता श्रवण करा ॥३२॥ दंडेशाच्या गृहासी । अतिथी आलासे परदेसी । सामोरे जावोनि अमंगळासी । स्वागत केला अपार ॥३३॥ मग सिंहासनी बैसऊन । करोनिया षड्दशार्चन । वाढोनिया षड्रसान्न । तृप्त करिती भोजनी ॥३४॥ किती संतोष कैसा समरस । तो तरी नोहेचि माहेश । भूत की ब्रम्ह राक्षस विशेष । भंडारिया फसविला ॥३५॥ भक्ष्य भोज्य लेह्य चोह्य । रसरसायनादि पाहे । फळ फराळ गेले पोहे । कवण्या दाढेमाजी की ॥३६॥ आता काय वाढू बाई । म्हणोनि चिंती गंगामाई । डाळीची करोनि उसळीं पाही । वाढिताही पुरेना ॥३७॥ ज्वारी बाजरी घरची सरली । आणिक राज मंदिरांतुनी आणिली । ग्रामीचे सर्वांच्या खोली । सरोनि गेल्या तत्काळ ॥३८॥ भूस कोंडा पुरला नाही । हुंकारे म्हणे आणा कांहीं । पोटीची धगधग घालोनि काई । शांत करा की म्हणतसे ॥३९॥ हे पाहोनि विचित्र प्रकार । भंडारी झाले थंडगार । एक लक्ष शाण्णव सहस्र । जंगमार्चन कर्ता मी ॥४०॥ गेले मी पणाचे पंच परुष । पात्री वाढिता होय निःशेष । गेला अभिमान बोले बसवेश । गंगांबेसी तेधवा ॥४१॥ एकाचीच तृप्तीं नोहे । तव अनेकांची कैसी होय । आता पुढची वाट काय । म्हणोनि दुःखित होवोनी ॥४२॥ लगबगे सति पति येंती । मजसीच स्वीकारा म्हणती । म्हणोनि साष्टांगे विनवितीं । अष्टभावे बसवेश ॥४३॥ तव तृप्तीचा ढेंकर दिला । हा जंगम की भस्मासुर आगळा । आम्हासी वाटे अवलीळा । विचित्र मूर्ती अभद्र ॥४४॥ अमुचे कांहीं नाही गेले । कोठारे सर्व नामशेष झाले । चिमण्यासी दाणे नुरले । वडिलोपार्जित सर्वही ॥४५॥ कोणी असो शिवशरण । तयांचा एकचि विचार जाण । धान्याधिपती बाचरसाने । सांगू नये का संनिधी ॥४६॥

आम्हासी आला कळवळा । त्रुटी पडेल की दुष्काळा । उपरी आपुल्या बुद्धीला । सुचेल तैसे करावे ॥५४७॥ अंतरी बाहेरी त्यानीच भरले । आपुले म्हणोनि कोणीच नुरले । आता पाहिजे सुचविले । म्हणोनि सारांश बोलिलों ॥४८॥ आप्त वाक्य ऐकोनि भूपती । रागा रुद्र झाला संप्रतीं । ज्वाळा जैशा भडकती । शिंचिता घृत अग्निवरी ॥४९॥ रायाच्या कोपाग्नीसी । घृत झाला मंच्चण्णा निश्चयेसी । राव कोपाग्नी भडकोनि सभेसी । ज्वाळा धूम्रे भरियेले ॥५०॥ म्हणे सर्वाधिकारी होवोनि पाहे । चौर्यें कोठारे लुटावे काय । कमाविले का बाप माय । कोणी कुणाचे ॥५१॥ दूतांसी म्हणे राय । जावे बसव मंदिरा लवलाहे । दंड नायका आज्ञा सांगावे । लौकरी यावे म्हणोनी ॥५२॥ आज्ञेसरसी बसवेश । येताचि गर्जोनि बोले नरेश । विश्वासू म्हणोनि तुम्हास । राज्यभार सोंपिलो ॥५३॥ तरी ऐसा विश्वास घात । करु नये की अनुचित । राजाज्ञे विरहित । कोठारे धान्याचे कां लुटिलो ॥५४॥ आम्हासी विश्वासू कुणी नाही । म्हणोनि सर्वाधिकार दिलो पाही । अंतर्बाहिर सर्वही । तुम्हीच व्यापोनि राहिलो ॥५५॥ तुम्हीच स्वानंदे राज्य करा । आम्हीच जाऊ देशांतरा । एकमेकांच्या प्रत्युत्तरा वादविवाद कासया ॥५६॥ तव म्हणतीं बसवराय । मूळ न जाणता बोलू नये । अर्थ न जाणता वादू नये । निंदकांचे ऐकू नये निंद्य गोष्ठी ॥५७॥ परीक्षेवीण दूषण । देऊ नये की शहाणे । शिंदळीचे ऐकून दुर्वचने । पतिव्रतेसी त्यागू नये ॥५८॥ आपुली असोनि राज्य सत्ता । बाल भाषा कां हो बोलता । दूषण देण्याची पृथा । पडली वृथा आपणासी ॥५९॥ चला आताचि लवलाही । श्रीमंता शोभेना ही घाई । निंदकांच्या ग्वाही । सैरावैरा बरळता ॥६०॥ रायाचे कर धरोनी । चालिले दंडाधीश ते क्षणी । कोठारांचे ताळे काढुनी । दावी झणी रायाते ॥६१॥ नवीन धान्ये कोठारे । भरोनि उरले की हो सारे । निंदक होतीं गोरे मोरे । राव चकित चकित जाहला ॥६२॥ सत्य सत्य तू भूवरी । आलासी पर शिवावतारी । मी तो अपराधी निर्धारीं । क्षमा कांजे सर्वस्वी ॥६३॥ भंडारींच्या पद कमळी । शिर कमळ ठेवोनि ते वेळी । धन्य धन्य म्हणे सद्गद बोली । निंदका निर्भत्सिले ते समई ॥६४॥ अज्ञांचे ऐकोनि बोल । सुज्ञावरी ठेवू नये बोल । थोरांच्या कीर्तीसी शोभेल । ऐसे मज वाटेना ॥६५॥ ऐसे बसव भानू भूपासी । सांगताती सुनीतीसी । दोघे जावोनी सभेसी । सिंव्हासनी बैसती ॥६६॥ विनये बोलती राव । आले म्हणतीं कोणी महानुभाव । तयांच्या भोजनाचा गौरव । बहुतानी मज श्रुत केला ॥६७॥ तव दंडेश म्हणती रायासी । जगदोद्धारी अल्लम सुखरासी । निरंजन निर्माय शिवयोग लालसी । दासा उद्धरण्या आलासे ॥६८॥ अतीतासी तृप्त करावे । हा भाव हृदयी धरूनि स्वये । रांधिले षड्रस पक्वाने पाहे । लक्ष शहाण्णव सहस्राचे ॥६९॥ तितुकेही सर्व पदार्थ । अपूर्ण पडले तत्क्षणात । कोठारेही सरले समस्त । चिंताग्रस्त होउनी ॥५७०॥ तनुमन धनासी अर्पिलो । अनन्यभावे

शरण गेलो । तव इच्छितार्थ पावलो । यतिवर्यांच्या तृप्तीनें ॥५७१॥ प्रभो मी अपराधी म्हणता । तृप्तीचे ढेंकर दिले तत्वता । पूर्णत्वे आलीसे पूर्णता । तृप्ती चराचर जीवासी ॥७२॥ राव बोले आश्चर्यें । एकाच्याचि तृप्तीने पाहे । अखिल जीवां तृप्ती होय । हे मज आश्चर्य वाटते ॥७३॥ आताचि आणवोनि पाहावे । म्हणता दर्दूर आणवी राये । तव पोट विदारूनि पाहती सर्व । सभेमाजी ते समई ॥७४॥ मंडुकाच्या कुशी । सकळ पक्वान्ने सूक्ष्म रूपेसी । भरली पाहोनि ते समयासी । आश्चर्य करिती सभाजन ॥७५॥ कैसी ही अघटित करणी । एकाच्या तृप्तीने सकल प्राणी । तृप्त होती ही अभिनव करणी । साक्षी सर्वांतर्यामीची ॥७६॥ म्हणोनिया धन्योद्गार काढिती । मंडूका भंडारी कृपा दृष्टी अवलोकिती । तव तो सजीव होवोनि द्रुतगति । निघोनिया जातसे ॥७७॥ आम्हासी दिसती मानव । मानव नव्हे तो बसवदेव । मूर्खत्वे निंदितो सर्व । गर्व अमुचा गळतसे ॥७८॥ ऐसे अघटित महात्म दाउनी । बिज्जळ रायाची आज्ञा घेउनी । येती स्वस्थाना लागुनी । बसवराज दयानिधी ॥७९॥ तव उपायन करी घेउनी । येती अनुभव मंटपा लागुनी । गुरुवर्य अल्लमाच्या चरणी । लोटांगण घालिती ॥८०॥ गुरुदेवा पूर्वी येउनी । गेलो शिवदीक्षा संस्कार करोनी । दाविलो सदाचारा लागुनी । आजि मुक्तिमार्ग दाउनी उद्धरिजे ॥८१॥ पूर्वींच मायामय संसारी । लोटिलो दुरंता माझारी । या माया कर्दमांतुनी झडकरी । काढी आता गुरुवर्या ॥८२॥ ऐकोनि बसवेशाची प्रार्थना । म्हणती अव्यक्त शिवज्ञाना । अपेक्षील ऐसा जाणा । विरळा मानव पुण्यवंत ॥८३॥ भव बंधनी बंधिस्त झाले । मायाजालांत अडकले । विषय कर्दमी फसले । ते हे अनधिकारी ॥८४॥ तयासी हा शिवानुभव । सांगता वाटे महादुर्भव । शिशे तापोनि कर्णी घालावे । तैसे होतसे बसवेशा ॥८५॥ तरी विचारोनि पाहता । तुज सारिख्या निर्वाण भक्ता । त्रिभुवनी न पाहूताता । शिव तत्वार्था तूचि मूळ ॥८६॥ भवबंधन भवपाश । कांहो झाले जीवा विशेष । बहु जन्मीचे आणवादिमल पाश । जीवालागी आवरिले ॥८७॥ तया मलपाशी गुंतोन । मी माझे मज म्हणोन । क्षणिक विषय सुखा भुलोन । रात्रंदिन दुःख भोगी ॥८८॥ ऐशा अविद्येचिया कारण । विसरला की शिवज्ञान । मूळीचे विसरोनि शिवपण । केवल संसारी जाहला ॥८९॥ पूर्वीचा हा महालिंग । चिद्भेदे झाला लिंगांग । तेही विसरोनि केवल अंग । भोग हेचि शाश्वत मानी ॥९०॥ म्हणोनीच पतन पावला । सोहं दासोहं भावा विसरला । अहंभावासी शरण गेला । चक्री सांपडला जन्म मरणाच्या ॥९१॥ जन्मणे आणि मरणे । स्वभावेचि झाले बंधन । सुटका होय कवण प्रकारेन । सुविचारासी न जाणवे ॥९२॥ तया पर शिवलिंगांत । उदय पावली अहं स्फुरण शक्ती । तया शक्ति संयोगे निश्चिति । पंच ब्रम्होत्पत्ती झालीसे ॥९३॥ तया पंच ब्रम्हापासुनी । पंच सादाख्या उत्पत्ति जाण । तेथूनि अहंकार त्रिगुणा जनन । झाले पुढे पंचतत्व ॥९४॥

पांचापासूनि जाणावे पंचवीस । ही अंगतत्वे जाण विशेष । आपुल्यामाजी करण्या समरस । भक्ति पदार्थ जाहले ॥५९५॥ तयी महा घन परात्पर दिव्यलिंग । एकादश प्रकार जाहले चांग । ते कैसे झाले अव्यंग । जाणिजे विवर तयाचा ॥९६॥ शांत्यादि शक्ति पांच । शिवादि कर्तृ पांच । पर शिव तत्व एक । ऐसे जाण एकादश ॥९७॥ अंग तत्वे पंचवीस । लिंग तत्वे एकादश । दोहींची मिळवणी छत्तीस । शिव तत्वज्ञी जाणावे ॥९८॥ आता यर्याचा समरसैक्य । चित्त देवोनिया ऐक । निवृत्ति शक्तींसी सम्यक । वागादि कर्मेंद्रिये समरसली ॥९९॥ कर्म सादाख्या संबंध होउनी । पृथ्वी तत्व लय होय ते क्षणी । प्रतिष्ठा शक्ति लागोनी । शब्दादि पंच विषय ॥६००॥ कर्तृ सादाख्या समरसोनी । आप तत्व लय होय क्षणी । मग विद्या शक्तीं लागोनी । श्रोत्रादि ज्ञानेंद्रिये ॥१६०॥ मूर्ती सादाख्या समरसोनी । तेज तत्व लय होय तत्क्षणी । शांति शक्ति लागोनी । प्राण पंचक ते जाण ॥२॥ अमूर्ति सादाख्या समरसोनी । वायु तत्व जाय लय होउनी । शांत्यतींत शक्तीं लागोनी । मन बुध्यादि जीवांत ॥३॥ शिव सादाख्या संबंधोनी । आकाश तत्वा लय जाणी । पंचविंशति तत्वे लय होउनी । लिंग तत्वे ही लय होतीं ॥४॥ तेही एकामाजी एक । लय होती स्वाभावीक । ऐसे कुळ स्थळ होता ऐक्य । राहे परात्पर दिव्य लिंग ॥५॥ मग ते परात्पर दिव्य लिंग । आपणामाजी आपण होय अव्यंग । जैसे गारांचा जलांग । जळचि होय शेवटी ॥७॥

॥ श्लोक ॥ अनादि सिद्धसंस्कारं कर्तृ कर्म विवर्जितं । स्वयमेव भवेद्देही स्वयमेव विलीयते ॥६०७॥
अंतःशून्यं बहिःशून्यं शुन्य शून्यदिशो दशं । सर्वशून्यं निरालंबं निर्द्वंद्वं परमं पदं ॥६०८॥

ऐसे अंगतत्वे पंचवीस । लिंग तत्वे एकादश । ययांची मिळवणी छत्तीस । झाले एकार्थ रूपाने ॥८॥ परमानंद सर्व शुन्यांत । लय पावती जे समरत । तयांचा परिक्रम अस्तव्यस्त । तत्व मस्यादिकी जाणिजे ॥९॥ तत्पद ते जाणावे लिंग । त्वंपद जाणिजे अंग । दोहोंचा समरस अभंग । जाणावे हो असिपद ॥१०॥ ऐसा सकलही होणार । आणि निष्कलही होणार । सकल निःकलातीत होवोनि उरणार । परात्पर परतत्व ॥११॥ कांहीच नाही म्हणणे । तेचि महा घन शून्य । ब्रम्ह होवोनि राहे जाणे । गुहेश्वर लिंग आमुचा ॥१२॥ शिव भावचि दासोह भाव । या विरहित नाही अनुभव । लिंगैक्याची स्थितीं अभिनव । जयाचे तयाने जाणावे ॥१३॥ तरी तू केवल शिवरूप । तुज मी काय देऊ निरोप । सर्वार्पण योगी तू सुखरूप । ऐक्याचा तू सद्भक्त ॥१४॥ ऐसे शिवानुभव ऐकोनि । आनंदाश्रु स्रवली नयनी । करितीं साष्टांग प्रणिधान अवनी । तनु रोमांचित झालीसे ॥१५॥ इंदुधर रूपा सद्गुरु नाथा । भव बंधन कृन्तना सद्गुरु नाथा ।

त्रिताप शमना सद्गुरु नाथा । दाता त्राता मज तूचि ॥६१६॥ गुरु माता आणि पिता । गुरु त्राता आणि हर्ता । गुरु बंधु आणि भ्राता । नगरोरधिक शिवशासन ॥६१७॥ गुरु मित्र आणि छत्र । गुरु मूळ इह परत्रा । भवांबुधीस मैत्र । त्रिकालाबाधित गुरु तत्व ॥१८॥ धन्य धन्य गुरु राया । तुमच्या कृपेची घन छाया । संसृतीने त्रस्त झालीसे काया । झाला श्रीकृपे सुखरुप ॥१९॥ प्रभू कर कमळे उठविले । बसवराया हृदयी धरिले । शिवानंदी राहे वहिले । सफलाशिष दीधले ॥२०॥ आमुच्या सवे आला सिद्धराम । सोन्नलगीचा योगी सुखधाम । यया दीक्षा लिंग धोरण । कीजे षटस्थल अनूभवी ॥२१॥ तव सिद्धरामा शिवदीक्षा करोनी । प्राणलिंग दिधले तये क्षणी । चन्नबसवेश षटस्थल ज्ञानी । लिंगांग समरस बोधिती ॥२२॥ तव आली उडूतडिहूनि । चित्कळा महादेवी ज्ञानखाणी । येवोनी प्रभूराया लागूनी साष्टांगेसी नमियेली ॥२३॥ नव तारुण्यी वैराग्य । हा कैसाहो सौभाग्य । किंवा हा दुर्भाग्य । पूर्वजन्मीचा ॥२४॥ ऐकोनी प्रभूची वचने । तव महादेवी म्हणे । जे झाले चन्नमल्लिकार्जूना अर्पण । ते देह जावो करपोन की झिजोनी ॥२५॥ कैसा हा वैराग्य कटूतर । पाहिलेना आजिवर । सकळ शिवशरणाहूनि थोर । अक्का महादेवी म्हणती प्रभू ॥२६॥ येई माये वीर वृत्ती । शिवदीक्षेपावन करिती । षट्स्थल मार्गी लिंगपती । शरण सती हा निर्धार ॥२७॥ हा षट्स्थलीचा शरण मार्ग । तुज असे की सुयोग्य । लिंगपतीचा सुख सौभाग्य । भोगी अभंग सर्वदा ॥२८॥ म्हणोनिया निरंजनमूर्ती । अक्कासी आशिष देती । मग बसवादि प्रमथगणा म्हणती । श्रीशैलाप्रती गमन करू ॥२९॥ ज्याचे कार्य त्यानी संपूनी । मग यावे शिवशरणी । तव अक्क महादेवी प्रभू चरणी । प्रार्थूनी बोले तेधवा ॥३०॥ सद्गुरु नाथा जला वीण । मत्स्या कैसा जीवन । जला वीण कमळीण । राहे कैसे प्रभू देवा ॥३१॥ गुरुवर्या तुजविण । क्षण वाटती वर्ष प्रमाण । मज सवे चाल म्हणोन । कदळी वन प्रवेशती ॥३२॥ इकडे बसवेश कल्याणी । लक्ष ठेउनी प्रभू चरणी । त्रेसष्ट पुरातन गणी । अति उत्सवे रहाती ॥३३॥ निर्वंचक पणे दासोह करिती । जंगमांची इच्छा पुरविती । चाणाक्षपणे राज कारण करिती । खंडितार्ती विरुद्ध मता ॥३४॥ षण्मतांचे अधिकारी । मत्सरे द्वेषिती अविचारी । दुर्मत खंडोनि शिवाचारी । प्रवेश त्याना देताती ॥३५॥ चकोर चिंती चंद्र ज्योत्स्ना । कमल चिंती सहस्र किरणा । भ्रमर चिंती परिमळास जाणा । मज चिंता संगमनाथाची ॥३६॥ ऐसे निशिदिनी शिवस्मरणी । भवसागर उल्लंघूनी । वरिले मोक्ष कामिनी । त्रिलिंगार्चनी रमोनिया ॥३७॥ प्रमथगणाचिये मेळी । बसवराज हा चंद्रमौळी । शिवार्चन शिवार्पण शिवानंदी सकळी । स्वानंद मेळी राहती ॥३८॥ आचार्य म्हणती हावगीलिंग । ऐके भक्त शिखामणि चरित्र अभंग । भक्तिनेचि मूक्ति सुभग । सवत्र सुलभ सर्वकाळ ॥३९॥ श्री गुरु हावगीलिंग लीलामृत । श्रवण मुखे प्राशन करा सद्भक्त । होताल जन्ममरण ।

विरहित । बसवलिंग विनवित भालपुरीचा ॥६४०॥ इति श्री हावगिलिंग लीलामृते बसवलीलामृत प्रबोधोनाम । षठोध्याय: समाप्त: ।
मंगळ महाश्री श्रीगुरु बसवलिंगार्पणमस्तु श्री गुरु हावगिलिंगार्पणमस्तु ।



-:०० षष्ठोध्याय समाप्त ००:-

श्रीगुरु विरूपाक्ष लिंगायनः। श्रीगुरु हावगिलिंगायनमः। श्रीगुरु बसवलिंगायनमः।

॥ श्लोक ॥ श्रीबसव राजलीला विमला अतुला भवाब्धिला मैत्र । पापौघ तिमिरमित्र कंटक निंदक वनासहे चैत्र ॥१॥

बिज्जळाचे कौटिल्य । जिंकिला जो कौशल्ये । सप्तदिन रोधिले । स्वप्रतापे रवीसी ॥२॥ आपुलिया चिच्छक्ति बळे । जे तृण पुरुषा जीवविले । मीमांसकासी केले । पराजित ॥३॥ तो जो परशिवावतारी । कुलदैवत भक्ति भंडारी । शिरकमळ अर्पू चरणावरी । अनन्यभावे बसवेश्वरा ॥४॥ बकार हेचि गुरु रूप । सकार हे लिंग स्वरूप । वकारचि जंगम निरूप । त्रिविध रूप बसवेश ॥५॥ बकार हेचि नाद जाण । सकार हे बिंदु सुलक्षण । वकार हे कला विस्तीर्ण । त्रितत्व रूप बसवेश ॥६॥ भक्ति हेचि बकार । मुक्ति हेचि सकार । विरक्ति जाणा वकार । त्रिविधाकार बसवेश ॥७॥ भक्त मुक्त आणि विरक्त । बसव नाम जपासक्त । सकल पापा होय विरहित । अग्नि स्पर्शे कार्पासवत् ॥८॥ जयाचिया मुख कमळी । बसवाक्षराची नामावळी । देवी राहेन तया जवळी । म्हणे चंद्रमौळी नचान्यथा ॥९॥ परशिवा तुज समान । सत्पुत्रा करी प्रदान । उपदेशिले अक्षर त्रय सुलक्षण । बसव महामंत्र शिलादा ॥१०॥ तपला तो तपेश्वर । बसव नामे अहोरात्र । शिलाग्रांतुनी शुभगात्र । जन्मला नंदीश आनंद मूर्ती ॥११॥ शिवाचा अपरावतार । जाणावे हा नंदिकेश्वर । नंदिकेश अपरावतार । जाणा बसवेश्वर कलियुगी ॥१२॥ वेदोपनिषदे हीच धेनु । परशक्ति उमा कामधेनु । तयांचा पतित्वाभिमानु । बसवराज परशिव झालासे ॥१३॥ ऐसा जयाचा परंपार । देवभक्ता अभेद विचार । भक्ताविणे देवपणा थोर । कैसेनि येई लौकिकी ॥१४॥ महादेवाचा वाहन । बसवराज झाला जाण । भक्ते वाहिला देवपण । सर्वकाळ सर्वत्र ॥१५॥ माग म्हणता इच्छित वर । तव मागती नंदीश्वर । तुझा वियोग क्षणभर । नहो वर हा देइजे ॥१६॥ म्हणोनि लिंगदेवा समोर । बैसलासे नंदीश्वर । सदैव दृष्टिगोचर । शिवरूप शिवध्यानी ॥१७॥ वृषभेश्वराचे वृषण स्पर्शून । कीजे शृंगमध्यावलोकने दर्शन । सप्त जन्मीचे पापाहन । होतसे ततक्षण श्रुति वाक्य ॥१८॥ तैसा हा लिंगपूजक । आधी जपोनि बसव नाम सम्यक । बसव मंत्रजपावीण देख । दर्शन पूजन धारणादिक निष्फल ॥१९॥ सकल जगासी मी महालिंग आधार । कैसा राहू मी निराधार । चिंतिलिया चित्सुधाकर । वृषभावतार प्रगटला ॥२०॥ तोचि म्हणविला अनादी भक्त । भक्त हृदयी देव निर्मुक्त । भक्तचि देव देवचि भक्त । परंपरा ही संयुक्त अविनाश ॥२१॥ जेथे श्रुति शास्त्रा न चले गती । मी केवी वर्णू मूढमति । हावगिलिंगाच्या कृती । सुमती देई बसवेशा ॥२२॥ सद्भक्त श्रोते बसवेश्वर मूर्ती । अवधान देइजे चरित्राप्रती । अज्ञानमति मंद भिक्षार्थी । अवधान भिक्षा मागतो ॥२३॥ मम हृदय कमलमित्रा । हावगिलिंगा सुचरित्रा । ऐकावे लीला विचित्रा ।

बसवेशांच्या या पुढती ॥२४॥ आहे तयासी नाही । नाही म्हणता प्रत्यक्ष दावी । निर्गुणासी गुणी वोवी । सगुणा दावी निर्गुण ॥२५॥ पाषाणाचा नंदी चारा खाय । तृणाचा माणूस जीवंत होय । माहेश्वर मागता देत आहे । माणिक्य मोती रांगोळिया ॥२६॥ तुवरक आणि शुभ्र धान्य । माणिक मोतीं करी अनन्य । माहेश्वरा देऊन । तृप्त मन करितातीं ॥२७॥ वंध्या गाईसी सजीव करोनी । दुग्ध दिलासे दुहुनी । वंध्या कालवडीचे दुग्ध काढुनी । अभिषेकिलासे लिंगासी ॥२८॥ स्थाणूसी नवपल्लवित केला । वार कुचांसी लिंगाकार भाविला । भिंड जंगमा हस्ते लिंगरूप झाला । हिरमुसला राव मानसी ॥२९॥ बिज्जळे एके दिनी । राणीसी चर वेष देउनी । आणोनि सभांगणी । दंडाग्रणीसी बोलत ॥३०॥ दूर देशाहूनि आले । माहेश्वर अवचित ये वेळे । सत्कारिजे वहिले । जंगम दासोही आपण ॥३१॥ अपराधीं अपराधी! म्हणोनी । सिंव्हासनाखाली उतरोनी । साष्टांगे नमी तत्क्षणी । शिवरूप मानुनी तयांसी ॥३२॥ राणीचा झाला जंगम । रायासी झाला महाभ्रम । विपरीत झाले की माझे कर्म । कैंचे विश्राम सायंत्री ॥३३॥ स्फुंदस्फुंदोनि रडे राव । कैसा माझा हा दुर्भाव । पाहिजे म्हणोनि राणीव । गमाविली हातींची ॥३४॥ आता कैसी करू गती । सुचली कैसी मज दुर्मती । अहा! पतिव्रता सौंदर्यवती । कोठ धुंडू या समई ॥३५॥ मी आहे अपराधी । छळिलो तुम्हा अल्पबुद्धि । बसवराया कन्यादान आधी । करावेजी सर्वज्ञा ॥३६॥ तुमचा अगाध महिमांबर । मीं आहे अज्ञान खेचर । अंत न लागे मज साचार । तू सुविचार क्षमा करी ॥३७॥ म्हणोनि चरणी लागे राव । हंसत मुखे बोले बसवदेव । कांहो राया तळमळे जीव । श्वेतांबर व्हाकी निश्चयें ॥३८॥ चुकलो आता क्षमा करा । राणी विणे मज भण भण सारा । जाकी राणीवामाजी शोध करा । अंतःपुरा जाउनी ॥३९॥ राव अंतःपुरी शोधोनि पाहे । सुमती मंचकी पहुडली आहे । हंसत मुखे मुख चुंबी राये । सुखांबुधी बुडाला ॥४०॥ एके दिनी वारनारी । विट जंगमा म्हणे सुंदरी । माता गंगांबेच्या अंगावरी । अमोलिक चीर असे हो! ॥४१॥ तेचि मज आणोनि द्यावे । नसता माझ्या द्वारा न यावे । काय अगाध म्हणोनि लवलाहें । आला पाहे सभांगणा ॥४२॥ भंडारी गंगा मातेचे अमोल चीर । याचिले की वारनार । तेचि द्यावे सत्वर । प्रावरण्यासी तिज लागी ॥४३॥ तथास्तु स्वामी बैसावे । बोलवी सभेस गंगामाय । पदर धरोनिया स्वयें । ओढितीं चीर पत्नीचें ॥४४॥ तव एकाहुनी एक सुंदर । फेडिता निघतीं शालू मनोहर । जंगमे पाहोनि चमत्कार । झाला दिङ्मूढ ते समई ॥४५॥ सभा जन झाले आश्चर्यं चकित । बसव दंडेश म्हणे स्वामी प्रत । कोणता चीर आपणासी उचित । घेइजेत स्वामिया ॥४६॥ हे चीर घेऊ की ते चीर । पडला जंगमासी विचार । विलंब झालीया वारनार । कोप अनिवार करील ॥४७॥ हे की ते की सर्वही । गांठ बांधोनि शिरी घेई । नेवोनिया घाई घाई । गाठोडे टाकी नारी पुढे ॥४८॥

द्रोणाचल आणिला हनुमंत । ऐसा कोण आहे बलवंत । बाळा हाती पर्वत । उचलवीतसे बसवेश ॥४९॥ शिव नागमय्याच्या करांगुळींतुनी । दुग्ध धारा काढी सभांगणी । चकित झाले सभाजनी । भूपाळादी सर्वही ॥५०॥ जंगमांचा पुरवी इष्टार्थं । आम्ही मागू कांही पदार्थ । चररूपे येवोनि जगन्नाथ । मागे तिजा नेत्र बसवेशा ॥५१॥ जाणोनिया बसवेश । युक्तीने म्हणे घ्या अनलांबकास । म्हणोनि दावी दर्पणास । लज्जित महेश झाला हो ॥५२॥ परिजनासी देता पुरस्कार । विट जंगमे येवोनि सत्वर । मज द्याजी स्वर्ण पेटी सुंदर । वारनार अपेक्षिली ॥५३॥ राव म्हणे ऐसे कैसे । म्हणता पेटी दावी विशेष । ऐसा कैसा महिमा पुरुष । पाहिले ना म्हणताती ॥५४॥ एके दिनी भूप बिज्जळ । विचार करी सोज्वळ । अमुच्या अनुजेसी ये वेळे । बसवदेवा अर्पू म्हणे ॥५५॥ म्हणोनिया बसवराया । विनवितो बिज्जळ निर्माया । म्हणे बसवेश दीक्षा देऊनिया । त्वद्भगिनीसी वरीन ॥५६॥ आपुली इच्छा म्हणोनी । भगिनीसी शिवदीक्षा करोनी । विवाह केला चारी दिनी । बिज्जळ राय स्वानंदे ॥५७॥ धीवरे एके दिनी । कंठी कृष्ण वृंतांक बांधोनी । माहेश्वर आम्हीं म्हणोनी । पंक्तींमाजी बैंसला ॥५८॥ तयाचे लिंग स्पर्शून । अभिषेकिती पंचामृताने । वृंतांक ते शिवलिंग होउन । राहिले की तया कंठी ॥५९॥ दुर्भवी सद्भावी झाला । धीवरे महेश स्थला पावला । ऐसी अगणित महिमेला । दाविला बसवेश अनुदिनी ॥६०॥ बसवरायाचे महिमा वर्णंन । सहस्त्र फणीसी नोहे जाण । हरि ब्रम्हादिक अजाण । हीन मानव न जाणे ॥६१॥ कल्याण नगर गगनी । जंगम श्रेणी तारांगणी । बसवराजेंद्र भक्ताग्रणी । तारानाथ शोभला ॥६२॥ एके दिनी पंचवदन । नेले मेदार केतय्याचे प्राण । ते अभिनव कथानुसंधान । हावगिलिंगा श्रवण करी ॥६३॥ केतिदेव शरण बुरुड । जंगम प्राणी योगारूढ । न कळे की तयाचे गूढ । कायकचि तया कल्पवृक्ष ॥६४॥ कल्याण कटकी तयाचा रहिवास । नित्य कायका जावोनि वनास । शिवस्मरणे आणी वेणु दंडास । छेदी सरस पात्या काड्या ॥६५॥ तयाचे सूप टोपली करोनी । विक्रय करी शिवस्मरणी । आले या क्रयांतुनी । जंगमार्चनी व्यय करी ॥६६॥ उदयीक पाहिजे हा भाव । नाहीच तया संग्रहाचा हाव । पवित्र शिवार्पणाचा स्वभाव । असे सदैव तयाचा ॥६७॥ पर शिवचि बसव रूप घेउनी । आला केतय्याचे गृहा लागुनी । हा पाप गरीब म्हणोनी । घेऊनी आलासे स्वर्णमुद्रा ॥६८॥ कवण हो गृहा भीतरी । शब्द टाकिला द्वारी । केतय्याची सती बाहेरी । येउनि स्वागत केलीसे ॥६९॥ माते ही सुवर्णांची जाळी । घेऊनि ठेविजे सुस्थळी । तव ती पतिव्रता बोलिली । परधन घेण्याची आज्ञा नसे ॥७०॥ पतिदेव नसती घरी । आग्रह करू नका ये अवसरी । बोलली केतय्याची अंतुरी । माज घरी प्रवेशलो ॥७१॥ हे माझे किंचिद्धन । याचेनी कीजे जंगमार्चन । हा भेदभाव आपण । शिवशरणानी करू नये ॥७२॥ ऐसे बोलोनि चंद्रमौळी । तेथेचि ठेवोनि सुवर्ण जाळी । गुप्त झाला ते

वेळी । वेण भार मौळी घेवोनिं येती केतय्या ॥७३॥ तव येवोनि ओवरीवरी । स्वर्ण जाळी पाहे ते अवसरी । कवणें ठेविले गृहा भीतरी । स्वर्ण जाळी सांगा पैं ॥७४॥ सती बोलले केतय्यासी । बसव बंधु येवोनि सदनासी । ती सुवर्णांची राशी । ठेंवोनि गेले आग्रहे ॥७५॥ नका भाऊ नका म्हणता । आपणा ग्रही दारिद्रय तत्वता । येणे जंगम तृप्ती करा माता । यांत कायसे भेदाभेद ॥७६॥ नका म्हणोनि माज घरी गेले । गेले ठेवोनि मजसी नुमजले । आपण आलीया वरीच आले । तेच वेळी बाहेरी ॥७७॥ आमुच्या दारिद्र्याचा कळवळा । बसव भंडारीसी आला । सति सुत बांधव सोयऱ्यांचा मेळा । दूर लोटितीं दारिद्रया ॥७८॥ म्हणोनि दारिद्रय हे बहु कष्ट । कवणासी न येईजे अरिष्ठ । तरी बसवा हा धनवंत श्रेष्ठ । शिवशरणां कनिष्ठ जाणिला ॥७९॥ तरी तू आताचि जाऊन । येई कां स्वर्ण जाळी देऊन । ऐकताचि ततक्षण । जाळी घेऊनि सति जाय ॥८०॥ पाठविले ती यजमानी । घ्यावी स्वर्ण जाळी तुमची तुम्ही । कवणे दिली भगिनी । स्वर्ण जाळी कवणांची ॥८१॥ जाणोनि बुझोनि बोलता । भगिनीसी उत्प्रेक्षा करिता । प्रातःकाळी येवोनि तत्वता । नका म्हणता आलात ठेउनी ॥८२॥ आपुले आपण घ्यावे धन । आम्हा न लगे कुणाचें ऋण । जन्मांतरी विमोचन । परि ग्रहाचा करवेल ॥८३॥ म्हणोनि केतय्याची सती । जाळी ठेवोनि जाय सुमती । तव बसवदेव म्हणती । लिंग मुद्रांकित पाहुनी ॥८४॥ पर शिवचि गेला देऊन । तरी कैसा हा निस्पृह शरण । ईश्वरे देता बहु धन । नको कवण म्हणती जगी ॥८५॥ पुनश्च करू याचे परीक्षण । कैसा नेघे हा पर धन । वेणु दंडी स्वर्ण मुद्रा भरोन । ठेवी वनी परमात्मा ॥८६॥ नित्य नेमे वेणु वनासी । जाई केतय्या वेणु आणणेसी । छेदिता वेणु दंडासी । स्वर्ण राशी गळताती ॥८७॥ एक दोन तीन पांच । छेदी वेणु दंडसाच । सर्वांमाजी स्वर्ण राशीच । भरले असतीं सर्वत्र ॥८८॥ मुळामाजी असेल धनराशी । शेंडयामाजी नसतील अपैसी । म्हणोनि केतय्या ते समयासी । शेंडयावरतीं चढतसे ॥८९॥ छेदिता वेणु दंड । पडला भूवरी उदंड । पोटी खोंचले वेळु दंड । भडभडा अशुद्ध चालले ॥९०॥ तैसाचि उत्तरीयें बांधिला । धन विरहित दंड छेदिला भारा बांधोनि आणिला । टाकिला अंगणीं आणोनि ॥९१॥ मग वेळु दंड छेदोनी । पात्या काडया चिरोनी । सूप दुरडया पेटारे विणोनी । साहित्य आणीं विकोनिया ॥९२॥ तंडुल पिष्ट दाळ । घृत सुवासिक उत्तम गूळ । ऐसे आणिले साहित्य सकळ । पत्नी लागी ओपिला ॥९३॥ तव ती शरण सतीं । करितसे पाक निष्पत्ती । स्नान शिवार्चन करोनि केतीं । जंगमार्चन करीतसे ॥९४॥ तयांचा शेष प्रसाद सेवुनी । तांबूल दक्षिणा अर्पूनी । नमस्कार करोनी । माहेश्वरा पाठवी ॥९५॥ तव पत्नीसी बलाऊन । म्हणे काढी वेळु खोंच पोटांतुन । काढिताचि शिवशिव बोलून । सोडिला प्राण केतदेव ॥९६॥ कैसा निस्पृह कैसा धैर्यं । कैसी निष्ठा कैसे शौर्यं । नित्यनेम

उरकुनी अंती मृत्युंजय । स्मरणे लिंगी लय झाला ॥९७॥ हां हां म्हणता तये क्षणी । वार्ता पसरली कल्याणी । धावोनि येती शिवगणी । केतय्याच्या सदनासी ॥९८॥ येऊनिया शिवशरण । केतय्यासी पाहुन । कैसा हो हटयोगी शरण । सोडिला प्राण नित्यनेमे ॥९९॥ केतय्याचे गुणानुवाद । गाउनी हळहळती शरण सुहृद । वीरव्रती केतय्या प्रसिद्ध । जगामाजी निवडला ॥१००॥ ऐसे म्हणोनि दुःखित होतीं । माचिदेव न आले म्हणती । पडिहारी बाचय्या पाठविती । बोलावण्या माचिदेवा ॥१०१॥ बाचय्या जावोनि नमिला । वर्तमान श्रुत केला । माचिदेव म्हणती शरण समूह आला । काय ? बसवदेवासहीत ॥२॥ सकळ शरण आलेती । दुःखाब्धींत बुडालेती । तव माचिदेव बोलती । मी तरी येऊनि काय करू ॥३॥ रडणारा सवे रडावे । हसणारा सवे हसावे । प्रसंगी येवोनि उगे बसावे । शोभा पावेल कैसेनी ॥४॥ बसव तरी जंगम प्राणी । म्हणवीतसे सुज्ञानी । जंगमचि माझा प्राण म्हणोनि । रात्रंदिन गातो की ॥५॥ ऐसे वचन भ्रष्ट अनाचार । त्यांचे मुख नाही पाहणार । जगी हास्याचाचि प्रकार । बोल चाल वेगळे ॥६॥ जैसे आलासी तैसे जाई । इथे करू नको घाई । जे बोलोनि चुकती पाही । त्यांचा संग नको आम्हा ॥७॥ लाज नाही का बसवासी । जंगम प्राणी मी निश्चयेसी । बोलोनि दावी सर्वत्रासी । विसरला कां ? या समई ॥८॥ निर्लज्जांच्या सभेमाजी । नाही येणार म्हणोनि सांगाजी । माचिदेवे निरूपिला सहजी । बाचिदेवासी तेधवां ॥९॥ सर्वेचि येवोनि बाचिदेव । सुचविला माचय्याचा भाव । श्रवण करिताचि बसवदेव । झाला लिंगैक्य तत्काळ ॥१०॥ प्राण सोडिताचि बसवदेव । घाबरोनि गेले शरण जन सर्व । कैसे हो केतय्यास्तव । बसवदेव सोडी प्राण ॥११॥ ऐसी वार्ता कटका भीतरी । हां हां म्हणता पसरली सत्वरी । कैसे गेले बसव भंडारी । आम्हा लागी सोडुनी ॥१२॥ आता कैंची जंगम भक्ति । ऐसा कवण त्याग मूर्ती । जो प्रपंच आणि परमार्थ निश्चिती । चालविला की अविरोध ॥१३॥ एका बसवावीण कल्याण । दिसो लागले महा भयाण । कल्याणीचे सकळ जन । झाले नित्राण तटस्थ ॥१४॥ तव बाचिदेवे झडकरी । आला माचिदेवा द्वारी । देवा तुमच्या वचन शस्त्री । गेले प्राण बसवाचे ॥१५॥ संतोषे म्हणे मडिवाळ । तैसाचि आहे बसव सोज्वळ । बोले तैसाचि चाले । वचन साधले बसवेशा ॥१६॥ दुजा कोण आहे भक्त । जंगमा सवे होणार मुक्त । मग तये वेळी विरक्त । माचिदेव सभेस आलासे ॥१७॥ सकल शिवशरण गण । शरणार्थ करिती माचिदेवा लागुन । म्हणे भलारे बसवण्णा । जंगम प्राणी भूलोकी ॥१८॥ तूं असमान भक्त । सत्य सत्य जीवन्मुक्त । ऐसा कवण आहे भूलोकांत । जंगमचि प्राण झालेला ॥१९॥ म्हणोनिया माचिदेव । सद्भावे स्तविला शिव । केतय्या कारणे बसव । प्राण त्याग केलासे ॥२०॥ तयासी कैलासी राहविणे । योग्य नव्हे तुम्हा कारणे । भूलोकीचे आणीक कारण । कवण सावरी तयाविणे ॥२१॥ तयासी पाठवी

लवकरी । इंदुविणे जैसी शार्वरी । नेत्रावीण शरीर भारी । काय थोरी तयाची ॥१२२॥ तैसे बसवरायाविणे । मर्त्यलोक हे सुणे । पाठवा तयां लगबगीने । नसता तुम्हा बहिष्कार ॥२३॥ ऐसा माचिदेवे बोलुनी । जय घंटा वाजवी तये क्षणी । कैलासी श्रुत झाली ध्वनी । ततक्षणी जाणिजे ॥२४॥ पर शिव म्हणती बसवेशा । केतय्यासह जाई नंदीशा । नसता ही अपवादाची दुर्दशा । आम्हा लागी भोगवेल ॥२५॥ तो मडिवाळ माचिदेव । सत्यवादी निर्भीड स्वये । त्रिभुवनी आम्हावरी अन्याय । टाकील पाहे सर्वथा ॥२६॥ बसवेश म्हणती गौरीनाथा । तू स्वयंभू समर्थ असता । माचय्याच्या अपवादा भीता । ऐकोनि मजसी नवलाव ॥२७॥ आणिक मर्त्यासी लोटणे । हे मज सहेना भवबंधन । आता चरण कमल सोडून । मन भ्रमर न जाय ॥२८॥ अहा ! बसवा भक्ति भंडारी । सोहं भावा भुललासी अंतरी । ते हे मुक्तीचारी । दासोह भावी समरसती ॥२९॥ चकोरी चंद्रासी इच्छिती । तैसे शिवगणी तुम्हा चिंतिती । रणरंगी शत्रूसी पाठी देती । वीर म्हणविती काय ते ॥३०॥ हा नव्हे भक्तीचा साहस । किंवा नव्हे विजय तुम्हास । तुम्ही गेलाती मर्त्य लोकास । सोडुनी बहु कार्यासी आलाती ॥३१॥ जया कार्या तुम्हा पाठविलो । ते महत्कार्य तैसेचि ठेविलो । कैलासी येऊनि रमलो । उचित नोहे या समई ॥३२॥ तव शिवाज्ञा शिरसा वंदुनी । युगल मूर्ती आले अवनी । मग केतय्या बसवदेवानी । निद्रिस्ता परी उठताती ॥३३॥ माचिदेवासहित जाण । करिती प्रमथ गणासी नमन । बसवदेव सद्‌गद होऊन । कलि देवासी बोलती ॥३४॥ माझिया अंतःकरणीचे कालुष्य । धूतलो की निःशेष । मी गर्वे विसरलो स्ववचनास । शरणावतंस चेवविलो ॥३५॥ ऐकोनि बसवेशाची विनयोक्ती । तव माचिदेव हंसत बोलती । अहो ! बसवभानू तुम्हावीण क्षिती । अभक्ती अंधारी बुडतसे ॥३६॥ निशापतिवीण निशा । प्रभुवीण प्रजेची अवदशा । वराडींवीण विवाह कैसा । शोभा पावेल सांग पा ॥३७॥ शुंडा दंडे विरहित गज । अधिकार पतित भूभुज । ज्ञानेवीण योगीराज । शोभा न पावे सर्वथा ॥३८॥ सत्या विरहित बोलणे । दानेवीण ऐश्वर्य जाण । नाशिका विरहित श्रृंगाराभरण । अशोभन वाटती ॥३९॥ पति विरहित सती । मानहीन प्राणी जगतीं । स्त्रियेवीण गृहाधिपती । शोभती काय लौकिकी ॥४०॥ प्रधानावीण भूप । स्वरावीण गानालाप । पादुकावीण पाया ताप । जाणावे हो सर्वासी ॥४१॥ हंसावीण मानस सरोवर । भ्रमरावीण कमळे साचार । शुकावीण पंजर । कोकिळेवीण वसंत अशुभ की ॥४२॥ पंडितावीण सभास्थान । दीपेवीण ग्रह भयाण । साहित्याविणे सुगरिण । कैंचे व्यंजन पाकादी ॥४३॥ अभक्त शिष्य विरोधी दास । गुरुवीण मठ उध्वस । मानहीनता वनितेस । शोभा नाही सर्वथा ॥४४॥ लिंगाविणे देऊळ । श्रृंगाविणे बैल । मंगळ द्रव्यावीण कपाळ । शोभा न दिसे सर्वथा ॥४५॥ तैसे तुजवीण बसवा । भक्ति जाया दिसे विधवा । भक्ता तुजवीण विसावा । क्षणभरीही वाटेना ॥४६॥

भक्तांची सेवा भक्त करील । तनुमन धने तोषविल । प्राणासी प्राण दाता विरळ । देखिले ना ऐकिले ॥१४७॥ विशेष बोलोनि काय । तू द्वितिय शंभू स्वये । पतितोद्धारा आलासि पाहे । भूलोकासी निश्चये ॥४८॥ ऐसिया बहुविध वचनी । बसवेशा गौरविले माचिदेवानी । तव शिवशरण गणी । माचिदेवा संबोधिती ॥४९॥ अगम्य तू महिमा पुरुष । शरणांचा मुकुटमणि विशेष । बसव भक्तीचे वर्म निःशेष । तूचि एक जाणता ॥५०॥ द्वितिय शंभूसी तुम्ही चेतविला । स्ववचनाचा स्मरण दिला । म्हणूनीच बसवेशे प्राण दिला । केतय्याच्या प्राणासी ॥५१॥ तुम्ही सत्यवादी निर्भीड । देवासी वाळिलो अवघड । तुमच्या भये धडधड । प्राण आले शरणांचे ॥५२॥ बसवेशाची अघटित करणी । त्याहुनी विशेष तुमची करणी । ही अघटित घटना धरणी । देखिले ना ऐकिले ॥५३॥ ही कैसी वीर भक्ति । कैसी ही अघटन शक्ति । कैसी पराक्रमाची युक्ती । प्राणासी मागुतीं आणविली ॥५४॥ कैसा सद्गुण कैसा वर्म । कैसी गुरुभक्ती कैसा सत्कर्म । कैसा हा वीरधर्म । ब्रीद पुरातन शरणांचा ॥५५॥ जंगम प्राणी बसवेश । बसव प्राणी तू वीर महेश । भेदभाव नाही तुम्हां दोघांस । दोघेही महा अधिकारी ॥५६॥ यथा प्रकारे शिवशरण । करोनि माचय्याचे गुण वर्णन । जातीं आपुल्या आश्रमा लागुन । स्वानंदाने तेधवा ॥५७॥ आणीक ऐके पादुका स्वामी । शिवशरणांची अगाध करणी । किन्नरि बोम्मय्या नामी । कल्याणी त्रिपुरांती रहातसे ॥५८॥ कलाकुशल स्वर्णकार । संग्रह करोनि धन अपार । तोषविला चरवर । अन्न वस्त्र धनधान्ये ॥५९॥ उदयीक होईल असावे । हा भाव नाहीच तया ठावे । सदैव जीवे भावे । करावे की जंगमार्चन ॥६०॥ ऐसा हा अनिर्वचक । त्रिपुरांती राहे निष्टंक । दासोह भावे व्ययाधिक । होता द्रव्यादिक संपले ॥६१॥ धनहीने लाचार । परी सोडीना की आचार । हा जातिवंत भक्ताचा निर्धार । सौजन्य ते जाणावे ॥६२॥ आली उपवासाची पाळी । न सोडीच ब्रीदावळी । जरी दारिद्रये कवळी । परद्वार धूळी स्पर्शेना ॥६३॥ तैसा कलावंत किन्नरी । वाजवी अति मधुरी । नादे तयाच्या शिरावरी । गुंजारव भ्रमरी करितातीं ॥६४॥ नाद नादी की बिंदु नादी । समरस होतसे शिव नादी । दशविध नादी इंद्रिय लुब्धी । होतसे शिवपदी समरस ॥६५॥ किन्नरींच्या स्वर तालगतीं । आविर्भवला नाट्यमूर्ती । प्रसन्न होवोनि तांडव मूर्ती । इच्छित पुरविती किन्नरीचे ॥६६॥ नित्य पसा भरी होन । देई त्रिपुरांतक ऐकोनि गान । ते पसा भरी होन । नित्य जंगमार्चनी व्यय करी ॥६७॥ भक्तींचा हा वसंत राज । येवोनि भूमंडळी बसवराज । प्रफुल्लित केला मानवी वनराज । दरवळे भक्तीं गंधराज दशदिशी ॥६८॥ तया भक्ति गंधा लक्षुनी । येतीं शिवगण भ्रमर धाउनी । बसव हृदयाब्जी निशिदिनी । स्वानंदेसी रमतातीं ॥६९॥ एके दिनी किन्नरी ब्रम्ह । बसव भेटीसी आले निष्काम । लिंगावसरी बसवेशे जाणे सूक्ष्म । आगमन किन्नरि ब्रम्हांचे ॥७०॥

बसवराये येतीं बाहेरी । देखिले किन्नरय्या सुविचारी । आनंदे भरोनि ते अवसरी । साष्टांगेसी नमी तया ।।१७१।। तव स्नान शिवपूजा करउनी । रमती बसवेश पादार्चनी । अद्वये पादोदक प्रसाद सेउनी । अनभव वचनी स्थिर होती ।।७२।। येतीं किन्नर ब्रम्हा बसव गृही । राहात असता लिंगानुभवी । जंगम प्राणी बसव म्हणवी । परीक्षू ये समयी म्हणोनी ।।३७।। शिवदेवे अघटित केले । किन्नरय्याचे प्राण आकर्षिले । पाहता पाहता उडाले । प्राणपक्षी ब्रम्हाचे ।।७४।। तव बसवदेवे पाहून । घळघळा करितीं रुदन । गेले शोक सागरी बुडोन । सकळ शिवगण धांवले ।।७५।। गात गाताचि प्राण गेला । आकाशी नाद लीन झाला । तैंसा नादा सर्वेचि लय पावला । किन्नरि ब्रम्हाचिदा काशी ।।७६।। अहारे किन्नर देवा । निष्काम भक्ता दासोऽ भावा । धनधान्यादि जंगम देवा । निरहंभावे अर्पिशी ।।७७।। दान करोनि दासोह करोनी । दारिद्रय आले मज लागोनी । नसता मी श्रीमंत धनी । लौकिकी बहुमानी असतो की ।।७८।। दुर्व्यसने दुष्कर्मे करोनी । घेती करोनी धन हानी । पाप्याचे धन प्रायश्चिता वाचुनी । सत्पात्रा लागुनी कैसे झिजे ।।७९।। तैंसा नव्हसी तू शिवशरण । न्यायार्जित द्रव्ये करून । केलासी तू सर्वार्पण । दासोही तू निरपेक्ष ।।८०।। कीर्तीने भरिले प्रांत । दारिद्रयाचे नव्हते खंत । गान प्रतापे उमाकांत । प्रत्यक्षाला आणिले ।।८१।। इच्छित वरा पसा भरी होन । नित्य देई मदन दहन । व्यय करोनी नाशिवंत धन । अक्षय मुक्ती होन मिळविले ।।८२।। नित्य नवे संपादुन । पुनः माजविशी दासोह रण । ऐसा वीर निर्वंचक शरण । आम्हा कारणे त्रासलो ।।८३।। कैसे हो मदन दहना । कां बोलाविले सत्य शरणा । तुटवडा पडला म्हणोनि होना । भक्त राणा बोलाविले ।।८४।। दारिद्रय आले म्हणोनि तुम्हासी । घात करावा का शरणांसी । शिवभक्त हे सुख राशी । असती निराशी कायकात ।।८५।। कैसा तुमचा पाषाण हृदय । जंगम दासोहीसी अकाळी न्यावे । हा कवण हो तुमचा न्याय । बसवराय बोलतीं ।।८६।। मत्प्राण मद् हृदय हा ! । मद्गुरूलिंग जंगम हा ! । भक्त काम कल्पद्रुम हा । हा परुष खाणी चिंतामणी ।।८७।। हा माझा सद्गुणी । हा ! माझा भक्ताग्रणी । तात भ्रात बंधु गुणी । सज्जन मित्र कळत्र तू ।।८८।। माझिया कारुण्य सिंधो । अनाथ नाथा दीन बंधो । कुल दैवत तू सुबंधो । कैसा वियोगी झालासी ।।८९।। दाता रक्षिता सुज्ञान । माझा त्रिविध भक्तींचा निधान । माझी सत्क्रिया सदाचरण । माझी सुमती सद्गती तू ।।९०।। माझिया मोक्षागारा । माझिया सद्गुण मणिहारा । मज वंचोनिया परा । गेलासी सुविचारा दयानिधी ।।९१।। स्थिर मति सुधीरा । दुर्गुण दुर्विचार दूरा । षडूर्मिषड्वैरी संव्हारा । विकल्प दूराजितकामा ।।९२।। मद्हृदय ज्ञानदीपांकुरा । दुरित संव्हारा करुणाकरा । दुष्ट वैवस्वत विदारा । क्लेश दूरा आशा पाश विरहिता ।।९३।। वर शरण गणाचार्या । किन्नरी ब्रह्मी देवय्या । मजवरी रुसोनिया । पावलासीं शिवपदा ।।९४।।

माझिया चित्तोल्लासा । हे माझिया बुद्धि प्रकाशा । हे माझिया भक्ति विलासा । संसृति नाशा सत्शरणा ॥१९५॥ मलत्रय शरधि वडवानळा । गुणत्रय पर्वत तृणानळा । सद्भक्त हृदय चंद्र सुशीतळा । माझिया सूनृत सुभाषा ॥९६॥ माझिया विमलाचार पूरा । माझिया वाक्यांमृत सारा । लिंगांग तत्वज्ञा सकळ कळापूरा । संसृती पारा सर्वज्ञा ॥९७॥ अष्टमद गजांकुशा । अष्टावरण गणेशा । इष्टसिद्धि प्रदा महेशा । जंगम दासोही जगदात्मा ॥९८॥ माझिया मुखाब्ज बृध्ना । माझिया दुर्गुण विघ्न हरणा । माझिया अहंकार अंधकमर्दना । सर्वगुण संपन्ना गुरुवर्या ॥९९॥ उन्मत्त मदन मर्दना । मोहांधकार रविकिरणा । हा मनुमुनींद्र प्रवीरा शरणा । गुण गणभरणा ब्रम्हय्या ॥२००॥ किन्नर ब्रम्हा निष्कल ब्रम्हा । किन्नर ब्रम्हामदूहृदयारामा । किन्नर ब्रम्हा घनमहिमा । नामसीमा विदूरा ॥२०१॥ सद्भक्त गणाभरणा । चिन्निधी चिदावरणा । चिल्लिंग निजध्याना । चिद्दीप चिद्घना रुसवाका ॥२॥ ऐसे बसवराज धाय मोकलूनी । प्रलापी किन्नरय्याचे गुण आठवोनी । भिजले उत्तरीय विमलांबुधारे करोनी । सकळ शरणी गहिंवरले ॥३॥ ऐसे शरण समूह । दुःखाब्धींत बुडाला पाहे । कैसो शिवशरण त्यागिला देह । ऐसा न देखू शिवशरण ॥४॥ तया शरण समूहा पाहूनी । बाचरस बोले तये क्षणी । सत्तवरु अत्ते होत्तवरु अत्तेही म्हणी । कानडीमाजी प्रसिद्ध ॥५॥ तैसेचि वाटे मजला । मेलिया सर्वं मरता का येवेळा । दुजियाचे दुःखा रडे खुळा । कळवळा नोहे भक्तींचा ॥६॥ तव पडिहारी बाचरस । जाय माचय्याच्या आश्रमास । जावोनि नमिला चरणास । सांगे वृत्तांत किन्नराचे ॥७॥ ऐकोनि म्हणे माचिदेव । काय करितसे बसवदेव । बाचरस म्हणे दुःखाब्धींत सर्व । निमग्न झाले बसवादी ॥८॥ मागा होता सुग्रीव । तैसाचि भासे बसव । लिंग भक्त झाला तरी निष्फल सर्व । लिंगासी जंगमचि प्राण की ॥९॥ तो जंगमचि माझा प्राण । ऐसा गर्जोनि बोले वचन । बोलिल्या वचनाचे नाही स्मरण । राहिले नाही बसवेशा ॥१०॥ बोले निर्भयपणे वचन । आता कासया अनुमान । कां दावावे बोलोन । अहंकारे लोकासी ॥११॥ धनमने बोले वचन । बोलिल्याचे नाही आठवण । यासी नये का मरण । अजरामर जन्मला ॥१२॥ सत्यवंतचि जगी अमर । पतिहित जाणे ती पतिव्रता थोर । रणांगणी मरणा भीणार । नाही तोचि वीर जाणा ॥१३॥ सोय जाणे तोचि सोयरा । विपत्काळी सहाय कर्ता मित्र खरा । निंदा आणि दुराचारा । दूर असणारा साधू तो ॥१४॥ अग्नी जरी शीतळ होय । पश्चिमाद्री रवि होय उदय । मेरू पर्वत चल न पावे । शिळेवरी उगवेल कमळिणी ॥१५॥ तरी सज्जनांचें वचन । पालटेना त्रिकाळी जाण । ऐसे असे नीति वचन । सर्वकाळ शाश्वत ॥१६॥ कूर्मा असोनि कर चरण । लपविणेचा स्वभाव जाण । तैसे अज्ञानी अनेक वरळोन । अनुपयुक्त दर्दुरापरी ॥१७॥ तैसा नोहे शिवशरण । बोले तैसा चाले जाण । म्हणे जंगमचि मत्प्राण । जळावीण मीन कैसा

जगे ॥२१८॥ आटताचि सरोवर । मत्स्य कैसे राहती अमर । जंगम प्राणावरी निर्भर । जगणे निर्धार जयाचे ॥१९॥ राहिली जरी हृदय क्रिया । कैसे राहील सचेत काया । जंगम गत प्राण झालिया । जंगम प्राणी जगेना ॥२०॥ जंगमचि माझे पंच प्राण । जंगम हेचि माझे जीवन । आजी बसव भानूचे प्राण । राहिले केवी न जाणो ॥२१॥ आपुले वचन आपण विसरोनी । रोदन करी कवण्या वचनी । मज वाटे आश्चर्य मनी । जंगम प्राणी नव्हे हा ॥२२॥ बोलेन तैसेचि चालेन । हे माझे सत्य भाषण । भाषण नव्हे ती गारा जाण । फडफड पडोनि विरघळले ॥२३॥ जरी मदात्यय रोग झाला । रोगी बरळतो सैरावैरा बोला । तैसा भक्ति मद शिरी चढला । वचने बरळला बसवेश ॥२४॥ उत्तमे करोनीच दावी । मध्यमे करी बहु घाई । अधम तो करणारचि नाही । कुंभार कुकडी परी की ॥२५॥ अर्क फल सुंदर बहुत । निष्प्रयोजक नीरस आंत । सुरंग दिसे लाल बहुत । क्रिमीयुक्त औदुंबर ॥२६॥ ऐसिया ठकासी चित्तज हर । प्रसन्न नोहे की लौकर । भक्ति हीनांची वार्ता मज समोर । करू नको सर्वथा ॥२७॥ किन्नरय्यासी शिव प्रसन्न झाला । मग कां हो देह त्यागिला । तयासाठी बसव दुःखित झाला । संसारी लौकिका सारिखे ॥२८॥ वचन भ्रष्ट जे कां जन । तया महाभक्त म्हणू कैसेन । कैंचे तयां सवे भाषण । दर्शन स्पर्शन नको नको ॥२९॥ मज ऐसियांच्या संगे । बसणे उठणे बोलणे अयोग्य । दर्शने प्राप्त होय नरक भोग । जावे सवेग आले तैसे ॥३०॥ माचय्याचे रौद्राकार गर्जन । ऐकोनि घाबरला पडिहारी जाण । थरथरा कांपतचि आला तत्क्षण । बसव मंदिरा ते समई ॥३१॥ कर युगुल जोडोन । बसवादि प्रमथां नमून । माचिदेवाचे निष्ठुर वचन । ऐकिले तैसे सांगितला ॥३२॥ ऐकतां चकित झाले शरण । दुःखातिरेकें गेला मावळोन । बसव भंडारी दिङमूढ होऊन । भाषा वचन स्मरलासे ॥३३॥ आत्म प्रौढीने बोलिलो । उगाचि जंगम प्राणी म्हणविलो । किन्नरेश जाता मागे राहिलो । धिःकार असो वचनासी ॥३४॥ धिःक्कार माझिया जन्मासी । म्हणोनि भंडारी पडिले धरणीसी । धाडी पंचप्राणासी । किन्नरय्यासी भेटण्या ॥३५॥ झाला एकचि हाहाःकार । कैसा माचिदेव हा निष्ठुर । सत्य वचनी महा कठोर । बसव हृदय विदारिले ॥३६॥ आम्ही एक चिंतिलो । दुर्दैव दुजेचि केले । हे बंधनचि झाले । अनुचित ये समई ॥३७॥ निर्वंचक सद्भक्ती । करू जाणे बसवेश निगुती । माचिदेव कां बोलती । वर्म धर्म न जाणे ॥३८॥ बसव देवाचे अंतर । जाणतो माचिदेव सुविचार । माचिदेवाचे सद्गुण साचार । जाणतो की बसवेश ॥३९॥ यया दोघांचा द्वंद्व । जाणे एक परशिव । आम्ही अज्ञ सर्व । न जाणू भाव महात्म्यांचा ॥४०॥ ऐसे सकल शिवशरण । दुःख सागरी गेले बुडोन । पाठविती पडिहारीसी पुनः । माचय्यासी कळविण्या ॥४१॥ तत्काळ पडिहारी गेले । माचिदेवा साष्टांगे नमिले । कर कमळ जोडोनि विनविले । म्हणे बसवेश गेले कैलासा ॥४२॥ श्रवण करताचि

माचिदेव । अंगी भरले रोमांच सर्व । म्हणे धन्य धत्य बसव । बोलिले वचन सत्य केले ॥२४३॥ जंगमांचा जीव भाव । जंगम प्राणैक्य सदैव । जंगम प्राणी हे नाव । सार्थ केला बसवेश ॥४४॥ आद्यांचे ऐकावे । सुचेल ते न्याये करावे । तैसा सत्यवादी बसव देवे । स्ववचनासी जागला ॥४५॥ ऐसा तो माचिदेव । वाखाणी बसवा सहृदये । वीरव्रती बसवदेव । भक्ति रणरंगी झुंजला ॥४६॥ मत्त गज वश होय अंकुशासी । वीरचि वश करी लक्ष्मीसी । वीरचि झडपी चंद्रायुधासी रणरंगी ॥४७॥ भक्ति हेचि रणांगण । वीर भक्तचि वादी जाण । प्रतिवादी ईश्वराने । मीच जिंकीन म्हणे तो ॥४८॥ तनुमन धनादि शस्त्र । भक्तांचे हे पाशुपतास्त्र । पणा लावोनि अहोरात्र । भक्त निर्भय झुंजतो ॥४९॥ धनासी मन अर्पिले । की मनासी धन अर्पिले । तनुमन धनावरी बोले । प्राणचि जेणे नैवेद्य केले । निस्सीम बोलिजे त्या भक्ता ॥५०॥ तैसा निस्सीम भक्त । जंगम प्राणी त्रिवाचा सत्य । भक्ति रणी सर्व स्वार्थं । त्यागोनिया झुंजला ॥५१॥ ऐसी जयाची करणी । तो वंद्य होय त्रिभुवनी । मी जरी वाखाणी । तरी ते बहिरंग ॥५२॥ ऐसा माचिदेवे बसव कीर्ती । वर्णित आला मंदिरा प्रती । खिन्न अंतःकरणे शरण निश्चिती । बैसले वैवस्वत भीतीने ॥५३॥ अंतरी म्हणे शिवशरण । भीत ते रात्रंदिन मरणा । शिरकमळ हाती घेऊन । भक्ति रणी झुंजतो ॥५४॥ मरण हेचि महा नवमी । दुजे नाही महा नवमी । मरणासी न भी मी । बोलिले वचन सत्य केले ॥५५॥ ऐशी शरणांची स्थितीं । पाहोनि यम भट चळचळा कांपती । कलिदेवांची वचने वीर गती । गात येती सभांगणी ॥५६॥ आले वीर घंटि मडिवाळ । आले काळाचे महाकाळ । दुर्जन कांपती चळचळा । सज्जन कमळ विकसली ॥५७॥ आता हा करील काय ? । पडले कोडे सुजना पाहे । ययांच्या निष्ठुरोक्तींसी लवलाहे । सोडी बसवदेव स्वप्राण ॥५८॥ अंतर्गृही येता क्षणी । सामोरे ये शरण तिथिणी । मडिवाळ माचिदेवा लागुनी । साष्टांगेसी नमितातीं ॥५९॥ मग आपणही शरण गणा । प्रणिपात करी शरण राणा । गंभीर वृत्ती विनये ते क्षणा । किन्नरय्या जवळी आले माचिदेव ॥६०॥ साक्षाद्विरुपाक्ष सुविचारी । तुझा प्राणमित्र बसव सदाचारी । ऐसीया सद्भक्ता सोडूनी निर्धारी । रमलो ईश्वरी ईश्वराज्ञे ॥६१॥ तरी हे पर शिवा परमेशा । भक्ति लंपटा दुरित विनाशा । किन्नर बसव प्राणांसी भूतेशा । वंचोनि केले जवळी का ॥६२॥ पुरातनांसी न सुचविता । नेलो त्रिविध दासोही भक्ता । चरलिंग प्राणी बसवरस तत्वता । बोलिले तैसे चालिले ॥६३॥ तरी तया बसवेशा सवे । त्रिविध भक्ति गेली पाहे । भूलोकी तुमच्या नावे । शून्यचि बसावे लागेल ॥६४॥ या कारणे भक्त काय । म्हणितले की मम काय । तरी हा ऐसा अन्याय । उचित नोहे ये समई ॥६५॥ भक्तीच्या उपवनासी । जीवन हा बसव निश्चयेसी । जीवन गेलिया या समयासी । सर्वथा नाश उपवना ॥६६॥ आजवरी उपवन रक्षिलो । फलभार

काळी निघोनि गेली । जीवन ही सर्वेची नेले । तळमळताती वृक्ष लता ।।२६७।। तुम्हा कैलासी सुख आहे । आम्हासी मर्त्य लोकी काय लाहे । आम्हीही येऊ तुम्हा सवे । कैलासासी येधवा ।।६८।। ऐसा ऐकोनि उत्तर । हंसतमुखे उठला किन्नर । किन्नरय्या सर्वे बसवेश्वर । निद्रिस्तापरी उठताती ।।६९।। एके दिवसीं झोपला । अनुचित स्वप्ने जागृत झाला । तैसा किन्नरेश उठिला । गडबडोनि ते क्षणी ।।७०।। किन्नर ब्रम्हय्या उउता झणी । बसवदेवही उठतीं तत्क्षणी । माचिदेवा समक्ष पाहुनी । बसव किन्नरय्या नमिताती ।।७१।। माचिदेवही तया नमितीं । त्रिमूर्तीनी शरणा प्रणमितीं । तव शरण समुदाया प्रतीं । बोलतातीं माचिदेव ।।७२।। सच्चिदानंद महालिंग । तयाचा मुख हा महालिंग । भक्त होय पूर्णांग । जंगम दासोही झिजलिया ।।७३।। भक्तां हृदयी शिव जाण । शिव हृदयी भक्ता स्थान । जंगमी प्राण प्राणामाजी जंगमा स्थान । शिवशरणां वांचुन कवणा साध्य ।।७४।। सतीं जाण्या तयार होय । पायाचे चुलीवरी अन्न शिजवावे । सुखे ते अन्न जेवावे । सतीं जावे पतीं सवे ।।७५।। तरी तैसा नोहे भक्त । तनुमन धनी अनासक्त । विषय कर्दमा न शिवत । जंगम भक्त जंगम प्राणी ।।७६।। ऐसे हे अघटित व्रत । भंडारीसी साधले यथार्थ । हा द्वितिय शंभू निश्चित । संशय कायसे या माजी ।।७७।। ऐसे बसव भानूंचे गुण वर्णन । करोनि माचिदेवादी शिवशरण । शिवानुभवी रममाण । होवोनिया राहिले ।।७८।। आणीक किन्नर देवाची करणी । ऐके पादुका स्वामी सद्गुणी । त्रिपुरांतकाच्या स्थानी । असे रहिवास तयांचा ।।७९।। तेथे कल्याणी एक विट पुरुष । वेश्येने आपुल्या पितृ तिथीस । आणवी तया हाती मेषास । विषयाभिलाष काय न करवी ।।८०।। वडिलोपार्जित बहुधन । वेश्येच्या चरणी केला अर्पण । दुर्दिवस आले दुराचारिया लागून । पुढत पुढती ।।८१।। कुच्छित विषयासेला । वेश्येच्या द्वारी पडला । पीकदानी धुवोनि राहिला । आपुल्या बरोबरींच्या जारींणीची ।।८२।। द्वार झाडी पाणी वाही । आल्या गेल्यांची खबर देई । असता बहु धन ते समई । हाचि राजा तिच्या गृही ।।८३।। विषयलोलुप काय करील । पीकदाणी धुईल पाणी वाहील । विषयांधासी विरक्ती येईल । कैसेनी हो या लोकी ।।८४।। दोर लावोनि आणिता बस्त । सोडवोनि घेतला की मस्त । देवळामाजी प्रवेशत । जावोनि लपत किन्नरा मागे ।।८५।। मागाहूनि जार आला । म्हणे द्यावे अमुच्या बस्ताला । पितृ श्राद्ध कार्याला । विलंब होत आहे हो ।।८६।। तव म्हणतीं किन्नरदेव । प्राण भये आला तो जीव । शिवशरणांचा ऐसा दृढ भाव । की शरणांगता रक्षावे ।।८७।। यया मेषासी देणार नाही । हिंसक दुराचारी निघोनि जाई । तुमची कासया यांत घाई । आमुची वस्तु आम्हा दीजे ।।८८।। यजमानीचें खर्चोनि धन । क्रये आणिले बस्त जाण । तुम्ही तरी सत्य शरण । परधन कैसे अपहरिता ।।८९।। अरे ! देत नाही देत नाही । त्रिवार सांगतो देत नाही । परधन परवस्तु पाही । बळेचि अपहार

करिता का ?.॥९०॥ अरे मी करीना अपहार। आपणचि प्रवेशले देव मंदिर। तुझे ऐकोनिया दुर्विचार। निर्धार झाला हिंसेचा ॥९१॥ समजोनि आणि उमजोनी। हिंसेलागी न दे प्राणी। निघोनि जाई ये क्षणी। देईन झणी तुझे धन ॥९२॥ अरे नर सुरवर मुनि किन्नर। मरण भये पळतीं दूर। तुजही मरणाचे भय थोर। हा तरी पामर जीव असे ॥९३॥ कितीं व्रय झाले तुझे धन। देईन तुज द्विगुण। हिंसेचा दोष महान। क्रये पदरी घेतोसी ॥९४॥ सांगरे याचे क्रय। देईन मी निःसंशय। ऐसे तुम्ही दयामय। कितीं जीव रक्षिता॥९५॥ मानव प्राणी की पशु प्राणी। शरण मानितीं समान जनी। सहस्र मुद्रा एक जीवा लागोनी। समान होय लौकिकी ॥९६॥ देता तरी सहस्र मुद्रा देणे। नसता माझी वस्तु मज देणे। मज श्राद्धा कारणे। विलंब होतो ये समई ॥९७॥ बरे सहस्र मुद्रा देईन। पशूसी लिंगमुद्रा धारण करीन। प्रभुत्व तुझा गेला जाण। प्राण्यावरूनि येथुनी ॥९८॥ सहस्र मुद्रा मज देता। तयावरी कैंची माझी प्रभुता। तुमचे होवोनि राहिले आता। पाहिजे ते करावे ॥९९॥ सहस्र मुद्रा तये क्षणी। देतीं भुजंगा लागोनी। लिंग मुद्रांकित करोनी। रक्षिले तया प्राण्यांसी ॥३००॥ घडला वृत्तांत जारिणीसी। हर्षे सांगे विषयाभिलाषी। झिडकारोनि लाथाडिली तयासी। जारिणीने तेधवा ॥३०१॥ म्हणे अधमा पापी नीचा। अससी लुब्धक द्रव्याचा। सडा घालीन होनांचा। राज बीदीमाजी पैं ॥२॥ गेलासी कवणिया कारण। व्यवहार करिसी पितृ कार्यां जाण। अरे मूढा धनाचा वर्षण। कटकामाजी करीन ॥३॥ श्राद्ध निमित्ते जीव क्रयिले। तया विक्रय करोनि धन आणिले। तुज सारिखे दुष्काळ नाही पडले। मज ये वेळे निर्धनिया ॥४॥ अहो इतुका कोप कासया। आणीन आणीक दहा जीवा। तुम्हासी साजेल तैसा करावा। पितृ श्राद्ध सुवैभवे ॥५॥ कुल गोत्रासी द्याकी आमंत्रण। करवा की षड्रस पक्वान्न। आणीन आता शतमान। मेष कळपा लागोनी ॥६॥ कुणाचे ते धन ऋण। कुणाचेरे सहस्र भोजन। आणिलासी कटिसूत्र कंठी विकून। अहंपणे बरळसी ॥७॥ मूढा जाई लौकर जाई। मारू नको व्यर्थ बडाई। माझे धन माझे अन्न पाही। करणार कवण पंडित तू ॥८॥ जे बस्त देवाचे भागा आले। तेचि घेऊन यई ये वेळे। स्वामीचे धन देई स्वामीस कुशले। आणी अनुच्या मेषासी ॥९॥ आणीक दुजे पशू आणिसी। शपथचि असे तुजसी। देव माझा महा तामसी। भय आम्हासी तयाचे ॥१०॥ जाई म्हणता आला जार। येवोनि धरिला बस्त सत्वर। पाहताचि म्हणे किन्नर। कोणरे धरणार पशूसी ॥११॥ विक्रय करोनि ओपिले। इच्छित धनासी स्वीकारिले। आता काय राहिले। रे तुझे बाचे ॥१२॥ सोडरे सोडी बस्त। तुज बसव प्रभूचीच शपथ। ना तरी तुझे अंत। झाले येथ समज तू ॥१३॥ आताचि केलासी प्रमाण। घेवोनि गेलासी सहस्र होन। अधिकार नुरला यावरी म्हणोन। बस्त विकोनि गेलासी ॥१४॥ धारण केलो लिंग मुद्रा।

का स्पर्शितोसी पुनः क्षुद्रा । कामांधा अभद्रा । निघे येथोनि लवकरी ॥३१५॥ बोलिल्या वचनाचे आठवण । नाही का भृष्टा तुजलागून । निर्भयपणे येऊन । बस्तालागी धरितोसी ॥१६॥ तुमचे तुम्ही घ्यावे धन। देवस्व आहे बस्त जाण । तया विकोनि आणिले धन । तेंचि बस्त आण म्हणती ॥१७॥ तुमचे यांत काय गेले । ज्याचे तयासी देता वहिले । अन्याय कोणता सांगा भले । जाणते तुम्ही ॥१८॥ तू न्यायान्याय जाणणार । मागितला कवण तोंडें धनसहस्र । तुज न देता प्रत्युत्तर । इच्छित धन बस्त घेतलो ॥१९॥ तयावरी तुझा नसे अधिकार। अधिक उणे न बोली उत्तर । तुमचे धन तुम्हा देतो सत्वर । माझा बस्त नेईन मी ॥२०॥ अरे ! तो नव्हे सुविचार । ज्याचा त्याने नेता कैसा अविचार । देवस्वाच्या वस्तुवर । तुमचा अधिकार नाही की ॥२१॥ आहे की नाही तुजला। आताचि सांगतो कुश्चळा । किन्नरे खड्ग झळपिला । शिर केला धडागळे ॥२२॥ नीच, कामांध, उन्मत्त । झोप आता निश्चित । घेतलो बसव भानूची शपथ । माझा बस्त म्हणतोसी ॥२३॥ पाप्याच्या शिरासी। छेदिले ते समयासी । हां हां म्हणता वार्ता आप्तासी। पतिताच्या कळाले॥२४॥ आता यां न्याया-याला सांगे जाउनि कामिनीला। प्रथमचि आम्ही सांगीतला । की मुद्रांकित झाला प्राणी हा ॥२५॥ आता तुझा अधिकार। असे सहस्र धनावर विसरोनि कामांध कुविचार । घ्यावे घ्यावे म्हणतोसी ॥२६॥ पतिताचे आप्त मिळोन । भूपतीसी गेले शरण । देहांताचे वर्तमान । सांगोनि शोकेंहंबरती ॥२७॥ आता कल्याणी नाही न्याय । शिवशरणाचा स्वराज्य आहे । यांत तुमचा दोष काय । सर्वाधिकारी ते असतीं ॥२८॥ विचार नाही प्रसंग नाही । बोलतीं तैसे करिती पाँही । मागचा पुढचा विचार नाही स्वेच्छावर्तन करितातीं ॥२९॥ कल्याणामाजी जगूनी। राहता नये दुबळ्यानी । कवणा सांगावे गाऱ्हाणी । सुख दुःख ॥३०॥ ऐसे ऐकोनि भूपतीं । कोपोद्रेकें बसवा म्हणती। शिवशरण हे महा दया मूर्ती । शम दमादि संपन्न ॥३१॥ ऐसे तुम्ही वाखाणिता । विपरीत करणीनव्हे का तत्वता । निरपराधिया वधिता । उत्तर द्याजी कायसे ॥३२॥ मानवा हूनि अधिक जाणू केला बस्ताचा परिमाण । आम्हा वरी अधिकारीसुजाण । आहे म्हणोनी नेणता ॥३३॥ निरपराधिया वधिले । अधिकार तुमच्या हाती आले । म्हणोनि का ऐसे वागले । पाहीजे तुम्ही लौकिकी ॥३४॥ भूपती जरी झाला जाण । निरपराधिया दंडीना । अहिंसक म्हणवितीं आपणा । अंतरी क्रूरपणा हिंसेचा ॥३५॥ अज्ञानिया माजी सद्‌गुण । शोधिता कल्पांतीं मिळेना । मूर्ख बोले दुर्वचन । तरि शहाणा उगेचि राहिजे ॥३६॥ उंच ताडाचा वृक्ष । सरीं न पावे दवण्यास । अश्वारूढ वीर जाय शिकारीस । युद्धी जगणेही ॥३८॥ भेसुर गार्दभ हिणवितीं ॥३७॥ कैसे हे मुखी बंधन । स्थानी जाता मागे पुढे बंधन । नाही वाव स्वेच्छा गमन । ऐसे गार्दभे एके काय ओझे वाहतीं का ? आमुचो सरीं करतील । की एकांड्यापरी स्वतंत्र चरतील । स्वतंत्र राहतील एके ठायी ॥३९॥

समयी । आत्म प्रौढीसी मिरवी । तुरुंगासम होईल काई । रासभ तो रासभ ।।३४०।। तयाच्या शब्दा ऐकोनी । कोपावे का अश्वजनी । तैसी सज्जनाची रहाणी । निंदा स्तुती विरहित ।।४१।। तरी दुर्जनाच्या ऐकोनि बोला । सज्जनी कीजे का हिंसेला । अहिंसा परम धर्माला । कलंक लाविला नाही का ।।४२।। सपादुका लाथाडणे । मुखांतील गुळणे अभिषेकिणे । रुचि पाहोनि मांस अर्पणे । वैदिकाचरण कवण हे ।।४३।। धूळगोटे वाहणे । शिशू पिता वध करणे । सन्मार्ग कवण । भक्ताचे ।।४४।। ऐसे जेकां भ्रष्टाचरण । शिवभक्ती आपंगिले जाण । आपुले बोलचि धर्माचरण । दुजियाचे वचन अधर्म ।।४५।। उणे पुरे कासया बोलावे । तुम्हीच राज्यभार करावे । उणे पुरे बोलोनि घ्यावे । बसोनि स्थानी वर्म कर्म ।।४६।। बसव भंडारी ऐकोनी । बोलताती सस्मितानननी । तथ्यातथ्य न जाणोनी । बोलों नये श्रीमंतीं ।।४७।। धर्मै हीं एकच असतीं । मानव हेचि चुकताती । शिवशरण किन्नरय्या सुमती । पशुपति अवतार बाळ नोहे ।।४८।। म्हणे अहो बैल व्याले । दुग्ध ठेवी शिंक्यावरी भले । खरवस खाईन बोले । पत्नी लागी पतिदेव ।।४९।। ऐसेचि वाटे मजसी । न विचारिता सत्यासत्यतेसी । वावुगेचि बोलता अवाच्यतेसी । ऐकोनि जैसे तैसेची ।।५०।। प्रत्यक्षासी पाहीजे प्रमाण । अप्रत्यक्ष कैसे बरळणे । पाठवावे दूतालागून । सत्य शोधून येईल ।।५१।। मग दुजे प्रधानादिक । किन्नरस्थाना जाती देख । शरणागत वज्र पंजरा सम्यक । चरणालागी नमियेले ।।५२।। करकमळे जोडोनी । हिंसेला प्रवर्त्तती का शरणगणी । भवहर भक्ता लागूनी रजक श्रमणी असमान ।।५३।। अम्ल दुग्ध मिळविता सुरस नोहे । तैसा तुम्हावरीं अपवाद पाहें । पिशुन दुर्जनासवे । आला अंबुज भानूसी वैरत्व ।।५४।। तो की हा मलिनात्मा । आपण शिवशरण महात्मा । राजाज्ञा मानोनि आम्हा । येणे झाले येथवरी ।।५५।। तरीं जे कांहीं घडले । ते सत्य सांगिजे भले । ऐकोनि किन्नर ब्रम्हय्या ते वेळे । साद्यंत बोलिले वृत्तासी ।।५६।। माझिया वचनाचा विचार । सूज्ञे करावे साचार । नाहीं तरीं यासी आधार ! साक्षी वदवीन त्रिपुरांतक ।।५७।। वदलो ते साद्यंत विचार । नरपतींस सांगा सविस्तर । ऐसे ऐकोनि आमात्ये सत्वर । ब्रम्हय्या नमूनि जाताती ।।५८।। किन्नरय्याचे वृत्तांत । आमात्य सांगे साद्यंत । आरक्त नेत्रे राव बोलत । सिंहगर्जने तेधवा ।।५९।। अहह ! हे सत्य सत्य जाण । आपुल्या अपराधा लपवून । त्रिपुरांतका साक्ष देतो म्हणे । विपरित बोलणे नव्हे का ।।६०।। चला आता येच क्षणी । पाहू तयाची अघटित करणी । त्रिपुरांतकासी साक्षी झणीं। देतो म्हणे आश्चर्य ।।६१।। त्रिपूरांतकाच्याराउळासी । येती राव परिवारेसी । होवोनि विनम्र भावेसी । किन्नरय्यासीं नमियेले ।।६२।। सुचरित्र श्रीबसवेश । त्रिकरण शुद्धे नमिला किन्नरेश । विविध प्रकारे गुण विशेष । वर्णी तसे सहजगती ।।६३।। शुभ समुहाचा मळ । तुमच्या ठायी झाला सोज्वळ । शिवमत रवि किरण उज्वळ ।

महादयाळ त्रिविधार्पणी ॥६६॥ अन्यायासी तूकृतांत । न्यायमूर्ती सदानत । उभय कर्मासी विरहित । त्रिविध संपत्परिपूर्ण ॥६७॥ चतुर्विध साराय निःसीम । पंचाचार परिणाम । षटस्थलाचारी सुगम । वींरभक्त सुविचारी ॥६८॥ त्रिनेत्र भक्तीसी तत्पर । मत्सर गुण संहार । निश्चय वचनी शूर । वीराचार संपन्न ॥६९॥ सच्चरित्र शुभगात्र । दुर्गुण कानन वीति होत्र । सद्गुण जन, कमल मित्र । भवजलधि भैत्र सर्वज्ञ ॥७०॥ रायासह सकळ जन । त्रिपुरांतका नमिती आनंदाने । तव गुरवे पूजादि करून । कवाट बंधन केलासे ॥७१॥ परशिवावतारी किन्नर देव । सुहास्य वदने वदती तव । बंधनी राहील का देव । अत्यतिष्ठदशांगुल ॥७२॥ तुझे कवाड गुरवा हातीं । जगाचे कवाड तुझिया हातीं । अनिबंध अनिर्वाच्याप्रतीं । कैसे करितीं बंधन ॥७३॥ उघडी आता कवाड । तू जगद्व्यापी घनिष्ठ । तव कवाडा पाहतीं एकनिष्ठ । किन्नरदेवे शिवध्यानी ॥७४॥ तव कवाडे घडल म्हणोनी । उघडताती तत्क्षणी । तव भूपती सहित सकळ जनी । आश्चर्यें दिग्मूढ जाहले ॥७५॥ स्वयें किल्ली उकलली । अभिनव महिमा दाविली । त्रिपुरांतकाची कृपा साऊली । ब्रम्हय्यावरी असे की ॥७६॥ आपणचि द्वार उघडले । देवा बोलविण्यास काय नवल । सत्य जे ते प्रत्यया येईल । संशय काय यामाजी ॥७७॥ ऐसे म्हणती सकळ जन । किन्नर ब्रम्हय्या राउळी प्रवेशून । द्वय करकमळ जोडून । प्रार्थीतसे ब्रम्हय्या ॥७८॥ सौंदर परविनाचि शरण । कुच कमंडलूसी लिंग भाऊन । स्तविताक्षणी ओ देऊन । देसी सभेंत स्व साक्ष ॥७९॥ दासिमदेवाच्या वादी पिपिलेकेंतून । ओ देसी सभेंत जाण । बाहूर बोम्मिदेवा लागून । जवांतनीओ देशी ॥८०॥ आजि माझिया वचना कारण । साक्ष द्यावी बोलोन । शिवशरणांसी करोनि नमन । ठेविला खड्ग स्वमानेवरी ॥८१॥ त्रिपुरांतका म्हणोनी । खड्ग ओपिला गळ्या लागुनी । तव झालीसे महाध्वनी । अंबर तेंव्हा दुमदुमले ॥८२॥ सहस्र विजा कडाडती । दशदिशा नादे घुमती । ऐकणारांच्या कांनटाळ्या बसती । मूर्छित पडती भूमी वरी ॥८३॥ तयानादं खग मृगादिक । मूर्छित होवोनि पडले देख । झाला भूकंप नावेक । पर्वते भूमिस्थ होती वाटे ॥८४॥ कूर्मपृष्टी पृथ्वी डळमळी । समुद्र जळ उसळो लागली । अष्ट दिग्गजे थरारली । प्रळय धूळी उठली वारे ॥८५॥ उडुगणे गळो लागली । रविची गती स्थिरावली । प्रमथ कमळे विकसली अत्यानंदे तेधवा ॥८६॥ प्रमथ गणी नाचती । जय जयकारे गर्जती । पुर हर छंदे गाती । जय जयकार करिती स्वानंदे ॥८७॥ हेमंती जैसे आकाश । निरभ्र निर्मळ अपैसे । दिसते परी आजि कैसे । प्रळय काळ उदेला ॥८८॥ ऐसे पहा सप्तदिन । चालले घोर मेघ गर्जन । पृथ्वीचे सकळ जन । आला प्रळयाग्न म्हणताती ॥८९॥ ऐसिया प्रळयगर्जने । बधिर झाली जनांची कर्णे । बोलणे ना चालणे । भय चकित मुग्ध जाहाली ॥९०॥ हा उत्पातकी प्रळय । कां [illegible] घोर विलय । आता मात्र सद्गती नोहे । म्हणती प्रवर्तला महा प्रळय ।

प्रवर्तला की ये समयी ॥३९१॥ बसवराये देखोनी । प्रार्थी किन्नर ब्रम्हा लागुनी । म्हणे भक्त शिखामणी । अघटित करणी तुमची हो ॥९२॥ हे तापत्रय विदूरा । पतित पावना दीनोद्धारा । आम्ही अपराधी क्षमा करा । परशिवावतारा परमेशा ॥९३॥ माता पिता तुम्ही दयाळ । मूढ अज्ञानी आम्ही बाळ । कृपादृष्टी अवलोकी ये वेळे । दीन वच्छल धर्मात्मा ॥९४॥ ऐसिया बसवा पाहुनी । किन्नरय्या बोले सुहास्य वदनी । त्रिपुरांतका पुरे पुरे अवनी । प्रळय जनी वर्तला ॥९५॥ तव सर्वांचे कानटाळया । उघडले हो ते वेळा । मूर्च्छा वितळोनि जन समूह उठला । भूपाळासह ते वेळी ॥९६॥ राहे होवोनि बद्धांजुली । साष्टांगे ब्रम्हय्याचे चरणी लोळे । मी अज्ञान अवगुणी मुळी । महिमा त्रिकाळी न जाणे ॥९७॥ मेरू न पारखी कार्गीं गुण । चंदने गुण न पाहे तरुमाजी जाण । साधू न देखे अवगुणी सद्गुण । सर्वगुण संपन्न शिवशरणा ॥९८॥ तैंसे आम्ही अवगुणी । अवगुण शोधू नये सज्जनी । अपराध पोटी घालोनी । क्षमा महाजनी करावे ॥९९॥ समुद्र पात्र ओलंडेना । कर्पूर सुगंधा सोडीना । सहनशील बोलेना । दुरुत्तरे विंधिना कुजनासी ॥४००॥ तुमचिया प्रार्थना वचने । हुंकारे गर्जिन्नला त्रिपुर दहन । भास झाला प्रलयाचा ये क्षण । सप्तदिन दुमदुमिले ॥४०१॥ आणीक तुमचिया प्रार्थने । स्थिर झाले प्रळय गर्जन । शरणांचे वचन शिव वचन । तया भेद नाहींच ॥२॥ हे मजसी आजी उमजले । तुम्ही जगन्मान्य कारुणिक भले । आम्ही मूढ तुम्हा निंदिले । निंदक निकृष्ट निर्बुद्ध ॥३॥ आम्ही पापी नारकी । हिंसकी घातकी पातकी । कुटिल चेटकी नाटकी । सद्विवेकी रक्षावे ॥४॥ बाळे आम्ही अनवाळ । क्षमा कीजे की दयाळ । ब्रम्हादिका तव अंतराळ । न कळे की स्वामिया ॥५॥ तूचि आमुचा शिक्षा गुरू । दुजा नाही की गुरुवरू । तूचि शंकरा वशंकरू । हा निर्धारू आमुचा ॥६॥ तरी तुम्ही भक्त वत्सल । हा ब्रीद राखिजे सबळ । माता पालन करी बाळ । तैंसे सोज्वळ हृदय तुमचे ॥७॥ पाणियामाजी बुडवी । की दुग्धामाजी बुडवी । वा कर्दमामाजी तुडवी । नाही आडवी काठी तुम्हा ॥८॥ करुणा हृदये बिज्जळराय । किन्नरापदी लोळण घेई । करुणा सिंधु किन्नर देवे । करसरोरुहे राया उठवी ॥९॥ शिवभक्तांसी प्रत्युत्तर । न देई का दुरुत्तर । बसवरायासी कठिणोत्तर । बोलू नको सर्वदा ॥१०॥ सुखे प्रजापालन करी । बोले रायासी अभयोत्तरी । मृतात्मया ते अवसरी । कृपादृष्टी चेतविला ॥११॥ तव तयाचे आप्त जन । आणीक बसवादि प्रथम गण । बिज्जळ भूपादि पुरजन । सत्य शरण हा धन्य म्हणतीं ॥१२॥ किन्नरय्याचे अभिवचने । पुरजन आणि परिजन । सकळी प्रवेशतीं स्वस्थान । रावासह जाण ते समई ॥१३॥ न्याय निष्ठुर किन्नर ब्रम्हा । जीवदया परी महात्मा । सदानंदात्मा । भावीतसे ॥१४॥ ऐसिया शिवशरणाची कथा । श्रवण करितीं जे का तत्वता । प्राप्त होय सायुज्यता । सद्भक्ती चित्ता आणावे ॥१५॥ पतित पावन बसवराज । किन्नरय्यासी नमूनि

सहज । आनंदे जाती निज । मंदिरासी तेधवा ॥४१६॥ ऐसे शिवशरणांचे महिमान । पादुकास्वामी ऐके गहन । पुढतीं बसवलिंग सद्गुरुनी । बसव महिमा ऐके म्हणतीं ॥१७॥ एके दिवशी बसव भानू । अश्वारूढ होवोनि जातीं सुजनु । मार्गींच हरळय्या शिवशरणु । बसव प्रभूसी करीतसे ॥१८॥ शरणु शवणार्थी हरळय्या । द्विवार शरणार्थी करी तया । तव हरळय्याच्या हृदया । वेध लागला शरणार्थींचा ॥१९॥ बसवराये माझ्या शरणार्थींसी । द्विवार केला की अविनाशी । अधिक शरणार्थींचा भार मसी । विशेष झाला कैसा हा ॥२०॥ हरळय्या मनी झाला खिन्न । बसवराये वाहिला भार जाण । शरणार्थींचा भार कैसेन । उतरू म्हणोन गृहा येई ॥२१॥ म्लान वदने बोले सतींसी । बसवराये जात असता शरणार्थींसी । करिता दोन शरणार्थींसी । मजवरी विशेष वाहिले ॥२२॥ ययासी करू मी कायी । कैसा होऊ गे उतरायी । शरणार्थींचा भार पाही । मज यं समयी न सोसवे ॥२३॥ पतींचे ऐकोनि खिन्न वचन । कल्याणी बोले सद्वचन । सत्यचि हा भार जाण । प्रत्युपकाराची फेडवण सुचे एक ॥२४॥ नको नको तयांचा उपकार । भोगावे लागेल जन्मांतर । कैसे हे शिवशरण निर्धार । वचनाचा भार न सोसितीं ॥२५॥ विद्यादानी गुरु उपकारी । मोक्षदानी गुरुची थोरी । माता बाळकासी रक्षण करी । अनंत उपकारी नव्हतीं का ? ॥२६॥ दुष्काळी रक्षण केला । अविवाहितासी धर्मं लग्न लाविला । कसाया हातींची गाय सोडविला । अनंत उपकारी नव्हे का ॥२७॥ तनुमन धने करूनी । उपकार करितीं महाजनी । तयाच्या उपकाराची करणी । कृतज्ञ प्राणी न विसरे ॥२८॥ हरळय्या कैसा निराभारी । एक शरणार्थांसी नसोसे क्षणभरी । सतीं कल्याणी महा चातुरी । समाधान सांगे जीवे भावे ॥२९॥ एका शरणार्थींची कोंड । पडली तुम्हा अवघड । मज सुचला एक सवघड । विचार दृढ परिसावे ॥३०॥ तुमच्या उजव्या मांडीचे चर्म । माझ्या वाम जंघेचे चर्म । दोन्ही कमावू उत्तम । मृदुतर अति शुद्ध ॥३१॥ मग तयासी उत्तम रंगवुनी । करूं तयाचे आयतनी । दोघांचे रूप तयावरी ठेवुनी । लेववू चरणी बसवांच्या ॥३२॥ अहा धन्य झाले शरीर । कैसी सुगरिण गे तू चतुर । मज सुचले नाही तयाचे उत्तर । धन्य सुचरित्र गृहिणी तू ॥३३॥ मग आता कासया विलंब । काढितीं जांघेचे चर्म अविलंब । रंगविले सुरंग कुसुंब । पादुका स्वये रचिताती ॥३४॥ दोरा भरिले जरतारी । मोतीं पोवळ्याचे झालरी । तयार केले अति कुसरी । अवर्णनीय सुंदर ॥३५॥ मृदुल सोज्वळ कोमल । स्पर्श न साहतीं अति निर्मळ । बसवदेवासी साजेल । ऐसे कौशल्य भरियेले ॥३६॥ शुभ्र वस्त्र गुंडाळोनी । म्हणे न्यावेजी कल्याणी । बसवेशाच्या पदकमला लेववोनी । धन्य होउनी या म्हणे ॥३७॥ शुभ्र वस्त्रामाजी पादुका । घेऊनि हरळय्या सुविवेका । गेला बसव मंदिरा हरिखा । पुढती ऐका सुचरित्रा ॥३८॥ बसवराये सामोरे येतीं । हरळय्या पायी लागती । बाहू धरोनि उचलितीं । आलिंगितीं बसवराये ॥३९॥ आळशावरी

श्री. हा.

गंगा ओळली । तैसी परी झाली । शिवशरण माउली । आगमन करोनी ॥४४०॥ तव हरळय्या म्हणती । की दीनाची पुरवा आर्ती । हे पादुका संप्रती । चरणी लेवा कृपाळुवा ॥४१॥ म्हणोनि हरळय्या ते क्षणी । पादुका ठेवी उघडोनी । अहहा ! धन्य झालो जनी । दंडेश घेउनी शिरी वंदी ॥४२॥ तव हरळय्या झाला गार । कैसाजी देवा तुमचा विचार । पादुका घेऊनि शिरावर । नाचता की स्वानंदे ॥४३॥ माझे हृद्गत व्यर्थ झाले । शिवशिव मजला नरकी लोटिले । हा कवण न्याय हो सांगितले । पाहिजे की मूढासी ॥४४॥ अपराधी मी अपराधी । हो उगीच केलो की उपाधी । मज हृदयी झाली व्याधी । आणिक दुजी ये वेळी ॥४५॥ म्हणोनिया हरळ । भुईवरी लोळे रडे खळखळ । शरणार्थीतूनि मुक्त निर्मळ । झालो ऐसे भासले ॥४६॥ परी ते सर्व विचार । फोल झाले साचार । आणिक एक महाघोर । आणोनि संमुख ठेविलो ॥४७॥ थपथपा कपाळ बडवी । काय करू मी या समयी । पादुका शिरी घेवोनि पाहीं । मजला नरकी लोटिलो ॥४८॥ अहा ! हरळा ज्ञानसिंधू । मी तुमचा बाळ तुम्ही करुणासिंधू । माझे वचन ऐका सुबंधू । ऐसा सखेद का होता ॥४९॥ माझियाहूनि लहान कुणी । श्रेष्ठ नसती शिवभक्ताहूनि । तुमच्या चर्माच्या आयतनी । वंद्य असता चरणि केवी लेविजे ॥५०॥ तुम्ही केलो शरीर दंडण । तुमचा उपकार केवी फेडेन । तुमच्या उदरी जन्मून । सार्थ करीन जन्माचा ॥५१॥ हे पवित्र पादुका घेवोनि जावे । मजविषी संशय न धरावे । मातोश्रीसी सांगावे शिवशरणार्थ म्हणोनी ॥५२॥ धन्य धन्य जगन्मान्य । मानवता भेद शून्य । मानवता गण्य पुण्य । अहंमन्य विरहिता ॥५३॥ तुमचेनि शिवधर्म उपवन । फुलले की विविध पुष्पाने । अनेक वृक्ष फल भाराने । पक्व होवोनि लवलेतीं ॥५४॥ कीर कोकिळा झाला सुकाळ । काक घूकासी पडला दुष्काळ । अम्रासी होता पक्व फळ । रोगिष्ठ अमंगळ काक मुख ॥५५॥ हरळय्या साष्टांगे नमून । घेवोनि आज्ञा बसवदेवाकडून । बसव कृतींसी करीत चिंतन । साश्चर्येसी येताहे ॥५६॥ देवदर्शना लागी गेला । देऊळचि अंगावरी कोसळला । पावन होण्या गंगेसी गेला । पापे गुंडाळिले सर्वांग ॥५७॥ तैसी झाली माझी परी । समर्था कवण प्रत्युत्तरी । लहान म्हणती सर्वांपरी । आपणावरी थोरी न घेती ॥५८॥ शिव शिव आता काय करावे । कवणे परी उपकार फेडावे । हे मज उमजेना नवलाव । बसवदेव अघटित केले ॥५९॥ कैसे हो अमानित्व । आणीक पहा हे अहंभित्व । सर्वांहूनि अकिंचनत्व । दासोहत्व परिपूर्ण ॥६०॥ ऐसे अनेक विचार । हरळय्याच्या डोळ्यासमोर । थैमान घालितीं वरवर । तद्गत होवोनि जातसे ॥६१॥ सामोरे येती आमात्य मधुवरस । शरणार्थ म्हणती हरळय्यास । तव शिवशरणार्थ म्हणती आमात्यास । हरळय्यानी तेधवा ॥६२॥ कवण विचार कवण अर्थ । जवळी वस्त्री कवण वस्त । कांहीं नाही जी परमार्थ । पादुका वस्त्रांत असती जी ॥६३॥ दंडनायकाप्रती । देण्यासाठी गेलो

पा. ११

निगुतीं । पवित्र पादुका न्यावे गृहा प्रती । येतो गृहा जावया ॥४६४॥ पाहू हो कैसे पादुका । नका नकाजी घेऊ नका । बळेचि घेतला नका म्हणतीं । हरळय्याच्या कक्षेतुनी ॥६५॥ वस्त्र उकलोनि पाहे मधुवरस । पादुका अभिनव सुंदर विशेष । मोहिला न राहवे विशेष । नको सहवास तयांचा ॥६६॥ ऐसा हरळय्या बोलताहे । अविलंबे पादरक्षांत घातिला पाय । सहस्र इंगळे दंशिता जे ताप होय । हाय म्हणोनि पडताहे भूमीवरी ॥६७॥ गडबडा लोळू लागला । म्हणे ब्रम्हांडा विस्तु लागला । कांहो कोणी लोटिला । अग्नीमाजी मजलागी ॥६८॥ अरेरे नको नको म्हणता । लेविलातीं पादुका तत्वता । हा बसव प्रभूंचा प्रसाद म्हणता । मागे लोटिले मजलागी ॥६९॥ जयांसी शिरी वंदिले बसवराज । तुम्हा लागी कैसे साजे । कृतकर्माचे फळ भोगिजे । निश्चयाने ये समई ॥७०॥ पवित्र पादुकांचा अपमान केला । भोगिजे की प्रतिफळाला । म्हणोनिया निघोनि गेला । हरळय्या स्वगृहा ॥७१॥ हे काय झाले भयंकर । विस्तव पेटला अंगी अनिवार । ताप न साहे क्षणभर । थंडगार पाणी घाला ॥७२॥ आणारे कोणी पाणी । टाका अंगावरी झणी । विलंब करिता यम सदनी । जातो आता लवकरी ॥७३॥ हाय हाय म्हणोनी रडे । गडबडा लोळे मुख मुरडे । काय पाहता रे मजकडे । पाणी तांतडी आणा की ॥७४॥ इतुकियामाजी सेविका । पाणिया जाता पाहिली देखा । कांहो यजमान अति दुःखा । करिता हो कळेना ॥७५॥ अगे काय सांगू तुज कहाणी । कोठोनि तरी आणी पाणी । अंगावरी टाकी ये क्षणी । मरतो ये क्षणी उमजेना ॥७६॥ सर सर सेविका पळाली । घाई ऐकोनि घाबरली । नाहणींतूनचि पाणी आणिली । हरळय्याच्या तेधवा ॥७७॥ धडडड ओती घागर । तव अंग पडले थंडगार । अहा म्हणे गे सुकुमार । पाणी नोहे अमृत पै ॥७८॥ ओहो म्हणोनि मधुवरस । उठोनि बोले सेविकेस । कोठोनि आणिले अमृतास । संजीवास केलीसे ॥७९॥ तरी ते कोठील पाणी । मज दावी का ये क्षणी । कवणाच्या कूपीं आणिले झणी । पवित्र अमृत कुंड ते ॥८०॥ तव ती सेविका महादेवी । बोल ऐकता घाबरली पाही । न जाणोनि आणिले ये समई । सत्य सत्य न बोलवे ॥८१॥ तव थर थरा कांपे दासी । सत्योदक न बोलवे तियेसी । म्हणे माय अभय असे तुजसी । सत्य वदे ये समई ॥८२॥ म्हणे यजमान-वि-विहीर । ह-हरळय्याचे कु-कुंड परिकर । अ-आणिलेस स-सत्वर । भ-भयंकर कष्ट पाहुनी ॥८३॥ हा माये तुझा उपकार । अनंत झाले की मजवर । शतानुशते पाण्याचे घागर । ओतिल्या शांती न झाली ॥८४॥ अहा हरळा सत्य शरणा । मज प्रायश्चित्त घडले की नाना । न जुमानिता तुझिया वचना । पवित्र वहाणा तुडविलो ॥८५॥ जया बसवरायें शिरी वंदिले । तयांसी पापो मी पाये स्पर्शिले । पापाचे प्रायश्चित्त घडविले । मूढा लागी ये वेळी ॥८६॥ अपराधी मी अपराधी । तयांचे गृह दावी आधी । निवारिलीसे महा व्याधी । तया अमृत कुंडा

दावी का ॥४८७॥ मंदिर नव्हे ते कैलास । मज पापीया दावी या समयास । महादेवी म्हणे शरण निष्ठुर विशेष । न दे प्रवेश अलिंगिया ॥८८॥ तव म्हणे मधुवरस । मस्तकी लिंग असे सुविलास । मग चलाजी म्हणोनि ते समयास । मधुवरसास गृह दावी ॥८९॥ मधुवरसे उपायन घेउनी । निघाला करकमळ जोडुनी । हरळय्याच्या द्वारा लागुनी । नमस्कारोनि प्रवेशला ॥९०॥ तव तो हरळय्या शरण । कायकी रमला होता जाण । मधुवरसे फलपुष्प घेउन । साष्टांगेसी नमियेला ॥९१॥ निधूतकल्मषा महानुभावा । विधूत पापा अभवा । शरण मार्गालागी दावा । शिवदीक्षा सुकर्मे ॥९२॥ जिये मार्गी तुमचा वास । ते कारण नोहे का मोक्षास । उगेचि कासया हव्यास । शिवदीक्षेचा करावा ॥९३॥ लोटू नका की अपराध्यास । सर्वास्वी शरण आलो चरणास । उपेक्षू नकाकी दासास । पूर्णत्वास न्यावेजी ॥९४॥ कर्मजाल हे अदृढ नौका । पैल थडी न पावे देखा । शिव दीक्षांग नौका । प्रवेशू द्या दासासी ॥९५॥ न धराकी हा दुस्तर मार्ग । नव्हतीं का आन मार्ग । ययानेचि पावेल भर्ग । हेचि अपूर्व भाविला ॥९६॥ एकेन जन्मना मुक्तीं । वीरशैवा संप्रतीं । इतरेषां शैवाप्रतीं । तया मुक्तीं त्रिजन्मी ॥९७॥ आता दीनासी ये अवसरा । उपेक्षू नकाजी दातारा । शिवदीक्षा करोनि समग्रा । उद्धार करी या समई ॥९८॥ वचन पातकी महा भृष्ट । तुमचिया अमृत वचनासी मी दुष्ट । ओलांडोनिया महा कष्ट । अनुभविलोकी महात्मा ॥९९॥ बाळकाचे सहस्र अपराध । माता मानी ना तयाचा खेद । तैसे तुम्ही विशुद्ध । जगदोद्धारू दयाळू ॥५००॥ तव हरळय्या शिवशरण । भक्तिनिष्ठा परिक्षून । भवितव्यासी जाणून । सकुटुंब लिंग धारण करिताती ॥५०१॥ मग आपुले गृह शुद्ध करून । करीतसे गणाराधन । दक्षिणा तांबूल समर्पून । माहेश्वरा बोळवी ॥२॥ हरळय्याच्या गृहासी । येवोनिया ते समयासी । साष्टांगे नमूनि तयासी । प्रार्थीतसे तेधवा ॥३॥ मज असे एक सुपुत्री । तुमचिया सुपुत्रा जीवन्मैत्री । संलग्न करोनि धरित्री । पावन होऊ इच्छितो ॥४॥ तरी कृपावंत दयानिधी । आज्ञा द्यावी वचन शिद्धी । शरणांगतासी इये संधी । पदरी घ्यावे स्वामिया ॥५॥ हिरकणी कांचासी सम नोहे । सुवर्णा लोह सरी न पावे । काक कोकिळा समान नोहे । विषम-ब्राम्हण अब्राम्हण ॥६॥ तैसे आम्हा तुम्हासी । समता नोहे विवाहासी । उगीच काहो विघ्नासी । आमंत्रिता ये समई ॥७॥ तव म्हणे मधुवरस । सोडोनि स्वर्णपात्रींच्या षड्रसास । चंनय्याच्या अंबकळास । धावोनि गेला पशुपतीं ॥८॥ शिवचि देव अहिंसाचि धर्म । शिव भक्तचि कुलज श्रेष्ठतम । शिव प्रसन्नता जेथे निःसीम । तेचि जाणा कैलास ॥९॥ शिव संनिहित जो जाहला । मुनि श्रेष्ठ जाणिजें तयाला । ब्राम्हण लिंगार्चन हीन झाला । अंत्यजाहुनीं कनिष्ठ तो ॥१०॥

॥ श्लोक ॥ श्वपचोऽपि मुनिश्रेष्ठो यस्तुलिंगार्चनेरतः । लिंगार्चन विहीनोपि । ब्राम्हणः श्वपचाधमः ॥५११॥

मधुवरसा बहुत बोधिता । न ऐके हरळय्यासी तत्वता । जाणोनिया काळाची महत्ता । ईश्वरेच्छा म्हणतातीं ॥५१२॥ तुमच्या मना जे रुचले । तेचि करावेजी वहिले । आमुचा यत्न काय चाले । श्रीमंतांच्या आज्ञेंत ॥१३॥ तथास्तु म्हणोनि परिणय । चारी दिवस संपादिती पाहे । निंदकी बिज्जळा सुचवितीं लवलाहे । विपरीत विवाह म्हणतातीं ॥१४॥ कुणाचा विवाह काय संगतीं । श्रुत करा मंचण्णा निश्चितीं । अहो ! हरळय्याच्या कुमारा प्रतीं । मधुवरसे कन्या दिधली ॥१५॥ मधुवरसे आपुली कन्या । हरळाचा पुत्र कल्याणा । विवाहिले म्हणताना । विपरीत करणी ऐकिलो ॥१६॥ तो तरी चर्मकार । हा वरिष्ठ ब्राम्हण थोर । अब्राम्हणासवे संबंध अविचार । दुर्धर प्रसंग साधिले ॥१७॥ ऐसे हे पापाचरण । कैसे आपंगिले मधुवरसाने । कल्याणी न्यायान्याय शोधणे । झाले कठिण या समई ॥१८॥ सवर्णि यांचा संबंध सोडुन । विवर्णासी समरसणे । हे पातकासी आव्हान । दिले जाण ये समई ॥१९॥ राष्ट्राचं पाप राया शिरी । शिष्याचे पाप गुरुसी आवरी । स्त्रियेचे पाप भ्रतारी । भोगिजं अवश्य ॥२०॥ अहो राया सांगावे कवणा । जिकडे तिकडे शिवशरणांचा भरणा । आम्हा लागी विचारणा । कवणही करीना ये वेळी ॥२१॥ बसवरायांच्या आज्ञे विरहित । करणारकवण ही मात । सूत्रधार खेळविता । खेळतीं बाहुल्या तया परी ॥२२॥ अधिकार संपन्नासी । सांगू नये अनधिकारी वार्तेसी । बुडाले आश्रम धर्म या समयासी । कल्याणामाजी निश्चयें ॥२३॥ म्हणोनि मंचण्णामात्य । इंधनी शिंपिला घृत । नृपाग्नी पेटला अमित । कच्चे पक्के जाळीतसे ॥२४॥ राव कोपाविष्ट होउनी । आज्ञा करी दूता लागुनी । जैसा असेल तैसा या क्षणी । आज्ञापिजे बसवेशा ॥२५॥ दूते जावोनि ते क्षणा । कळवितातीं राजाज्ञा । तत्काळ येण्यासी सभांगणा । करिती आज्ञा भूपतीं ॥२६॥ तथास्तु आलो म्हणूनी । कळविजे भूपा लागुनी । दूते सांगतीं येउनी । येतातीं हो दंडेश ॥२७॥ कागासीं कारभार देणे । दरबार विष्ठेने भरविणे । ययामाजी काय उणे । तैसे म्हणे भूपती ॥२८॥ झाली सीमा कर्तव्याची । न्यायान्यायी संप्रती । शरणांच्या कर्तव्या प्रती । सीमा नाही उरलीसे ॥२९॥ इतुकियांत येती बसवराज । राव रागा रुद्र होवोनि सतेज । कल्याणी स्वराज्य । शिवशरणांचा निश्चय ॥३०॥ आजि माझ्या अनुभवा आले । कनिष्ठासी वरिष्ठे संबंध जोडिले । परी कर्तव्य विपरीत भले । पाहिले ना ऐकिले ॥३१॥ तुम्ही राजसेवासक्त । करावे राजकारण यथार्थ ! आणीक हा अयथार्थ । धर्म कारणही चालविले ॥३२॥ लोकी दृष्टांत न मिळे । ऐसे नीच कार्य आरंभिले । वेद विरहित झाले । नाही का हे विवाह ॥३३॥ तरी हा वेद बाह्य वर्तन । आचरावे कवण । याचा न करिता परिमाण । मना जोगे आचरितां ॥३४॥ तुम्हीच निर्मिलो ऐसे शास्त्र । सनातन धर्म हे अशास्त्र । पुण्य पाप धर्माधर्माचा विचार । कवण सांगणार तुम्हासी ॥३५॥ अर्कक्षीर गोक्षीर । समान कैसे विष अमृत

परिकर । हें कर्तव्यचि पाप घोर । ऐकणे पाहणे आम्हासी ॥५३६॥ तरी ज्ञान्यासी हे नसाजे । कां हंसे कांजी सेविजे । पोटासाठी
जाइजे । पतिव्रता परद्वारी ॥३७॥ तुमचाचि हा सद्बोध । शरणी आचरितीं अनिबंध । आम्हासी वाटतो हा दुर्बोध । कीजे निबंध
ययासी ॥३८॥ वचन ऐकोनि रायाचे । म्हणतीं बसवेश निजवाचे । ऐकोनिया वचन निंदकाचे । ज्ञानीसाच न बरळतीं ॥३९॥ अधिकारियांचे
वचन । बापुडे करावे लागे सहन । नको म्हणता बळे जाण । केले दान कन्येचे ॥४०॥ आणीक ऐकाजी सद्विचार । सांगेन तुम्हासी
परिकर । शिव पूजक हा सुविचार । हा निर्धार शास्त्राचा ॥४१॥ शिव पूजक हा कुलीन । शिव दीक्षे पवित्र जाण । त्यांसी संबंधित
जाण । तोही जाण शिव दीक्षित ॥४२॥ ऊंच कवण नीच कवणं । याचा करावा निर्धारण । देवामाजी परशिवचि ब्राम्हण । नारायण हा
क्षत्रिय ॥४३॥ वैश्य म्हणतीं विधीसी । शूद्र म्हणती पाक शासनासी । हा वर्णभेद देवासी । कल्पिलेसे वेदाने ॥४४॥ चतुर्वर्णी जे जन ।
त्याचेचि सांप्रदायीक जाण । हा वंश परंपरा जाण । संबंध जनी सांगतीं ॥४५॥ आदि कुल ब्राम्हण । जन्मताचि शूद्रवर्ण । मौंजी बंधने
द्विजन्म । वेद पठणं विप्र तो ॥४६॥ ब्रम्ह जाणे तोचि ब्राम्हण । ऐसा असे हा प्रमाण । हा सुविचार शोधन । करावे की सज्जनी ॥४७॥

॥ श्लोक ॥ ब्राम्हणो भगवान् रुद्रो क्षत्रियः परमो हरिः । हिरण्य गर्भो वैश्यस्या द्देवेंद्रो शूद्र उच्यते ॥५४८॥
जन्मना जायते शूद्रो कर्मणा द्विजउच्यते । वेद पाठेन विप्रास्तु ब्रम्हं जानाति ब्राम्हणः ॥५४९॥

ऐसे शिवागमे बोलती । सुविचारे काय कीजेतीं । वर्ण न जाणता क्षितीं । होय क्षति अपार ॥५०॥ न विचारता दूषण । देणे हे अश्लाघ्य
जाण । म्हणता ययासी दुर्वर्तन । अनुचित दोषारोपण न कळे ॥५१॥ शास्त्री सांग बहु प्रकार । रूढीसी काय करणार । आता मी
पाहूनि घेणार । राज्यभार सर्व ही ॥५२॥ अपराधियासी बलाउनी । विचार करीन या क्षणी । मज न साहे ऐसी करणी । अविचाराची
अवद्ध ॥५३। म्हणोनि तया मधुवरसासी । आणिक हरळय्या शरणासी । बोलवा म्हणोनि दूतासी । आज्ञा करी तेधवा ॥५४॥ बसवराये
भविष्य जाणितले । इहलोक यात्रा पाहिजे संपविले । म्हणोनिया सभास्थान त्यागिले । गृहासी न गेले बसवेश ॥५५॥ नगरा
बाहेरी जाउनी । उभे असतीं कप्पडीच्या मार्गी ते क्षणी । माचिदेवा बोलाउनी । सांगतातीं गुजगोष्टी ॥५६॥ राहू नये यया नगरी ।
जाईन कप्पडी लागी सत्वरी । गुरुमाईच्या चरणी ये अवसरी । समरस व्हावे वाटते ॥५७॥ आपण मागे राहुनी । पाहोनि घ्यावी राजाची
करणी । धाकुटा आहे चन्नबसव जनी । नागमांबा ही स्त्री जात ॥५८॥ तया लागी धैर्य द्यावे । जंगमार्चन चालवावे । इच्छितार्थ पुरवावे ।
माहेश्वरांचे ॥५९॥ राव शरणासी शिक्षा करील । मग आपण सुरक्षित कैसा राहील । भक्तांसी हिंसा करील । भक्ते साहती ते कैसे ॥६०॥

हिंसेसी जो कारण होय । हिंसेसी का पात्र नोहे । शिक्षा केली पाहिजे आहे । अपराध्यासी ते क्षणी ॥६१॥ शिवनिंदा शिवभक्त निंदा । आणिक हिंसा आपदा । पाहू नये ऐकू नये कदा । गणाचारी शिवभक्त ॥६२॥ शिक्षा करोनि दुर्जनासी । यावे तुम्ही औटमासासी । म्हणोनि पतिव्रता नीलांबेसी । बोलावण्या पाठविती ॥६३॥ तव पडिहारी जाउनी । माता नीलांबेसी नमूनी । करकमळ जोडुनी । आज्ञा बसवेशाची निरोपी ॥६४॥ नीलांबा वचन ऐकोनी । पडिहारिसी म्हणे तये क्षणी । कां संगमेश ये स्थानी । नाही तेथेच असे का ? ॥६५॥ म्हणोनिया स्वेष्ठ लिंगी । अनीमिष दृष्टीने आलिंगी । ऐक्य झालीसे अविरळांगी। प्राणलिंगी नीलांबा ॥६६॥ पडिहारी पाहुनी । चकित झाला ते क्षणी । बसवा नीलांबेची करणी । सांगोनी धन्य म्हणतसे ॥६७॥ बसवराज तया म्हणती । दावी का ती संगती । तव पडिहारी इष्टलिंग घेवोनी हातीं । बैसला क्षितीं अनुमिष ॥६८॥ लिंगदेवीं दृष्टी समरसली । लिंग समरसले मनस्थळी। चित्तवृत्ती लीन झाली । लिंगदेवी तत्क्षण ॥६९॥ दृष्टी सृष्टी समरसले । नाद नादी लीन झाले । ज्योतिषां ज्योतिरेक झाले। लिंगामाजी ते समई ॥७०॥ पाहोनिया बसवराज । म्हणतीं या गोष्टी नोहेती सहज । संगमेशाची कृपा लाहिजे । तवचि सहज साध्य हे ॥७१॥ मग बसवराज ते क्षणी । अश्वारूढ होउनी । जातीं संगम क्षेत्र लक्षुनी । मनोवेगेनी तेधवा ॥७२॥ पवित्र सुक्षेत्र संगम । तेवि जाण त्रिवेणी संगम । पश्चिम मार्गे तत्क्षण । महाद्वारा जावोनी नमिताती ॥७३॥ अंतर्गृही जाउनी । साष्टांग प्रणिपात करोनी । विनवणी करी ते क्षणी । संगमेशा भवनाशा ॥७४॥ चंद्रशेखर व्योमकेश । विधिवासव रमाधीश । पूजिती चरण कमळास । अविनाश महेश ॥७५॥ गंगातरंग उत्तुमांगा । विधुमित्र वसुनेत्र शुभ्र भसितांगा । करुणा सागर सदयांतरंगा । करी भवभंगा माझे आता ॥७६॥ दुरित तम विनाश पूष । परम पावन चित्प्रकाश । सुज्ञान घनकोश । सेनानी तोष उमाधीशा ॥७७॥ नागभूषण नागचर्म वसना । नागारी गमन नयनार्चित चरणा । नागनाथा नगजा रमणा । नामा नामा तीत तू ॥७८॥ जगद्गुरो जगदाराध्या । जगद्रक्षण त्रिकांडवेद्या । तूचि एक जगत्पिता । जन्ममरणा विरहित ॥७९॥ ऐकोनि बसव भानुचे स्त्रोत्र । प्रकट होवोनिया त्रिनेत्र । पुलकित झाले शुभ गात्र । बसवा हृदयी धरियेले ॥८०॥ आम्ही जया कार्या पाठविले । ते कार्य संपूर्ण झाले । जंगम दासोही तृप्त केले । सचराचर प्राणिया ॥८१॥ तनुमन धन निर्वंचने । जंगम प्राणी जगन्मान्य । सेवा केलासी अगण्य । धन्य धन्य जगदात्मा ॥८२॥ बसवराया तुजविणे । असतीं कवण सांगे मज कारणे । बंधुबांधव तूचि संपूर्ण । जगद्रक्षण कर्ता तू ॥८३॥ माझिया आज्ञेसरिसे । वर्तलासी सुविलास । ऐसा कवण आज्ञांकित महीस । निर्विशेष तूचि मज ॥८४॥ ममात्मा माता पिता । बंधु भगिनी सुत भ्राता । तुज मज भेद पाहता । सुगंध शुभ्रता कर्पुरापरी ॥८५॥ तव संगमेशें हृदय कमळी ।

*लीन केले बसवेशा ते वेळी* । देव दुदुंभी वाजविती अंतराळी । सुरवर पुष्पे वर्षिती ॥५८६॥ कर्पूर ज्योतिसी स्पर्शले । नामरूपा विरहित झाले । नाद गगनी सामावले । सागरी समरसले सरिता पै ॥८७॥ जळगारा जळी मिळाले । तैसीच परी झाली वहिले । देवभक्त ऐक्य झाळे । नाम रूपा विरहित ॥८८॥ पर शिवचि नाम भेदे करूनी । लोकोद्धारा मर्त्या लागुनी । नरलोक सुरलोक अभेद म्हणोनी । वचन करणी दाविले ॥८९॥ जंगम दासोह वाढविला । इष्टार्थ सर्व पूर्ण केला । दुष्टासी शिक्षिला । शिष्ट जना रक्षिला स्वसामर्थ्ये ॥९०॥ अनेक महात्मा ते दाउनी । लिंगनिष्ठा प्रतिष्ठापुनी । त्रिविध लिंग अनुष्ठानी । त्रिविध अर्पणी त्रिविध प्रसादी ॥९१॥ त्रिविध लिंगी स्वयं संगी । लीन झाला संगम लिंगी । भेद भाव त्यागोनि अंगलिंगी । निःसंगी संगमी समरसला ॥९२॥ देवही नाही भक्तही नाही । नवलाव झाले ते समई । व्यक्ताव्यक्त दोनही । एकवटले ॥९३॥ धन्य धन्य बसवराया । धन्य धन्य भक्ति काया । धन्य धन्य जंगम प्राणिया । काया माया विरहित ॥९४॥ तुमचिया अगम्य महिमाने । पवित्र झाले पापी लोचन । देव भक्तांचे ऐक्य पण । घडले दर्शन दीनासी ॥९५॥ झाले जन्माचे सार्थक । जन्मांतरीचे पुण्य विशेष । म्हणोनि देव भक्तांचा समरस । पाहिलो की ये नेत्री ॥९६॥ ऐसे म्हणोनि शिवगण । आणिकही सद्भक्त शिवशरण । झालो म्हणती पावन पावन । जन्मा येऊन सार्थ झाले ॥९७॥ आता ऐका सिंव्हावलोकनी । हावगिलिंगा श्रोतृ मुखानी । काय घडले कल्याणी । चित्त देउनी ऐकावे ॥९८॥ तव मडिवाळ माचिदेव । बसव मंदिरा जाती स्वये । सच्चिदानंद बसव । संगमी ऐक्य जाहले ॥९९॥ ही वार्ता ते क्षणी । चन्नबसव नागांबा ऐकुनी । मूर्छित पडले धरणी । आणिकही शिवगणी । शोक सागरी बुडाले ॥६००॥ मडिवाळ चकित होउनी । म्हणती चन्नबसवा लागुनी । भविष्यकाळा लागुनी । अगत्य विचार करावे ॥६०१॥ तयासी सोडुनी ताता । सर्वही साधिजे का लिंगैक्यता । उठा सावध व्हा आता । पुढलिया अर्था उमजावे ॥२॥ तव चन्नबसव नागांबा । दुःखे म्हणती अविलंबा । आम्ही महा पापी स्वयंभा । जातां नाही भेटले ॥३॥ चन्नबसवासी दासोह चालविजे । म्हणोनि मज सांगितले गुज । तरी शेष मस्तकीचे ओझे । वाहील का अळीने ॥४॥ गजावरील भार । अज वाहील का निर्धार । सहस्र किरणाचे प्रकाश थोर । काजवा सरी करी काय? ॥५॥ तैसा बसवदेव दासोह रचिला । त्रिजगही सरी न करवे त्याला । तरी मज कैसा निरवोनि गेला । साधेल मजला कैसेनी ॥६॥ नागांबा चन्नबसव । दुःख सागरी बुडती सर्व । कैसे निर्दय हो बसवदेव । निर्मोह झाले आम्हासी ॥७॥ दोघे ऐसे दुःख करिती । मातुळ नव्हती पिता निश्चिती । कल्याण हे आम्हा प्रती । कवणे रीती संबंध ॥८॥ कैसे दासोह कैसा अनुभव । महात्मे दाविलो अभिनव । कल्याणीचे वैभव । गेले सर्वस्व तुझ्या सवे ॥९॥ तव माचिदेव म्हणती । होणार ते न चुके

श्री. हा.

कल्पांतीं । जातस्य मरण निश्चितीं । बसवदेवचि बोलिले ॥६१०॥ जितुके प्राणी जन्मा आले । दरिद्र भूपति विलया गेले । तेचि मार्गी जाऊ सकळ । उदयीक आजी न म्हणवे ॥११॥ तरी आज्ञापिले कार्यासी । प्रवर्तावे दासोहासी । साह्य करीन तुम्हासी । सेवेसी सादर असोनी ॥१२॥ मडिवाळे सांतवुनी । गेले स्वाश्रमा लागुनी । ऐका उन्मत्तांची कहाणी । बिज्जळाची ॥१३॥ बोलवा बोलवा म्हणे तयासी । आरक्त नेत्रे ओकी कोपाग्नीसी । हरळय्या मधुवरस आले सभेसी । बोले तयासी गर्जोनी ॥१४॥ हा नव्हे की स्वयं राज्य । यासी बिज्जळ असे अधिराज । भोगितो मी साम्राज्य । वर्णाश्रमा अनुसरुनी ॥१५॥ तुम्हासी भृष्ट स्वराज्य । चालविण्या अधिकार नाही सहज । केलिया कर्मांचे फळ आज । भोगिजेल द्वयानी ॥१६॥ तव मधुवरस म्हणे । कन्या रत्न माझे धन । इच्छिल्यासी करितो दान । तुमचे राज्य पण यांत कैंचे ॥१७॥ परधन की परस्त्री अपहरण । हिंसा की चोरिले सुवर्ण । केलिया पापाचरण । राज्यी भोगणे आपदा ॥१८॥ या गोष्टी मान्य नाही । स्वातंत्र्य तुमचे असे पाही । राजाज्ञा नुल्लंघवे इही । मरण हेचि महा नवमी ॥१९॥ आता तुमचे ऐकणार नाही । शिक्षेसी पात्र झालो ये समई । बुबुळे काढोनि लवलाही । बांधोनि वृषभा पायी ओढवावे ॥२०॥ तथास्तु म्हणोनी दूत । वृषभ चरणा बांधोनि तया प्रत । राजमार्गांतुनी सांप्रत । पिटवोनिया लाविती ॥२१॥ वृषभ उद्धरोनि कैलासा गेले । कैलासाहूनि विमान आले । शिवगणी विमानी बैसविले । सकुटुंबासी तेधवा ॥२२॥ शिव शिव नामे गर्जतीं । दशविध वाद्ये वाजवितीं । जय जय महादेव म्हणोनि समस्तीं । कैलासा जातीं आनंदे ॥२३॥ कल्याणी सकळ शिवशरण । राये केले की अन्योन्य । म्हणोनि दुःखित होउन । स्वस्थाना लागून जातातीं ॥२४॥ तैसेचि जगदेव मल्लिबोम्मय्या । हळहळत येतीं स्वगृहा । येताचि विचारी माया । अनुचित कार्या कां केले ॥२५॥ तव बंधु हाय म्हणोनी । बैसतातीं खिन्न होउनी । बिज्जळे हिंसा केली धरणी । शिवशरणांची आजि पैं ॥२६॥ शिव शिव द्रोहाना काय बोलता । शिवशरणांची हिंसा न ऐके आता । तुम्ही ऐकिलो पाहिलो तत्वता । शिवद्रोही दुष्टाना ॥२७॥ तयाचा कष्ट पाहुनी । कैसे उगी राहिलो रे दुर्जनी । लाज नये का बोलाया वचनी । शिवद्रोही तुम्हीच ॥२८॥ गुरुचर हर निंदा । आणिक हर भक्तांची निंदा । तत्काळ शिक्षिजे निंदको तदा । ना तरी स्वशिरच्छेदा करोनिया घेइजे ॥२९॥ ना तरी स्थान त्यागणे । अयोग्य असे की ऐकणे । ऐसे आगमी प्रमाण । सांगे शंकर गौरी प्रतीं ॥३०॥ तरी मज्ञ द्रोहा पाहुनी । कैसे आलांरे निर्लज्ज मनी । कैंव्हाचि शिरच्छेदोनी । येता धन्य म्हणते की ॥३१॥ ऐसे न करिता शिव द्रोही । स्वजीव रक्षोनि आलो पाही । आणिक पतनांही । सांप्रता की दुर्वृत्त ॥३२॥ आता गृहामाजी तुम्ही न यावे । श्वानांसारिखे अन्न खावे । माचिदेवासी विचार करावे । संमुख न राहावे माझिया ॥३३॥ माये आम्हा अपेश आले । जेवू घाली की ये वेळे ।

ली. अ. ७

दुष्टासी शिक्षा करोनि भले । येऊ नसता न जीवू ।।६३४।। नाही नाही गृहामाजी । येऊ न दे मी तुम्हा आजी । बाहेरचि टाकि ते जेवा सहजी । श्वाना परी येथवा ।।३५।। वीर माता तैसीच करी । बाहेर टाकिते की भाकरी । मौनेचि जेवोनि ते अवसरी । कटि बांधोनि निघाले ।।३६।। असिलता घेवोनि हाती । रौद्रावतारे बंधु निघती । माता भगिनीसी नमस्कारिती । अभय घेती तयांचा ।।३७।। जगदेव मल्लिबोम्मण्णा । येती बसवरायाच्या सदना । नमस्कारोनी शिवगणा । द्रोह्याच्या दंडणा आज्ञा द्या म्हणती ।।३८।। आजि औट मासा पर्यंत । अधिकार अमुचा असावे जागृत । आपुली आज्ञा म्हणोनिसांप्रत । येती गृहा प्रत तेथवा ।।३९।। येवोनि मातेसी नमस्कारिती । माचिदेवाज्ञा श्रवणी घालिती । ऐकोनि माता संतोषती । आनंदे असती निकेतनी ।।४०।। तिकडे मंचण्णा बिज्जळासी । सांगे दंडेश निर्गमिले संगमासी । ऐकताचि मुखांतिल तांबूलासी । टाकोनी भूमीसी पडे भूप ।।४१।। धबधबा हृदय बडवोनी । घेई रपरपा कपाळ पिटवोनी । दुःखाब्धींत गेला बुडोनी । लोळे धरणी अस्त व्यस्त ।।४२।। हायरे माझ्या दंड नायका । नीतीवंता प्रजापालका । ऐकोनि निंदकांच्या वाक्या । प्राणसख्या तुज दुरावलो ।।४३।। आता कैचे मज प्रभुत्व । तुझेनि मजसी होते महत्व । आता मी झालो निःसत्व । गेले अस्तित्व भाग्याचे ।।४४।। वंचिलो नाही तुज लागी । सर्वाधिकाराचा तू भोगी । तुझी आज्ञा मज लागी । मान्य होते की आमात्या ।।४५।। द्वादश दिवस दिनकर । स्तंभोनि देता गणित साचार । नाही त्रिलोकी प्रत्युत्तर । आता कां दूर लोटिले ।।४६।। तुम्ही जे कार्य केले । तयासी का नकार दिलो । तुमच्या सन्मार्गा संतोषलो । कांहीं अपेक्षिलो नाही की ।।४७।। विशाल राज्याची चिंता । तिळभरी नव्हती मज तत्वता । प्रजाजनांची स्वस्थता । ठाईच बैसोनि चालविशी ।।४८।। तुज ऐशा सत्य संधरत्नासी । गमाविलो की अपेशी । गृहा येता कामधेनूसी । अविचारेसी दवडिलो ।।४९।। आमात्य नव्हतासी चिंतामणी । मी दरिद्र पाप खाणी । लोटिलो की अन्नपणी । तुज ऐसा ज्ञानखाणी । न मिळेची जन्मवरी ।।५०।। काय बोलिलो दुरुत्तर । म्हणोनी केलासी कठिण अंतर । मज न भेटता परस्पर । दुरावलासी जन्मभरी ।।५१।। ऐसे गुण वर्णूनि भूभुज । दुःखे रडे आठवोनि बसवराज । गुणनिधि बसवा तुम्ही मज । अंतरलोकी दंडेशा ।।५२।। आता पुढती राज्य शकट । चालेविणार कवण सुभट । तुज समान सुज्ञानी वरिष्ठ । कैसा मजसी भेटेल ।।५३।। बसवरायांच्या सद्गुणा । आठवोनि शोकाकुल क्षणक्षणा । तेथेचि होता कोंडिमंच्चणा । रायासी आठवणा देतसे ।।५४।। राया आता स्थिर व्हावे । पुढलिया विचारा सोंचावे । भांडारींचा भाच्चा चन्नबसव । महा अनुभवी असे ।।५५।। सकल विद्या प्रवीण । राजकार्य धुरीण । तया ओपिजे राजकारण । मज आठवण होतसे ।।५६।। राय चित्ती स्थिरावला । मंच्चणासी म्हणे तये वेळा । ही मात रुचलिया

आपणाला । जाऊ चला बसव मंदिरा ॥६५७॥ तव मंच्चणादी आमात्यांसहित । राव बसव मंदिरासी येत । रायाचे आगमन पाहोनि त्वरित । येती सामोरे चन्नबसव ॥५८॥ येताचि रायासी आलिंगून । एकमेका शरणार्थ करून । येतीं अंतर्गृहा कर धरोन । सिंव्हासनी बैसवितीं ॥५९॥ बसवरायाचे निर्गमन । राया झाले एकांगपण । मीचि सांत्वन करून । तुम्हा भेटावया आणिलो ॥६०॥ तरी पुढती राजकारण । तुम्हासीच सोपावे असे रायाचे मन । मंचण्णा चन्नबसवा लागुन । श्रुत केला सर्वांही ॥६१॥ तव चन्नबसवेश बोले वचन । जेणे भूभार घेतले उचलोन । तयाची साम्यता मज समान । अज्ञान कैसा करील ॥६२॥ जयाची महिमा अगम्य अपार । तो केवल द्वितिय शंभूचि साचार । कारण पुरुष तो सुविचार । गणाचार परिपालक ॥६३॥ तया मज अजगजांतर । मज चालविणे नोहे राज्यभार। बिज्जळ म्हणे ऐसा अधीर । होऊ नका सर्वथा ॥६४॥ जन्म जात द्वणा । सर्वांगी सुगंध जाणा । आपुल्याहूनि अनुभवी ये क्षणा । आहेत कवण सांगाजी ॥६५॥ म्हणोनिया भूवर । पुढे ठेवी अहेर । दुशाल किरीट सुंदर । राजमुद्रेसहीत ॥६६॥ एवढी विनंतीं मान्य करावे । बसव परंपरा चालवावे । भंडारीची कीर्ती राखावे । प्रजेमाजी निरंतर ॥६७॥ भूप बिज्जळाचे वचन । चन्नबसवे ऐकोन । आनंदे स्वीकारी प्रावर्ण । शिरपेंच काश्मीरी दुशाल ॥६८॥ गजराजासी श्रंगारिले । चन्नबसवासी बैसविले । अनेक वाजंत्रीसह ते वेळे । चन्नबसवा मिरवितीं ॥६९॥ मग राज मंदिरी प्रवेशून । सिंव्हासनी चन्नबसवा लागुन । कर धरोनि बिज्जळे ते क्षण । दक्षिण भागी बैसविला ॥७०॥ परिजन आणि पुरजन । आणिले असतीं अहेर बहुमान । धन कनक वस्त्र भूषण । चन्नबसवेशा अर्पिती ॥७१॥ सकळ पुरजनांसी तेधवा । राव म्हणती श्रवण करावा । आजिचे शुभ दिनी चन्नबसवा । आमात्य पदी स्थापिले ॥७२॥ सर्वाधिकाराची मुद्रा । करांगुलींत ठेवितीं गुणसांद्रा । सर्वत्री मिळूनी राज्यसूत्रा । यथास्थितीं चालविजे ॥७३॥ ऐसी आज्ञा देऊनी । पाठवी निज मंदिरा आमात्या लागुनी । जावोनि नागांबिसी नमूनी । शरण गणा पाचारितीं ॥७४॥ शरणासह माहेश्वरा । साष्टांगे नमिती ते अवसरा । आमंत्रोनिया चरवरा । दासोहा स्वीकारा म्हणतातीं ॥७५॥ तव निज मंदिरा येउनी । रत झाले जंगमार्चनी । षड्रसान्ने रसरसायने करोनी । तृप्ती करिती माहेश्वरा ॥७६॥ तांबूल दक्षिणा देऊनी । साष्टांग नमस्कार करोनी । प्रार्थना करी शांत मनी । कर जोडोनी चन्नबसव ॥७७॥ मी तरी अपराधी । क्षमा करा ज्ञाननिधी । बसवरायांची दासोह विधी । मज दयानिधी केवी साधेल ॥७८॥ मी तरी आहे दुर्बळ । करुणा सागर तुम्ही अचळ । बसव भंडारियाची सरी करवेल । कैसे पामरा सांगिजे ॥७९॥ जंगमांचे गळगर्जन । जंगमांचे निष्ठुरपण । इच्छित भोगासी पुरविणे । पामराचेनि कैंसे घडे ॥८०॥ श्रीमंतासी वेडा जन्मला । म्हणोनि का टाकिती त्याला । एवढे अपराध पोटी घाला । दासोहाला

साह्य व्हा ॥६८१॥ अनेक माहेश्वर येती । आनंदे जंगमार्चनी रमतीं । चन्नामात्यांची सेवा निगुती । स्वीकारितीं आनंदे ॥८२॥ ऐसे दासोहाचे क्रम । चालवितीं निःसीम । माहेश्वरांसी अति प्रेमे । तनुमन धने सेवितीं ॥८३॥ माता नागांबा सुविचारी । दासोहासी साह्य करी । मागे राहूनिया सकळ परी । निरवीतसे साहित्य ॥८४॥ एके दिनी चन्नबसव । सायं सभेसी जातीं वैभवे । तव मडिवाळ देवे । येवोनिया भेटती ॥८५॥ मल्लिबोम्मय्या जगदेवा प्रती । उभय बंधूसी बोलाविती । श्रेष्ठ नवीनांबरा देतीं । करांगुळी मुद्रिका रत्न खचित ॥८६॥ कमरेसी कमरपट्टे बांधितीं । शिरी शिरपेंच घालितीं । सुवर्ण दिवटया पेटवितीं । चन्नबसवा जवळी राहिजे ॥८७॥ राव आपुल्यो जवळी । राहविता राहिजे युगुळी । साधिजे कार्यासी ये वेळी । समयोचित ॥८८॥ तथास्तु आपुली आज्ञा म्हणोनि । चन्नामात्यांसवे जातीं ते क्षणी । राये बैसवितीं अर्ध सिंव्हासनी । चन्नबसवा ते समई ॥८९॥ कवण हे तुमचे चर । कैसा दिवटयांचा प्रकाश सुंदर । कर कमळी धरिले सूर्यचंद्र । प्रकाश अपार जयांचा ॥९०॥ हे आले हो कोल्हापुराहूनी । राहविलोकी सज्जनी । मग इच्छित वेतन देऊनी । राजसदनी राहविजे ॥९१॥ ययांचा ऐसा असे ठराव । मागताक्षणीं । वेतन द्यावे । आजि उदयीक न म्हणावे । द्यावे लागेल तत्काळ ॥९२॥ मजसी का धनाचा दुष्काळ । जव मागतीं तव देईन तत्काळ । तयांच्या मनोदयासी अमळ । उभं रहा म्हणेना ॥९३॥ यापरि तयांसी राहविले । कार्यक्रम आटोपता ते वेळे । चन्नामात्य गृहा आले । संतोषेसी तेधवा ॥९४॥ त्रिकाळी लिंगार्चन । प्रेमे करितीं अनुदिन । चर दासोहा लागुन । तत्पर असती सर्वदा ॥९५॥ इच्छित भोजन दान दक्षिणा । अर्पण करितीं माहेश्वराना । हा बाल बसवचि वाटे सज्जना । धन्य म्हणतीं शिवशरण ॥९६॥ भक्ति भंडारी बसवराज । ज्ञाननिधी चन्नबसव सहज । भक्ति ज्ञानांचा ओघ सहज । दासोहामाजी समरसला ॥९७॥ धर्म कारण आणि राजकारण । चालविला बसवेशा प्रमाण । राजकारणी महा विचक्षण । प्रजापाळणी दक्षता ॥९८॥ न्याय नीती भक्ति प्रीतीं । शांतीं क्षमा दया चित्ती । प्रसंगावधानी वीर वृत्ती । निर्वैर चालवितीं राज्य शकट ॥९९॥ ऐसे एकशे आठ दिन । सुसूत्रे चालविले राजकारण । रायासी वाटे समाधान । चन्नबसवा पाहूनी ॥७००॥ दुजे दिवशी शिवशरण । येतीं बसव मंदिरा लागुन । आगामी विचार संपूर्ण । माचिदेवा विचारितीं ॥७०१॥ जाहली सकळांची संमतीं । आले सर्वही ऐक्याप्रतीं । जगदेव बोम्मय्यासी निरवितीं । आजिचे रातीं शिक्षिजे ॥२॥ सायं सभा विसर्जून । रायासी पाठविता मंदिरा लागुन । राजमार्गी मागावे धन । साडे तींन मासाचे ॥३॥ वचन भ्रष्ट झालीया । शिक्षा कीजे तेचि समया । आजीच कार्यक्रम ठरवोनिया । समयानुसार करावे ॥४॥ ऐसी आज्ञा घेउनी । द्विबंधु जातीं सेवे लागुनी । चन्नबसवेश लिंगार्चनी । स्थिर होतीं ते समई ॥५॥ रथामाजी समग्र । धनधान्य वस्तु भरोनि

परिकर । शरण समूहासी सत्वर । पाठविती बाहेर नगराच्या ॥७०६॥ तैसेची माहेश्वरा पाचारुनी । आजिचे रात्री उळवी लागुनी । प्रयाण असे की महाजनी । सर्वांही अगत्य चलावे ॥७॥ जयांसी येण्याची अपेक्षा । सर्वे चलावे निरपेक्षा । नाही तरी स्वापेक्षा । राहिजे हो स्वस्थानी ॥८॥ स्थिरावल्या माहेश्वरा लागुन । विपुल देवोनि धनधान्य । आपण करिताती प्रयाण । उळवी लागोन तये क्षणी ॥९॥ इकडे मल्लिबोम्मय्या जगदेव । राजसेवेत जाती द्वये । तटस्थ राहती तव । बंधुरत्वे दोघेही ॥१०॥ सायंकाळीचे काय उरकुन । स्वगृहा जाती आमात्य जन । तव राव सिंव्हासन उतरता क्षण । सेवक जन हस्त धरिती ॥११॥ नरवर बैसला नरवाहनी । मृत्यु हंसे नरवरा पाहुनी । याची नरवाहनी बैसुनी । येईल यमसदनी नरवर ॥१२॥ पालखीमाजी बैसुनी । राव जातसे अंतःपुरा लागुनी । ग्रामाच्या मध्यभागी होन्नम्मा शरणी । गृहा सामोरे पातले ॥१३॥ पालखीसी खाली उतरोन । द्यावे म्हणती आमचे वेत्तन । राजमार्गी देणे घेणे । विपरीत म्हणे बिज्जळ ॥१४॥ मागता क्षणी देईन धन । हा तुझा नाही का वचन । भ्रष्ट झालासी वचना लागुन । हे विपरीत कवणा सांगावे ॥१५॥ काय पाहसी रे बोम्मय्या । छेदी शिर पाप्याचिया । वचन भ्रष्टांसी या समया । पाठवू यमाचिया सदनासी ॥१६॥ सोज्वळ दिवट्यांच्या कठारी घेउनी । भोंसकिती ततक्षणी । हिंसक राव लोळे अवनी । करचरणाते बडवितसे ॥१७॥ आमुचे पण जिंकिलो । शिवद्रोहिया शिक्षा केलो । जन्मा येवोनि पावन झालो । द्रोह्या पाठविलो यमसदना ॥१८॥ जयजयकारे गृहा येती । हाःहाःकार झाला नगरा अंती । रायासी वधिले विश्वास घाती । मल्लिबोम्मय्या जगदेव ॥१९॥ आले बसवरायांच्या सदना । मडिवाळा सांगती स्वकवना । सफळ केलो मातेची आज्ञा । म्हणोनि शिवगणा नमिताती ॥२०॥ कर उर शिर तिन्ही । छेदिलो कां नाही तुम्ही । कर चरणादि छेदुनी । आताचि येऊ म्हणताती ॥२१॥ झाले तेचि बरे । पुनरपि नोहे तुमचेनि रे । मीचि जातो रे । येची क्षणी ॥२२॥ चन्नबसवादि शिवगणा सहित । निर्गमन करा उळवी प्रत । त्रुटि न लाविता सुपंथ । क्रमावेहो ये समई ॥२३॥ तयासी आज्ञा देउनी । माचिदेव आला नृपा समीप तये क्षणी । लोक थव्यांचे थवे राया भोउनी । हाय अन्याय म्हणताती ॥२४॥ अजा मांदीत व्याघ्र शिरतो । गज मांदीत सिंव्ह उडतो । राजमार्गातुनी बोभावत । मडिवाळ आला राया जवळी ॥२५॥ अर्ध प्राणी नृपासी । हृदयी पाय देवोनि त्यासी । हिंसका अन्याये शरणांसी । शिक्षा केलासी देहांत ॥२६॥ अनुभव मंटप उपवना लागुन । टोळधाड झालासी तू दुर्जन । अरे भक्तांची हिंसा पाहुन । शिवशरण उगे न राहती ॥२७॥ पाप्याचे प्रथम कर छेदावे । म्हणोनि कर चरण छेदी स्वये । पोट फाडीतसे निर्भय । वीरावेशे तये क्षणी ॥२८॥ तेथूनि येतसे वीरभद्र । कोणी न यती समोर । गर्जना करी महादेव हरहर । आकांत वर्तला नगरांत ॥२९॥

माचिदेव सैरावैरा । धांवत ये महाद्वारा । चन्नबसव नागांबेसी ते अवसरा । थांबविले द्वारपाळ ॥७३०॥ वामपादे द्वारपाळासी । लाथाडी माचि क्रोधेसी । महाद्वार कवाटानिशी । पडतीं भूमीसी द्वारपाळ ॥३१॥ तव महाद्वार ओलांडुनी । जाती शिवशरण माचिदेवानी । इकडे कल्याणी राजसदनी । हाहाःकार मातला ॥३२॥ राणीसह आप्तजन । आक्रोशे पडती भूमी लागुन । रायाचे खादोनिया लवण । अन्योन्य वर्तन केले हो ॥३३॥ अन्याये हिंसा करण । हे महापाप अनीतीं जाण । जन्म जन्मांतरी भोगणे । लागेल की हिंसा ही ॥३४॥ तव महा संतप्त होउनी । रुदन करितीं आप्त जनी । पुरजन परिजनादि तये क्षणीं । दुःख सागरी बुडाले ॥३५॥ इंदु धराचा भक्त जाहला । दोष नसे कां तयाला । अहिंसक शिवधर्माला । म्हणत होतो कल्याणी ॥३६॥ अहिंसकचि हिंसा केले । सम्राटासी वधिले । यासी निमित्त कवण हे न कळे । ज्याचे सुख दुःख त्या ठावे ॥३७॥ तव रायाच्या कुणपासी । करितीं अंत्य संस्कारासी । तव जामातृ बिज्जळासी । दुःखे बोले मंचण्णा ॥३८॥ घळघळा रुदन करी । रायाचे गुण वर्णोनि ते अवसरी । अन्यायी शिवशरण दुराचारी । घोर कृत्य केले की ॥३९॥ तुमच्या आश्रया राहोनी । स्वेच्छे राज्यभार चालवोनी । शेखी सम्राटा वधोनी । गेले की हो कृतघ्न ॥४०॥ तरी आता उगीच बैसणे । क्षत्रिया नव्हे कां लाजिरवाणे । घेवोनिया सकल सैन्य । पाठलाग करावे ॥४१॥ बिज्जळाच्या वंशी जाण । आणिक नसतीं तुम्हावीण । पुढतीं राज्यसूत्रे आपण । निर्वाहावे लागतीं ॥४२॥ राहिलो जरी स्तब्ध । बरोबरीचे राजे हंसतीं सबंध । बिघडला बिज्जळाचा प्रबंध । धुरंधर भूप गेला म्हणतीं ॥४३॥ तरी तुझा हा अपवाद । काढोनि टाकी निर्विवाद । आज्ञा कीजे अबाध । सैन्यालागी ये वेळी ॥४४॥ सैन्य घेवोनि जाई सत्वरी । शिवशरणांचा पाठलाग करी । मिळता क्षणी संव्हारी ! कृतघ्न घातकी पाप्याना ॥४५॥ कीर्तीने भरी भूमंडळ । राज्यभार चालवी सरळ । न बैसावे सचिंत ये वेळे । रण भेरीसी वाजवी ॥४६॥ उठी आता लौकरी । मागे पुढे विचार न करी । घेवोनि दळभार सत्वरी । संव्हारी का शरणासी ॥४७॥ गज तुरग रथ पदातीं । चतुरंग सैन्य शिद्ध जाहले निगुतीं । जामातृ बिज्जळे त्वरित गतीं । येई शरणा सवे युद्ध करावया ॥४८॥ दोन तीन मुक्काम क्रमून । शिवशरणांचा पाउलाग करितीं जाण । धरिले शिवशरणा लागुन । सैन्यासह ते समई ॥४९॥ तया पाहुन शिवशरण । शाप देतीं सैन्या लागुन । पाषाण झाले सकळ सैन्य । शाप बळे तये क्षणी ॥५०॥ मडिवाळादि चन्नबसवेश । स्थापिले तेथे बसवंश । सकळ शिवशरण आले त्या समयास । गणाराधनेस करिताती ॥५१॥ म्हणतीं भक्त समुदाय उघे उघे । चांगुभला म्हणोनि हाणितीं घे । जयजयकारे पुढतीं मार्ग । क्रमितातीं तेधवा ॥५२॥ तेथोनीच दंड गुंड बसवेश । नामे प्रसिद्धी आळी प्रांतास । बहुत महिमा चालतो या समयास । बसवेशाच्या सुक्षेत्री ॥५३॥ तव चंद्रभागेचिया

पैलतींरा । जातीं शिवशरण ते अवसरा । कल्लिनाथाच्या सुक्षेत्रा । हिप्परिगे ग्रामा जातातीं ॥७५४॥ कल्लिनाथाचे दर्शन घेतीं । तेथेही गणाराधना करितीं । माहेश्वरा सन्मानितीं । चन्नबसवा बोलतीं मडिवाळ ॥५५॥ आता मजसी आज्ञा द्यावे । कल्लिनाथामाजी ऐक्य व्हावे । ही सदिच्छा पूर्ण करावे । शिवशरण जनी ॥५६॥ आता मी जाईन कैलासा । आपण उळवीसी जावे सहसा । तव शिवशरणो नमोनि मडिवाळेश । कल्लिनाथामाजी समरसला ॥५७॥ जयजय कल्लिनाथा कलिमल हरणा । जय कमलावर नेत्रकमल पूजित चरणा । जयजय अंधक मर्दना । भवभय हरणा भूतेशा ॥५८॥ आता वेळ न । लाविता हृत्कमळी देई स्थान । ऐसा वीर शरण । प्रार्थीतसे कल्लिनाथासी ॥५९॥ तव मडिवाळासी प्रत्यक्ष होउनी । कल्लिनाथे तत्क्षणी । निज हृदई सामावोनी । घेतलासे तत्काळ ॥६०॥ आकाशी सुरवर । पुष्पवृष्टी करितीं परिकर । देव दुंदुभी वाजवितीं सुस्वर । धन्य धन्य म्हणोनी ॥६१॥ नागांबा चन्नबसव । आणीक गणवृंद सर्व । जातीं कप्पडीसी लाघवे । संगम दर्शना आनंदे ॥६२॥ मलप्रभा नदींत । स्नाने करिती समस्त । लिंगार्चना करोनि तेथ । संगमनाथा पूजितीं ॥६३॥ गणाराधना आरंभोनी । तृप्त करितीं पंच पक्वान्नी । तांबूल दक्षिणादि देऊनी । संतोषवितीं माहेश्वरा ॥६४॥ तेथोनि हर निरोप घेउनी । प्रयाण करितीं उळवी लागुनी । यल्लापुर मार्गे शिवगणी । जाता चन्नबसव बोलती ॥६५॥ आमुच्या सवे येणार । तयीं हस्त करावे वर । म्हणोनिया आपुले कर । उचलितीं वर ते क्षणी ॥६६॥ तेव्हां पासोनि तया ग्रामा प्रती । मेलुगैयल्लापुर म्हणती । उरले शिवगण निश्चितीं । समाधी घेतीं मल प्रहरी ॥६७॥ मग तेथे स्थापोनि द्वय मातुरा । षोडशोपचारे पूजितीं त्वरा । तिथोनि जातीं कृष्णेच्या तींरा । स्नाने करितीं तींरांत ॥६८॥ स्वानंदे लिंगार्चन करिती । लिंगार्पित प्रसाद उपभोगितीं । मलप्रभेच्या पैलतींरा जातीं । चन्नबसवादी प्रमथ गण ॥६९॥ मग पैलतींरी वास करिती । सप्त दिन तेथेचि रमतीं । मृण्मय धूपारत्या रचितीं । प्रत्येकानी तेधवा ॥७०॥ आणितीं कोमल बिल्वदळे । विविध पुष्पे सोज्वळे । लिंगार्चना करितीं प्रेमळ । भक्ति बळे करोनी ॥७१॥ मग त्रिविध प्रसाद सेवुनी । अनुभवी रमतीं सुज्ञानी । प्रयाणाची तयारी करोनी । चालतीं शिवगणी उळवीसी ॥७२॥ जाता जाता धूपारतीं । राशी करोनिया ठेवितीं । वल्मीक वाढले तया वरुतीं । बहुसाल ॥७३॥ हुत्तिन गुडी म्हणोनी । प्रसिद्ध झाले नाम जनी । पुढतीं रक्कस तंगडगी लागुनी । जातीं तये क्षणी शिवशरण ॥७४॥ तेथील एक राक्षसीण । चन्नबसव चरणी घाली लोळण । तुम्ही राहिलो जरी इये स्थानी । मजला राहणे असाध्य हो ॥७५॥ कर जोडोनि येई काकुळतीं । चन्नबसवेश तिसी म्हणती । आम्ही जाऊ पुढती । राही निश्चित येथे तू ॥७७॥ दुर्बळ सबळ कवणही येती । छळू नको तया प्रती । जे या स्थानी येती । ते अर्पितीं एक फळ ॥७८॥ ऐसा

राक्षसीला देवोनि अभय । चालती पुढे चन्नबसव । घोरारण्य प्रवेशुनी तव । गुहागारा रचितातीं ॥७७८॥ चन्नबसवांची गुहा एक । दुजी नागांबेची सुरेख । भस्माचे कणज आणिक । गो गुहा एक रचिताती ॥७९॥ रुद्राक्ष मंटप रचितातीं । हरळय्याचे कुंड स्थापिती । आणिक एक रचितीं गुहे प्रती । तया म्हणतीं महागवी ॥८०॥ ऐसे विनोदे गुहा रचिले । नित्य जंगमार्चनी रमले । शिवानुभवी समरसले । शरणां सहित ते ठाई ॥८१॥ तेथील एका शमी वृक्षासी । विनोदे झोंपाळे बांधिती । बैसवोनि एकेका शरणा प्रती । झोके देतीं चन्नबसव ॥८२॥ आनंदे शिव वचन गातीं । मग तत्काळ शिवगण येतीं । येणारासी बन्नी म्हणतीं । स्वागत शब्द हे कानडी ॥८३॥ तयांसी यानी म्हणती बन्नी । ययांसी त्यानी म्हणतीं बन्नी । शिवशरण सर्वांही विमानारूढ होउनी । आनंदे जातीं कैलासा ॥८४॥ चन्नबसवादि प्रमथ गण । विश्वपतीसी करितीं नमन । तव बसवादि प्रमथ गण । चन्नबसवासी हृदयी धरिती ॥८५॥ परमेश म्हणतीं चन्नबसवेश्वरा । येई बाळा चित्कळावतारा । मम वचन मानोनि सुविचारा । लोकोद्धारा गेलेतीं ॥८६॥ शिवधर्मांचे उद्धार करून । शिवभक्तींसी दृढ स्थापून । दुष्ट जना दंडोन । शिष्टांसी रक्षण केलोतीं ॥८७॥ ऐसे अघटित कार्य करून । जगी शिवभक्ती प्रसारून । केलोती पुनरागमन । आनंदाने निजपदा ॥८८॥ मज अत्यानंद जाहला । येई प्रिय बाळा चित्कळा । म्हणोनि चन्नबसवासी ते वेळा । हृदयामाजी दृढ धरिले ॥८९॥ तुम्ही स्वतंत्र शिवगण । चारी मुक्ती तुमच्या आधीन । अमृता हारी होऊन । सुखे चरणी असावे ॥९०॥ ऐसे अभय कर वरदानी । प्रमथ गणांसी निरवोनी । कृपा दृष्टी अवलोकुनी । चरणी स्थिर राहविले ॥९१॥ ऐसे बसवादि प्रमथांचे चरित्र । तुज निरोपिलेकी पवित्र । तरी हावगिलिंगा सुचरित्र । श्रवणे पवित्र होई का ॥९२॥ अगाध शिवशरणांची महिमा । वर्णू न शके हरि ब्रम्हा । आदि शेषाही सीमा । नगमे महिमा असीम ॥९३॥ नर मानवा कैसे साध्य । प्रमथ गणांची महिमा अगाध ! गुरु कृपे बोलिलो की शुद्ध । भक्ति भंडारीच्या महिमेसी ॥९४॥ बसवादि प्रमथांचे सुचरित्र । शिवधर्मांचे बीज पवित्र । श्रवण करितीं जे सत्पात्र । इष्टार्थ सर्वत्र पावतीं ॥९५॥ महाजनांचा सुमार्ग । धरावे सुजनी तोचि मार्ग । प्रस्थापिला जरी स्वमार्ग । तरी ते आडमार्ग पतनी घाली ॥९६॥ तरी प्रमथ गणांचिया मार्गे । तूही जाई सवेगे । दासोहं भावे वागे । बसवादि प्रमथा समान ॥९७॥ मग तू होसी जगत्पूज्य । अभय असे माझा तुज । रक्षण करील वृषभध्वज । हावगिलिंगा बाळका ॥९८॥ आद्यांचे वचन । परीस जाण तू ज्ञान घन । तू होसील परिपूर्ण । शिवानुभवी जगांत ॥९९॥ म्हणोनिया पादुका स्वामी प्रती । बसवलिंग गुरू आज्ञापितीं । भक्ति साम्राज्य निश्चिती । भोगी सदैव म्हणोनी ॥८००॥ सकळ देश संचरोन । येती स्वाश्रमा लागून । सुखे असता एक दिन । अघटित वर्तमान घडले की ॥८०१॥ मठाचे टाक भिन्न झाले । म्हणती आमुच

आयुष्य सरले । तव तटाकी उडी मारिले । जलसमाधी घेतले गुरुवर्य ॥८०२॥ तयाचिया लिंग देहासी । मठी समाधी केले साहसी । पादुका स्वामी आपुले परंपरेसी । चालवितातीं गुरुवाज्ञे ॥३॥ हा सप्तमोध्याय सुमधुर । बसवलीलेचे हे सार । श्रवण करिती जे सद्भक्त चतुर । मोक्षाधिकारी होतातीं ॥४॥ त्याग भोग योग । त्रिवेणी संगम सुयेःग्य । महा पर्वणीचा सुयोग । दवडू नये सुज्ञानी ॥८०५॥ इतिश्री श्रीहावगिलिंग लीलामृत । श्रवण मुखे प्राशन करा सद्भक्त । होताल जन्ममरणा विरहित । बसवलिंग विनवित भालपुरीचा ॥८०६॥

इतिश्री हावगिलिंग लीलामृते बसवराज निर्गमन बिज्जळ दंडण । चन्नबसवादि उळवी प्रयाण । माचिदेव लिंगैक्य । बसवलिंग गुरू जलसमाधी वर्णनं नाम सप्तमोध्यायः

श्रीगुरू हावगिलिंगार्पणमस्तु । श्रीगुरूबसवलिंगार्पणमस्तु । मंगळ महा श्री श्री

सप्तमोध्याय संपूर्ण

पादुक स्वामी लागी ग्रामाधिपती आणीक मरि जाणा । बाधितीं मत्सर भावे साधुनिया तप करी गर्व हरणा ॥१॥ श्रीगुरुचे पवित्र चरण । भवबंधनासी लवित्र जाण । शरणांगतासी उच्छाहपूर्ण । आत्म सुख करण सर्वदा ॥२॥ मरण भयासी उत्तरण । अज्ञान तम सहस्र किरण । ऐसा जो तरुणारुण किरण चरण । हृदय मंदिरी पूजिले ॥३॥ कोणी सप्त सागरी नाहोनि आला । म्हणे महत पुण्य मज घडला । तरी गुरुलिंग जंगम पादोदकाला । सहस्रांशाला सम नोहे ॥४॥ पाप पंकासी शोषक । ज्ञानाग्नीसी उद्दीपक । ऐसे विचित्र गुरु पादोदक । संसार द्रुमनाशक जो ॥५॥ तया पवित्र जंगम पादोपके । इष्टलिंगा कीजे अभिषेक । तत्प्रसादचि लिंग नैवेद्य विशेष । दुजे पदार्थ अनर्पित ॥६॥ तया पादोदक प्रसादे करून । लिंग नैवेद्य आणिक स्नान । येथे विकल्प करिती जे अजाण । म्हणती शिवगौरीसी ॥७॥ येथे असे अहंता । की मी गुरु जंगम कनिष्ठ तत्वता । लिंगदेव सर्व श्रेष्ठ असता । तीर्थं कैसे अभिषेकिजे ॥८॥ गुरुलिंग आणि जंगम । एकचि परशिव झाला भिन्न । मूळीचा तो असे अभिन्न । अहंता त्यागुन पूजिजे ॥९॥ कनडींत पडकोळ्ळुवदु शब्द । प्राप्त करून घेणे हा अर्थ शुद्ध । तो पादोदक विशुद्ध । भक्ताचे प्रसिद्ध जाणावे ॥१०॥ तो अर्पण करी जंगमासी । विनये नमस्कारोनि पादोदकासी । कीजे लिंगाभिषेकासी । सेविजे जंगम सद्भावे ॥११॥ मग नमस्कारोनि अति प्रीती । तैसेचि सेवेंजे सद्भक्तीं । मी तू पणाची द्वंद्व संसृतीं । विच्छेदिले पादोदके ॥१२॥

॥ श्लोक ॥ पूज्य पूजक योरस्मिन्नेकत्व प्रतिपादितः । पूज्यो पूर्वेऽपि स्वीकृत्य पूजकोऽपि ततः परं ॥१३॥

पूज्य पूजकामाजी । एकत्व प्रतिपादिले सहजी । पूज्ये स्वीकारिजे आधी । अनंतरे पूजक ॥१४॥ हे माझे पादोदक । ते तुझे पादोदक । मी तू पणाचा अभिमान निष्टंक । गेला पाहिजे सर्वस्वी ॥१५॥ अहंभावासी टाकिजे । चिदामृत लिंगा अभिषेकिजे । परमामृत म्हणोनि सेविजे । होइजे समरस निरहंकारे ॥१६॥ येथेचि समरसला वीरशैव । त्यागिला असे गुरुशिष्य भाव । गुरुलिंग जंगम सर्व । आले एकत्र पादोदकी ॥१७॥ ते हे पादोदक पवित्र महान । सकल जगासी उद्धरण । जेणे करोनि अभेद दर्शन । घडे मानव प्राणिया ॥१८॥ ऐशा पुण्यतम पादोदकासी । करोनि अभिषेक पान धारणासी । मुक्त होऊ या समयासी । अहंकारासी जाळुनी ॥१९॥ श्रोतीं असावे सादर । कथा श्रवणी निरंतर । मनासी करोनिया स्थिर । पुढिले सुविचार ऐकिजे ॥२०॥ द्रोणापुरीचे मठामाजीं । पादुका स्वामी राहतीं सहजीं । गुरुलिंग जंगमासी पूजीं । नित्यनेमे करोनिया ॥२१॥ धन कनक वस्त्राभरण । करिती गुरु जंगमासी अर्पण । दासोह चालविती अनुदिनी ।

मठामाजी आनंदे ॥२२॥ मठी दासोहा कारण । व्यय होतसे अमित धन । नसता काढोनि ऋण । नित्यनेम चालविती ॥२३॥ स्वामींचे पाहोनि सदाचरण । माचिदेव शट्टी देसाई जाणा । वेगळे गट करोनि करिती मंत्रणा । म्हणती स्वामीना ऋण भारी ॥२४॥ मठाचे सर्व धन धान्य । व्यय करिती निःसंशेन । मूषका लागोनि धान्य । मिळनासे केलेतीं ॥२५॥ संचारा जाती स्वभावे । मठासी येता ऋण भरावे । ऐसा जरी स्वामींचा स्वभाव । लाविती राख मठासी ॥२६॥ ऐसा हा अपव्यय । आम्हा लागी कधी न साहे । तुम्ही यजमान पाहे । विचार घ्यावे स्वामींचा ॥२७॥ दुजे मरिदेव मिळोनी । देसाईसी सांगतीं करणी । तंव ते तिरस्कार वचनी । स्वामी लागुनी मत्सरती ॥२८॥ निंदकांचे पाहोनि वर्तन । अधिकचि दासोह चालविती ते क्षण । हे पाहोनि चिडले मरिदेव जाण । दारिद्र्या अवतण दिले म्हणतीं ॥२९॥ ऋणभार झालिया मठासी । कोण राहतो परदेशी । भीक मागोनि पोटासी । भरणे हेचि सुदैव ॥३०॥ ऐसे म्हणोनि जन समस्त । स्वामींसी निंदितीं अस्तव्यस्त । नाना परी अपवादे त्रस्त । स्वामी लागी केलेती ॥३१॥ धन धान्य संग्रह करावे । यथेष्ट मिष्टान्ने तृप्त व्हावे । मठी एकटेचि असावे । पडोनि राहावे मंचकावरी ॥३२॥ कोणी अतिथी अवेळी आला । मठांत काय असते म्हणोनि त्याला । जा म्हणे भक्तांच्या गृहाला । झोंपाया जरी आला जागा न मिळे ॥३३॥ जप नाही तप नाही । विद्यार्जन तरी मुळीच नाही । केवळ खादाड मठीचा मांजर पाही । सदाचरणही सोडिले ॥३४॥ यया दुर्गुणा विरहित । हावगि स्वामींचा चरितार्थ । भक्ति ज्ञान वैराग्यासहित । काळ क्रमिती दशवर्षं ॥३५॥ निंदक समूही काकांच्या । कोकिळांस रहिवास कैंचा । स्वामींसी झाला साचा । सहवास निंदकांचा पुरेपुरे ॥३६॥ मूढांमाजी वावरणे । ज्ञानियांसी न होय जाण । षड्भ्रमांत रमले जे जन । ते निवारण कोण करी ॥३७॥

॥ श्लोक ॥ अज्ञः सुखमाराध्य सुखतरमाराध्यते विशेषज्ञ। । ज्ञान लव दुर्विदग्धं ब्रम्हापि नरं नरंजयती ॥३८॥

निरक्षरी उद्यमी अज्ञान । साधु सत्पुरुषांचे मानी वचन । तैसाचि जाणता विशेषज्ञ योगी । लक्षणा मानितो ॥३९॥ आपुल्यासी सूज्ञ म्हणवे । विशेषज्ञांचे ऐकेना । चतुर्मुख बोधिताही समाधान होईना । तो हा जाणा त्रिशंकु ॥४०॥ आता पुरे दुर्जनांची संगती । म्हणोनि द्रोणपुरासी त्यागितीं । साधूसी सुखे न राहविती । मूढ वृत्ती लौकिक ॥४१॥ मद गजांचे गंडस्थळी । मधुकरे रुंजी घाली । गजे-कर्णे ताळे निवारिली । जावोनि राहिली कमळ वनी ॥४२॥ तेथे तया कमळांचा मकरंद । सेवोनि राहिले सुखद । मठा बाहेर पडता स्वामींचे पद । मठ नाव हास्यास्पद गुरुविणे ॥४३॥

॥ श्लोक ॥ दानार्थिनी मधुकरा यदिकर्णतालैः दूरीकृता करिवरेण मदांध बुध्या । तस्यैव गंड युगमंडन हानिरेषा । भृंगाः पुर्नविकच कुंज वने वसंति ॥४४॥

पक्षी सुंदर नीलकंठ । पक्षा उपटिता झाला सपाट । तयाच्या पिशे शोभिले मुकुट । देवता लोक ॥४५॥ तैंसे जाहलेजी येथ । निवारिता मत्सरी समस्त । स्वामींच्या सवे जात । ऐश्वर्य सर्व मठाचे ॥५६॥ स्वामी जाती देशांतरी । सद्भक्त जन विचार करी । कैसे मूढ आम्ही अविचारी । शिवयोगी सदाचारी दवडिलो ॥४७॥ जेजे वेळी जेजे होय । तेते मुकेनि पाहावे । अज्ञ जनांसी काय सोय । सुज्ञानी तो निराळा ॥४८॥ सत्पुरुष परिस त्यागिलो । नीच गारास अपंगिलो । येथे आम्ही चुकलो । मूर्खजन ॥४९॥

॥ श्लोक ॥ यद्भावी तद्भवति नित्य प्रयत्नतोपि । यत्नेन चापि महती नभवत्यभावी ।
एवं विधातृ वश र्वतनि जीवलोके । किं दु:ख मस्ति पुरुषस्य विचक्षणस्य ॥५०॥

जेथे नाही विद्या लाभ । आणिक नसे द्रव्य लाभ । आत्म्यासी सुख न भेटे सुलभ । ते स्थळ अशुभ त्यजावे ॥५१॥ कोठे तरी गमन करावे । तरी देवे दिधले पाय । कवण ग्रामासिही जाय । मार्ग स्वये आढळत ॥५२॥ कुठेही दातृ जन असती । कासया करावी खंती । जो भावी त्रिभुवना प्रती । स्वदेश आपले म्हणोनी ॥५३॥

॥ श्लोक ॥ यत्र विद्यागमो नास्ति यत्र नास्ति धनागमः । यत्र आत्म सुखं नास्ति । नतत्र दिवसं वसेत् ॥५४॥
पदाः संतिपथाः सति दाताः संति क्वचित्क्वचित् । विस्तीर्ण पृथ्वीःसंति किमर्थं दुःख भाजनम् ॥५५॥

भुकेजलिया असतीं भिक्षान्न । तान्हेजलिया कूप तटाक पूर्ण । शयनासी देवालये जुने । मल्लिकार्जुन आत्म संगी ॥५६॥ फलहीन वना पक्षी त्यजितीं । लांचाळू राया प्रजा तिरस्कारितीं । जेथे सिंव्ह शार्दूलांची वस्तीं । परस्त्रींच्या संगतीं कुग्रामी ॥५७॥ तेथे नसतो ज्ञान्यांचा आवास । दुःखितांचाचि भरणा विशेष । जेथे भूत प्रेतांचा रहिवास । सूज्ञ त्या ठायास उपेक्षी ॥५८॥ दुश्चितासि काय कारण । जेथे मानासी नाही स्थान । तया ठाई वास करणे । अवास्तव जाण ज्ञानिया ॥५९॥ क्रियामूर्ती आणीक भृत्य । घेवोनिया सांगाते । अटवळी ग्रामाच्या संमुखांत । धर्म शाळेत वसताती ॥६०॥ तेथे क्रमिले वर्ष दोन । येती चक्रकोटीसी तेथोन । तिथे बायम्मा नामी शरणी । जंगम प्राणी दासोही ॥६१॥ राहती तेथे हावगिलिंग । दासोह चालविले अभंग । येती भक्त जन सुसंग । महिमा अगाध प्रसरला ॥६२॥ नित्य दासोह वाढू लागला । प्रांतींच्या जना आनंद झाला । अयाचिते दासोहाला । येई सकळ साहित्य ॥६३॥ मिथ्या दंभ कपट दुर्गुण । सत्य वस्तूचे किडे जाण । जे बीज तापले ज्ञान रवि किरणे । कीटकाभिन्न झाले ते ॥६४॥ बायम्माही महा ज्ञानी । असे ती ही निर्वचक शरणी । अवगुणी की शिवगुणी । सर्वांत्तर्यामी शिव पाहे ॥६५॥ एके दिनी पूजा अर्पण । सकळही झाले संपूर्ण । पहुडले

माहेश्वर भक्तगण । तस्कर जन मठी येतीं ॥६६॥ निष्कामी बायव्वा जाग्रत । काय पाहिजे म्हणे वस्त । इथे आहेतीं धनधान्य समस्त । न्यारे इच्छित बाळानो ॥६७॥ ऐसे बोले तस्करासी । माहेश्वर दडले सेजेसी । बायम्मा म्हणे माहेश्वरासी । लेकरांसी पाहोनि भिता का ॥६८॥ जे आहे ते देवोनि टाका । उगीच संग्रह करू नका । तुम्हासी देणार परमेश्वर देखा । करू नका संशय ॥६९॥ जळो जळो ही द्रव्याशा । कधी न सोडी दुराशा । सर्वही सावरून देते सहसा । तस्करें नेती सुखाने ॥७०॥ महाद्वार ओलांडोनि जातीं । चोरांची नेत्र झाली भिंतीं । मार्ग न दिसे क्षितीं । अडखळोनि पडतीं लवणांत ॥७१॥ नकोरे बाप्पा दासोह धन । शिक्षा घडली आम्हा लागुन । माता बायव्वा सत्य शरण । त्यांचे धन परि शुद्ध ॥७२॥ चला मागे फिरू आता । ज्यांचे त्यासी अर्पू वस्ता । हा अपहार अपराध घडला तत्वता । शिवशरणांच्या धनाचा ॥७३॥ माघारे आले फिरून । साष्टांगे नमितीं बायव्वा लागुन । बाळकांचा अपराध मातेन । क्षमापन कीजे ये समयी ॥७४॥ तुमचे दासोहाचे धन । कैसे होईल आम्हा पचन । आमुचेही घ्यावे धन । म्हणोनि सर्वार्पण करितातीं ॥७५॥ मग तयांचे नैत्र प्रकाशले । अज्ञान तिमिर पळाले । गृहा जावोनि ते वेळे । धन आणोन देती बायव्वासी ॥७६॥ अपराधी अपराधी म्हणोनी । जातीं नमस्कार करोनी । निःस्वार्थी बायव्वा शरणी । महिमाग्रणी विरागी ॥७७॥ ऐसे अनेक महात्मा । दावोनि गेली बायम्मा । समाधी बांधिती सप्रेमा । तियेवरी सद्भक्त ॥७८॥ तिचिया समाधीवरी । लिंग पूजा करितीं भक्त माहेश्वरी । मग तेथे हावगिर्लिंग ते अवसरी । जपानुष्ठान आरंभितीं ॥७९॥ कांहीं दिवस झालियावरी । शरणी आली स्वप्नांतरी । खाली अरथी असता वरी । अनष्ठान साधेना ॥८०॥ असावी नदीचां थडी । वटवृक्षाची झाडी । आणि लिंग देवाची गुडो । त्रिकूट संगम जाणावे ॥८१॥ ऐशा सुस्थाना जाउनी । अनुष्ठान कीजे सज्जनी । फल प्राप्तींही तये स्थानी । हांत असे साधका ॥८२॥ तैसेचि होवो म्हणून । स्वामी निघतीं तेथोन । शांडिल्यपुर नदी काठी जाण । लिंगस्थान शोभिवंत ॥८३॥ तया स्थानी षण्मास । तप करितीं निराश । पावले इष्टार्थ सिद्धीस । पादुका स्वामी तये स्थळी ॥८४॥ शेवटी जंगमार्चन करोन । विसर्जन करावे अनुष्ठान । म्हणोनि दीर्घाचला दूता पाठवून । भक्त माहेश्वरा कळवितीं ॥८५॥ स्वामींची आज्ञा मानुनी । भक्त माहेश्वर येतीं तक्षणी । मग सुचविती स्वामीनी । जंगमार्चन सत्कार्या ॥८६॥ ऐकोनिया सद्भक्त वृंद । गुरु वचनी झाले सुखद । साहित्य आणविती अगाध । जंगम तृप्तीं कारणे ॥८७॥ अनेक मिष्टान्न करून । गणाराधना केले संपूर्ण । माहेश्वरां देती दक्षिणा दान । मुखशुद्धीसी तांबूल ॥८८॥ ऐसे सर्वोपचारे करून । तृप्त होती माहेश्वर गण । आणिकही भक्त वृंद थोर सान । गुरु प्रसादे तृप्त होती ॥८९॥ तव दीर्घाचळीचे भक्त माहेश्वर । आज्ञा मागती सत्वर । शिव बसप्पा मोदी उदगीर ।

या विरहित सर्वां आज्ञा देती ।।९०।। मोदी बसप्पा आणि मठपती । स्वामीच्या सेवेत राहती । द्रोणापुरीचे मरिदेवा संप्रती । स्वामीची महती न ऐकवे ।।९१।। तव दुराचारीं मरी । कपटे पाठविती भृत्या सत्वरी । तुम्हीं जावोनि ये अवसरी । स्वामीचे करचरण छेदावे ।।९२।। दुर्जनाचे वचन । दुर्जना होय मान्य । स्वामींचे लक्षुनी स्थान । अपरात्रीसी येताती ।।९३।। स्वामींच्या परिसरी येती । वाट नाही दिसे क्षितीं । पावले सकळी अंधत्वा प्रतीं । निरुपाय जाहले ।।९४।। अडखळोनि पडती भूवरी । धडका देती वृक्षा सत्वरी । आता नाहीरे उरली उरी । सद्‌गतींची या क्षणी ।।९५।। आम्ही महापापी चांडाल । ऐकोनिया दुर्जनाचे बोल । सत्पुरुषा चिंतिलो अमंगळ । हिंसा कर्म तयासी ।।९६।। आतारे कैसे करु । म्हणोनि फिरती दुराचारू । रवि उदय पावला सत्वरु । पळती तस्करू द्रोणपुरा ।।९७।। महाजनासी छळीले । रात्रौ आमुचे डोळे गेले । ठेंचा लागोनी बोटे गेले । कपाळ फुटले दगडासी ।।९८।। ऐसी आमची दुर्दशा झाली । तुमच्या दुराचारा सीमा नुरली । त्रासविता गुरुमाउली । मंदमती हो अविचारी ।।९९।। तव सद्‌भक्त म्हणती ते वेळा । सज्जना परदुःखाचा कळवळा । दुर्जनासी संतोष झाला । परदुःखासी तळमळ वाटे तया ।।१००।। दुर्जियासी दुःख होय । कावळ्यासी संतोष पाहे । स्वामींचा उत्कर्ष तेहे । दुर्जन कैसे साहती ।।१।। धोरी असो की मरी असो । तुमचा पाड काय तयास । ऊस चरकी पिळिल्यास । रस विशेष मधुर दे ।।२।। चंदनासी तोडोनी । चूर्ण करिती मर्दुनी । अग्नीत टाकिता तयालागुनी । सुगंधाने प्रांत भरी ।।३।। पुण्यवंते अरण्यी बैसला । अष्टभोग मिळती त्याला । अष्ट दरिद्री गृही निजेला । यथारण्य तथा गृह ।।४।। तैसा आहे स्वामींचा महत्व । घेऊ नये त्यांचा सत्व । डोईचा धोंडा पायावरीं स्वये । टाकिता पाय मोडेल ।।५।। तैसे स्वामींचे अंतर दुखविणे । तेचि सर्व नाशासी आमंत्रण । पुनश्च ऐसा दुराचरण । आम्हालागी न सांगा ।।६।। सज्जनाचा ऱ्हदय नवनीत । कविजन वदती ते असत्य । दुर्जियांच्या तापे सज्जन तापत तैसा नवनीत द्रवेना ।।७।।

।। श्लोक ।। सज्जनस्य ऱ्हदयं नवनीतं । यद्वंदति कवयस्तदलीकं । अन्य देह विल सत्परितापात् । सज्जनो द्रवति नो नवनीतम् ।।१०८।।

दारु चर्म होय भाता । दारुसी जाळी प्रथम भाता । मागुती पंचलोहा तत्वता । जाळोनि पाणी करीतो ।।९।। तैसे सज्जनाची कोपाग्नी । जाळी वंश वल्ली तत्क्षणी । हा विचार अंतरी जाणोनी । भक्त माहेश्वरवागावे ।।१०।। पातकाचा धोंडा कंठी बांधोनी । मूढ पैल थडी जातो मानीं । जळालिया चुनखडी घेउनी । मूर्ख डोही उडतसे ।।११।। तैसीपरी झाली आम्हांसी । विश्वास घाते गुरु द्रोहासी । प्रवर्तता अक्षय नरकासी । प्राप्त होऊ निश्चये ।।१२।। फणस फळासी म्हणे कनकफळ । तुज समचि आहे मी सोज्वळ । तुझिया अंगी कंटक बहुळे ।

तैसे असतीं ममांगी ॥११३॥ तया रसाळ फणसाची सरी । करील का ? विषाक्त धत्तूरी । तैसी सज्जनाची थोरी । नोहे सूकरी गजराज ॥१४॥ केशवासी हरिनाम । तैसे मजसी हरिनाम । केशवासी जळी विश्राम । मजसी विश्राम जळामाजी ॥१५॥ तरी केशवासी केवी थोरपण । मज कवण गुणे म्हणती सान । हिणवी दर्दुर अच्चुता लागुन । समान कैसा होईल ॥१६॥ चंद्रालागी म्हणे बक । अरे ! चांदोबा माझे ऐक । पक्ष मज दोन नावेक । दुजसीही पक्ष शुक्ल कृष्ण ॥१७॥ तुजलागी एक मास । मी राहे अनंत मास । मी पुष्टांग तू क्षयी अहर्निश । मज अनंत देश तू एक देशी ॥१८॥ तू एका स्थाणवरी स्थिर अससी । अनेक स्थाणुवरीं वास मजसी । मज साम्यता न करिसी । म्हणोनि चंद्रा बक वदे ॥१९॥ काय अवसेच्या दिवसी । बके देतीं प्रकाशासी । नीचाना वाचेसी । आडकाठी असेना ॥२०॥ बोलले म्हणोनिया काय झाले । पूर्ण चंद्रासम बक भले । दर्दुर टरटर कपाळ उठविले । म्हणोनि का झाले वेद पाठी ॥२१॥ एके तटाकीं बक बैसले । तेथे राजहंसही पातले । मुखपद कांही लाल झाले । न कळे आम्हा ये समयी ॥२२॥ वाटते फार श्रमलासी । कवण ग्राम कवण देशी । राहता तुम्ही परदेशी । याती कुळासी सांगिजे ॥२३॥ क्षीराब्धीहूनि येणे झाले । तेथे कवण पदार्थी सुकाळ । हंस म्हणे अमृत सिंधू सोज्वळ । मुक्ताफळ सुवर्ण कमळे । पोवळ वेली अनंत ॥२४॥ रत्न वैडूर्य वज्र । पुष्यराग आणि हिरे । मुक्ताफळे साजिरे । आहारासी मिळतातीं ॥२५॥ तव बक म्हणती सखया । तेथे असतीं का गोगलगाया । नाही नाही त्या ठाया । कृमी कींटक मत्स्यादी ॥२६॥ छीः कैंचे क्षीरसागर । जेथे नाही जंतूसी थार । बक हिणविता हंसा साचार । बक थोर केवी होय ॥२७॥ महापुरुषा माजी । अन्वेषू नये दोषालागी । सज्जन गुण ग्राही सहजी । हंस शोधी नीरक्षीर ॥२८॥ अज्ञांचा भाव जाणोनी । वर्तती संतजनी । परी दुष्ट मूषक प्राणी । निरपराधी वस्त्रा चूर्ण करी ॥२९॥ खादले म्हणोनि का पोट भरिले । वस्त्रे नव्हे ती फळफळावळ । दुष्टांचा स्वभावचि अमंगळ । सज्जना छळितीं वारंवार ॥३०॥ कायसे हे रवि किरण । असह्य वाटती मजलागून । निंदिलिया कौशिके सहस्र किरण । काय उणे तयासी ॥३१॥ ऐसीया श्रेष्ठ सद्गुरू लागुन । निंदिती की मूढ जन । तरी ऐशा पाप्या जाण । निरय दारुण भोगवेल ॥३२॥ राहींले तया ठायीची राती । शिवध्याना माजी गुरुमूर्ती । शिवबसप्पा मोदी निर्मल मतीं । सेवेमाजी सादर ॥३३॥ मग प्रातः काळी उठले । दोघेही अश्वारूढ झाले । ऐसे अरण्यामाजी काळ क्रमिले । द्वादश मास स्वामीनी ॥३४॥ तव मोदी दुःखित अंतःकरणीं । कळवळोनी म्हणे स्वामीलागुनी । कसा हा वनवास स्वामीचे प्राक्तनी । प्राप्त झाला किं निमित्त ॥३५॥ तव सद्गुरु बोलतां । आपुल्या भागा येईल निश्चितीं जे । ते भोगावे स्वस्थ चित्ती । भोगी की त्यागी प्रारब्धा ॥३६॥ तव एक दृष्टांतासी । सद्गुरु सांगतीं बसप्पासी । कधि वास भू तल्पासी । मखमली गादी

गादी एके दिनी ॥१३७॥ एके दिनी मिष्ठान्न परिकर । एके दिनी न मिळे फलाहार । एके दिनी निराहार । हरहर छंदे घालावे ॥३८॥ भीकाची अपेक्षा कवणा आहे । दुदवे मागवी स्वये । एके दिनी ऐश्वर्य भोगावे । भोगावे एकदा वनवास ॥३९॥ जन्मलिया प्राणियासी । शरीर भोग न चुके तयासी । आलीया सुख दुःखासी । असावे की सादर ॥४०॥ मानवासी शतायुष । कल्पिला आहे परमेश । घालवी प्राणी अर्धायुष्य । झोपेमाजी निश्चयें ॥४१॥ उरलेयामाजी । अष्ट वर्षे बाळपण सहजी । शैशवी अष्ट वर्षे भोगी । षोडश वर्षे तारुण्य ॥४२॥ तया तारुण्यी चढ उतार । होत असती अनिवार । सुखरूपे ओलांडी जो घोरांदर । कीर्ती अपार मिळवितो ॥४३॥ इतुकिया माजी रोग भोग । दारा सुत धनाचा वियोग । हे सर्व भोगोनि भोग । करावे योग वृद्धापी ॥४४॥ ऐशिया शतमान आयुषी । अर्ध गेले झोपेसी । उरलिया पन्नासी । सुख दुःखे अनंत ॥४५॥ तैसि या सुख दुःखा माजी । सद्गुरु जरी भेटला सहजी । मग तापत्रय तयालागी न शिवती ॥४६॥ क्षणिक सुखासी भुलला । किंचित दुःख न साहे त्याला । सद्गुरु कृपे सुखदुःखाला । समान मानिला जायतो ॥४७॥ शिवगीतेत परमेशे रामास । योगियांचे लक्षणास । सांगितले ते समयास । तुजलागी सांगतो ॥४८॥ निर्मोही निरहंकारी । विकल्प विरहित सदाचारी । कुसंगासी जवळ न करी । शिवाचारी तो जाण ॥४९॥ सदैव शांत्यादि गुणयुक्त । परात्मी परमात्मा पाहत । निरंतर शिवध्यानी आसक्त । सुख दुःखा विरहित ज्ञानात्मा ॥५०॥ शरीर निर्माणाचे कारण । प्रारब्ध हे मुख्य जाण । अवश्य लागे भोगणे । मानवादी पशूंसी ॥५१॥ प्रारब्ध न नासे सुज्ञानें । शरीर आले प्रारब्धाने । गुरुज्ञाने सुख दुःखा परि मार्जन । कीजे लागे सज्जनी ॥५२॥ संतांचा स्नेह संपादनी । सति सुत गृहाच्या ठिकाणी । इष्टा निष्ट समकरोनी । वर्तावे प्राणी सदैव ॥५३॥ गुरुपासना त्यजून । अन्योपासना करू नये जाण । अव्यभिचार भक्तीने । उपासनाकरावे ॥५४॥ गुरु सेवेमाजी रमला । इंद्रिय दमनी सेवी एकांताला । अनुभवू जाणे तत्वज्ञानाला । शिवभावे करूनिया ॥५५॥

॥ श्लोक ॥ अमानित्व मंदभित्व । अहिंसाः क्षांति रार्जवं । आचार्योपासनं शौचं । स्थैर्य मात्म विनिगृहः ॥१५६॥

पाहीजें नाही चौघात मान । टाकिलासे दंभासी तुडऊन । दयार्द्र ऱ्हदयी अहिंसक जाण । शांति आर्जव युक्त जो ॥५७॥ अहर्निशी गुरुसी भजे । सद्गुरु वीण जाणे न दुजे । शौच संपन्न शुचिभूंत सहज । गुरु मार्गी वर्तत ॥५८॥ धैर्यासी मेरूही न तुळे । संकटासी म्हणे फुले । आत्मनिग्रही अंतःकरण सोज्वळ । जैसे निर्मळ कर्पूर ॥५९॥

॥ श्लोक ॥ इंद्रियार्थेषु वैराग्यं निरहंकार मेवच । जन्म मृत्यु जरा व्याधी । सुख दुःख समदर्शी ॥१६०॥

जो इंद्रिया विषयी विरागी । निरहं भावे शिवसुख भोगी । जन्म मृत्यु जरे लागी । नभी समदर्शी सुख दुःखी ॥१६१॥

॥ श्लोक ॥ असक्ति रनभिष्टंग पुत्र दारा गृहादिषु । नित्यंहि समचितत्वां । इष्टानिष्टोप पत्तिषु ॥१६२॥

पुत्र दारादिकां ठाई । अनासक्ते वागे पाही । इष्टा निष्ट संभवल्याही नित्य निश्चित समचित्त ॥६३॥

॥ श्लोक ॥ मयिचानन्य योगेन । भक्तिरव्यभि चारिणी । बिविक्त देशसेवित्वं अरतिर्जन संसदी ॥१६३॥

गुरूलिंग जंगमा ठायी । अव्यभिचारी भक्ति ठेवी । सदैव एकांती राही । जनसंमर्द त्यागुनी ॥६४॥

॥श्लोक॥ अध्यात्म ज्ञान नित्यत्वंतत्व ज्ञानार्थ दर्शनं । येत ज्ञानामिदं प्रोक्तं अज्ञानं यदतोन्यथा ॥१६५॥

शिवानुभवचि सत्य । जेणे शिवप्राप्ती नित्य । या विरहित जे ज्ञान म्हणवित । ती जाणावी मात अज्ञांची ॥६६॥ ऐसा हा सुज्ञांचा मार्ग । कासया चिंतावे वैभोग । लिंगार्चनाचा संयोग । कवण्याही ठायी चालतो ॥६७॥ म्हणोनि सांगती शिवबसवासी । योगी सर्वकाळ संतोषी । विजनकी वनी मठासी । समदृष्टीनं न्याहाळी ॥६८॥ ऐसे सांगोनि गुरुमूर्ती । डिग्गी ग्रामासी यंती । जावोनिया स्थिरावती मडीवाळेशाच्या देवालयी ॥६९॥ तथेही आरंभोनि अनुष्ठान । एक मंडल तप करोन । शांति करिती जंगमार्चन । सद्भक्त जन मिळोनी ॥७०॥ तया डिग्गी ग्रामासी कोशावर । मुरुगनामे पेठ साचार । सौभाग्य संपत्तीसी आगर । गुरु भक्त चतुर वसताती ॥७१॥ तेथील शट्टी संगनबसप्पा । आणि ज्ञानी महालिंगप्पा । तसची मानकरी चनप्पा । मिरचे गुरुबसप्पा शिवभक्त ॥७२॥ आणीक येनगुंदे गुरबसप्पा । शिवणीकर संगनबसप्पा । गताटे गणंगळप्पा । घाळे अप्पाराय जाणावे ॥७३॥ गुरुबसप्पा गोरटेकर । आणीक दैवमहाजन समग्र । सप्रेम घेवोनि फल कर्पूर । डिग्गी ग्रामा येताती ॥७४॥ पादुकास्वामी सन्निध येऊन । फल कर्पूरादि ठेऊन । साष्टांग प्रणीपात करून । प्रार्थना करिती गुरुवर्या ॥७५॥ श्रीगुरुंचे चरण । मुरुघा लागीं आगमून । करावे पतितांसीं पावन । थोर सान अपेक्षिती ॥७६॥ तरी दीनावरी कृपा करोनी । दुबळ्यांच्या वचना मान देउनी । मुरुघा लागीं येवोनी । पावन कीजे पतितांसी ॥७७॥ तव योगींवर्य बोलती । यावे म्हणता मुरुघा प्रती । करणे असेल जंगम तृप्ती । अतिथी विन्मुख जावो नये ॥७८॥ जैसी आपुली इच्छा । तैसी सेवा करूजी तत्वता । आपुल्या वचनासी मागुता । न होऊ की गुरुवर्या ॥७९॥ ऐसा जरी निश्चय असेल । येऊ मुरुघा ये वेळे । अनुचरांसह गुरुवर्य ते वेळे । प्रयाण करितीं मुरुघासी ॥८०॥ स्वामींचे शुभागमन ऐकोन । येतीं शुभांगना मंगळार्तिक्य घेवोन । नववस्त्रे परिधान करोन । फणि भस्म कुंकुम लावले ॥८१॥ आणिकही थोर जन । बाल वृद्ध तरुण । वाद्य गजरे येतीं सकळ जन । पुरद्वारी तये क्षणी ॥८२॥

ऐसे महाजन थोर सान । थव्यांचे थवे येती धावून । फल कर्पुरादि ठेवून । साष्टांगेसी नमितातीं ॥१८३॥ सान थोर घेती दर्शन । सुवासिन्या आरत्या ओवाळून । घेतीं श्रीगुरूंचं दर्शन । अत्यानंदे करोनिया ॥८४॥ वाजत गाजत मिरवित । मिरवणूक स्थिरावली हिरे मठांत । स्थान मान गुरुवर्यां प्रत । मठामाजी करितातीं ॥८५॥ सिंव्हासनी स्वामी विराजले । नमस्कारितीं सकळी ते वेळे । कर जोडोनी स्वामीस बोलिले । भयभक्तींने तेधवा ॥८६॥ जंगम दासोह चालवावे । तरी बसव पुराण प्रारंभावे । ऐसा सद्भक्तांचा मानस आहे । आज्ञा द्यावे श्रीगुरो ॥८७॥ ऐकोनि भक्ताची विनवणी । म्हणती श्रीगुरु ते क्षणी । तरी या सत्कर्मा लागोनी । विलंब सज्जनी करू नये ॥८८॥ जैसी आपुली आज्ञा । तैसेचि करू कां प्राज्ञा । बोलावितीं अनुभवज्ञा । पुराण पठणा कारणे ॥८९॥ सर्व ही मठ श्रृंगारिले । नवपल्लवे तोरण बांधिले । वक्त्यासाठी सिंव्हासन रचिले । प्रेक्षणीय मनोहर ॥९०॥ तव गुरु वाक्यासी अनुसरून । आरंभिले बसव पुराण । दासोहाची व्यवस्था पूर्ण । करितीं जंगमार्चना ते समई ॥९१॥ परस्थळीचे ग्रामीचे । झुंडी येतीं माहेश्वरांचे । आणिकही दीन अनाथ साच । तृप्त होतीं मिष्टान्ने ॥९२॥ मृदंग ताळ तंबूरी । सरिगमपधनी मिळवोनि सुस्वरी । राग रस शरधींत ते अवसरी । भक्त वृंदे बुडाली ॥९३॥ श्रुति पुराण इतिहास । देती आगमांच्या साक्षीस । दुजा वाचस्पती पुराणास । आले वाटे [illegible]तयां ॥९४॥ अनेक दृष्टांते पुरवितीं । नाना सुभाषितें बोलतीं । श्रोत्रवृंद तटस्थ बैसतीं । काष्टांच्या बाहुल्या परी ॥९५॥ तैसेच शब्दार्थ भावार्थ । विचित्रार्थ श्लोकार्थ । उत्प्रेक्षादि विशेषार्थ । नवरसी भक्तिरस मिळाले ॥९६॥ वक्ता पंडित चतुर । आकर्षिले श्रोत्रवृंदांचे अंतर । भक्त भंडारीचे चरित्र । सद्भक्तेचि वर्णावे ॥९७॥ पुराण श्रवणी भक्त वृंद । तल्लीन झाले लागला छंद । नित्य नूतन प्रेम अगाध । वाढलासे भक्तांचा ॥९८॥ बाल तरुण वृद्ध । स्त्रियां बाळे विशुद्ध । होवोनिया कटिबद्ध । सादरे बैसतीं श्रवणासी ॥९९॥ स्वस्थळीचे तितुकेचि जन । परस्थळीचेही येतीं सज्जन । पीठाधिकारी चरमूर्ती जाण । विशेष करून स्थिरावतीं ॥२००॥ पंगतीसी होय लिंगाभिषेक । पाद पूजेचा संभ्रम विशेष । पवित्र पावन पादोदक । सेवितीं भक्त महेश्वर ॥१०१॥ नित्य नवे मिष्टान्ने । तृप्त करितीं माहेश्वरा लागून । आणिकही थोर सान । अतीत अभ्यागत सर्वही ॥२॥ ऐसे त्रिमासावरी । बसव पुराणाची थोरी । चालली दासोहाची कुसरी । मुरुघामाजी वैभवें ॥३॥ आंध्र देशाचे वेमनार्य । वर्णिले बसव पुराणाचे शौर्य । पापांध तमासी सूर्य । अगाध महिमा सांगती ॥४॥ राक्षसांचा हनन । तरी ऐकिजे रामायण । भारती बंधूंचा नाशन । परी श्रवण करिती जे बसव पुराण । पापासी परिहरण जाणिजे ॥५॥ अतीत अभ्यागत अनाथ । तृप्त झाले त्रैमास पर्यंत । इच्छित भोजने देवोनि सद्भक्त । तृप्त केले सकळांसी ॥६॥ शेवटी पुराणाची समाप्ती । महावैभवे

साहित्य करितीं । परस्थळाहूनि दिंड्या पताका येतीं । समाप्तीसी आनंदे ॥२०७॥ शट्टी महाजन श्रीमंती । कटिबद्ध होवोनि तिष्ठती । देशिक चरमूर्तीं पीठाधिपतीं । येती समाप्तीसी ते समई ॥८॥ नगारे नौबतीं सनयांचा गजर । करडी वाद्य नपेरी सुस्वर । ढाळ मृदंग वीणेचा झंकार । भजनी मंडळे येतातीं ॥९॥ सहस्रावधि लोकांचे थवे । जैसे ओहळ मिळतीं समुद्री स्वयें । स्वामी म्हणती भोजनाची सोय । यथासांग करावे ॥१०॥ कवण अतींतही विन्मुख । होऊ नये समारंभी देख । हा पादुकास्वामीचा दंडक । सर्वत्रांसी विदित असे ॥११॥ ग्रामीच्या चारी महाद्वारी । दूत बैसविले समाचारी । अतींत अभ्यागता ग्रामा भीतरी । अत्यादरे पाठविती ॥१२॥ पाद पूजा क्रियाचार । चालले महा घनघोर । नगारे नौबतीं जय घंटांचा गजर । दुमदुमले अंबर ते वेळी ॥१३॥ सकळ ललना तये दिवशी । द्वारी षटसंमार्जन करितीं । पंचवर्णीं रांगोळिया घालितीं । तोरणे बांधितीं द्वारासी ॥१४॥ सबंध ग्राम श्रृंगारिले । राजमार्गीं पताका तोरणे बांधिले । प्रेक्षकांचे मन मोहिले । वाटे ग्राम कैलास ॥१५॥ सहस्रावधी माहेश्वरांच्या पंगतीं । बैसलेती स्थिरमतीं । पाहिमां शरणु बसवा गातीं । धारण करितीं भस्मासी ॥१६॥ भक्त माहेश्वरांच्या लिंग देवाला । पंचामृते अभिषेकितीं ते वेळा । पत्रपुष्प धूपारतीला । अर्पितातीं ते समई ॥१७॥ प्रसाद पत्र उतरांनी । घेतीं तेव्हां सद्भक्त जनी । पवित्र पादोदक ते क्षणी । भक्त माहेश्वरा अर्पिती ॥१८॥ मग देवान्न राजान्न । षड्रसयुक्त रस रसायन । आणिकही तेल पक्वान्न । पापडे सांडगे कडबोळे ॥१९॥ पीठाधिकारिया पासून । सहस्रावधि माहेश्वर जन । सर्वत्रासी संपूर्ण । सर्व पदार्थे वाढिती ॥२०॥ वाढणारे वाढितीं । व्यवस्थोपक व्यवस्था ठेवितीं । साहित्याची पाहणी करिती । साहित्तिक ते ठाई ॥२१॥ तत्र माहेश्वर जन । तृप्त झाले मिष्टान्न भोजने । तांबूल दक्षिणा देउनी । सत्कारेसीं पाठविती ॥२२॥ ऐशा सहस्रावधि भक्तांच्या पंगतीं । थव्यांच्या थवे बैसती । वाढणारे वाढितीं । व्यवस्थेने तेधवा ॥२३॥ स्वस्थळीचे सद्भक्त । आणिक परस्थळीचे देख । सहस्रावधि पंक्ति बैसत । प्रसादासी तये क्षणी ॥२४॥ महा अपरात्र पर्यंत । जेऊन झाले जन समस्त । स्त्रियां बाळे वृद्ध अशक्त । पुनः पुनः जेवितीं ॥२५॥ पादुकास्वामी समाचार घेतीं । जेवले की समस्तीं । तव सद्भक्त जन म्हणतीं । सबंध पंगतीं उठले हो ॥२६॥ व्यवस्थापक आणि वाढणार । स्वयंपाकी सेवक साचार । असतीं जेवलं समग्र । सावकाशे करोनी ॥२७॥ आता कासया विलंब । मिरमणूक काढावे स्वयंभ । धन्य धन्य हा समारंभ । मुरुघामार्जा घडविलो ॥२८॥ म्हणोनिया स्वामीसहित । मिरवणुकीची व्यवस्था सद्भक्त । करितातीं अत्यंत । वैभवानें तेधवा ॥२९॥ शतानुशत वाजंत्री । वाजती चौघडे तुतूरी । नाद न समाये अंबरी । मृदंग भेरी सिंगांचा ॥३०॥ पालखीमाजी बसव पुराण । ठेवितातीं सद्भक्त जन । सुवासिनी मंगळार्तिक्य

घेऊन । मंगळ गीत गातातीं ॥२३१॥ पीठाधिकारी चरमूर्ती । सकळी अश्वारूढ होती । नगारे उस्ट्रावरी वाजविती । नौबत झडती छकडयांत ॥३२॥ सहस्त्रावधी पताका । नंदि ध्वज फडकती देखा । तयासी व्यासाचे हस्तका । बांधिलेती वैभवे ॥३३॥ लक्षावधी जनांची मांदी । समुद्र उचंबळला वाटे त्रिशुद्धी । भजनीक टाळ मृदंगाची गर्दी । देतीं वरदी कैलासा ॥३४॥ कैलासी काय विशेष । मर्त्य लोकचि आम्हा कैलास । जेथे शरणांची लीला भक्त माहेश । सर्व श्रेष्ठ संगम हा ॥३५॥ ज्ञानगंगेच्या प्रवाही । नाहती प्राशितीं सर्वदाही । तयांच्या भाग्यासी पार नाही । आवास पाही भूकैलास ॥३६॥ अतींत विरक्तांसी जाणा । पट्ट चरमूर्तींसी वस्त्र दक्षिणा । आणिक स्त्री पुरुषां दांपत्य भूषणा । अर्पण करीतीं श्रीगुरू ॥३७॥ महावैभवे मिरवणूक काढिले । चंद्रज्योती फुलझाडे लाविले । तारा मंडळे सोडिले । मिरवणुकींत दारूंचे ॥३८॥ महा संभ्रमेसी मिरवणूक । सबंध ग्रामी मिरवोनि देख । पुनरपि स्वस्थळासीं नावेक । मिरवणूक स्थिरावली ॥३९॥ जाणारांसी प्रसाद देऊन । पाठविती आशिर्वाद देवून । यथासांग समारंभ जाण । म्हणतीं न भूतो न भविष्यती ॥४०॥ सकळ सद्भक्तां आनंद झाला । अतिथींना पाठविती स्वस्थळा । पादुकास्वामी तये वेळा । पुनरागमन सुचविले ॥४१॥ तव ऐकोनि सद्भक्त महाजन । विनविती स्वामी लागुन । की आणीक श्रीचरण । मास तीन स्थिर कीजे ॥४२॥ म्हणोनिया सद्भक्त । विनविती श्रीनां सांप्रत । श्रवण करोनि त्यांचा हृद्गत । तथास्तु म्हणतीं श्रीगुरू ॥४३॥ त्रैमासपर्यंत । पट्ट चरमूर्ती विरक्तांसहित । दासोह चालविती सद्भक्त । अत्यानंदे करोनिया ॥४४॥ मग सर्वत्रांसी दान दक्षिणा । देवोनि पाठविती तये क्षणा । तव आपणही प्रयाणा । सिद्ध होती श्रीगुरू ॥४५॥ ग्रामीण सद्भक्ता पाचारुनी । आज्ञापिती समस्ता लागुनी । आपुलिया प्रेमे षण्मास या स्थानी । दासोह पुराण चालविलों ॥४६॥ आम्हासी अत्यानंद झाला । हेचि शोभा शरण संततीला । महाजन जया पंथे गेला । तोचि भला आपणासीं ॥४७॥ गायन वादन नर्तन । कवणासीही येईल जाण । परी ते त्रिविध दासोहार्वाण । व्यर्थ जांण सर्वथा ॥४८॥ नाचतो की मयूर सुंदर । बोलतो की शिकविल्याकीर । तंतुवाद्य सुमधुर । झणत्कारी सुस्वरे ॥४९॥ परी कां ते भक्तींसी जाणतीं । दर्वी षड्रसी फिरती । भक्तिरसा जे नेणतीं । येर सर्व दंभते ॥५०॥ जेथे भक्तींचा पाझर । तेचि जाणावे श्रेष्ठ नर । नातरी जगी वानर । काय उणे असताती ॥५१॥ बसवादि प्रमथ गण । भक्तिनेचि मुक्ति साधिले जाण । भक्ति विरहित धन यौव्वन । फळले अस्थि पंजर ॥५२॥ तरी आपण सद्भक्त वृंद । भक्ति भंडारीचे सांप्रदायी विशुद्ध । गुरुलिंग जंगम दासोह छंद । कवण्याही काळी विसरू नयें ॥५३॥ सद्भक्तांसी हाचि काज । न्यायार्जित धन संग्रह कीजे । गुरुलिंग जंगमी समर्पिजे । निर्वचक भक्ति ही ॥५४॥ संग्रह वृत्ति टाकुनी । अर्पावे त्रिविध दासोहा लागुनी ।

उदयीकाची आशा टाकुनी । नित्य नूतन कायक ॥२५५॥ कायक हेचि कैलास । शरणांचा अनुभव विशेष । कायकांत रमलेल्या भक्तास । कायकचि कैलास ॥५६॥ परसेवा करीन । लिंग पूजे लागून । व्यवहार करीन । गुरु पूजेसाठी मी ॥५७॥ मजूरीही करीन । परी जंगम सेवा न टळेन । काय कष्ट करीन । त्रिविध दासोहा साठी मी ॥५८॥ निराशे करावी सेवा । तानातानी करू नये जीवा । देतील तेचि संतोष मानावा । अर्पिजे सेवा गुरुलिंग जंगमी ॥५९॥ जेव्हांचे तेव्हां करी अर्पण । तरी तीं होय भक्तीं संपूर्ण । शिळेपाळे की जे का अर्पण । सद्भक्तीं जंगमासी ॥६०॥ ऐसा हा शरणांचा मार्ग । सर्वांसीच अत्युपयोग । सकळी दासोही शिवयोग । साधिजेती निश्चये ॥६१॥ धन्य धन्य ते सद्भक्त । जे गुरुलिंग जंगमी आसक्त । दासोहंभावी काळ क्रमीत । हितैषी होत प्राण्यांसी ॥६२॥ तयांचे दर्शन । होता जीवा उद्धरण । मद्भक्त जेथे वसतीं निशिदिन । ते स्थान मज अपूर्व ॥६३॥ ऐसे पार्वतीसी परशिव । कथिले की स्वानुभव । भक्तीचा हा प्रभाव । अवर्णनीय जाणिजे ॥६४॥

॥ श्लोक ॥ नाहं वसामि कैलासे नमेरौनच मंदरे । मद्भक्ता यत्र तिष्ठंति तत्रतिष्ठामि पार्वती ॥२६५॥

ऐसे करोनिया उपदेश । प्रयाण साधिती विशेष । सद्भक्तीं ते समयास । श्रेष्ठ अहेर समर्पिती ॥६६॥ स्वामीसी पांघरिती शाल । सहस्र दक्षिणा अर्पितीं भक्त प्रेमळ । शिबिकेमाजी बैसउनी पदकमळ । साष्टांगेसी नमिताती ॥६७॥ नाना वाद्यांच्या गजरे । स्वामीना बोळविती एकसरे । सुवासिनी मंगळार्ती करितीं आनंद भरे । श्रीना तळमळे बोळविती ॥६८॥ श्रीगुरू सकळांसी स्थिराविती । आता राहिजे सद्भक्तीं । म्हणोनि सकळ सद्भक्तांप्रती । प्रेमे देती आशिर्वाद फळ ॥६९॥ धनधान्याची अभिवृद्धी होवो । अलक्ष्मी विलया जावो । संततीं संपत्ती अभिवृद्धी पावो । सुफल होवो भूमी ही ॥७०॥ ऐसे आशिर्वाद देउनी । सद्भक्ताना संतोषउनी । संचार करितीं अवनी । पावन मूर्ती श्रीगुरू ॥७१॥ शिष्य सद्भक्तांचे आमंत्रण । स्वीकारीत जातीं अनुदिन । सत्रे चरमूर्ती शिवगण । नित्य तृप्त करिताती ॥७२॥ इच्छित भोजने माहेश्वरां तोषविती । आपण रुक्ष भोजन करितीं । नित्य एका ग्रामी लिंगार्चन उरकिती । संचार करितीं गंगा तीरा ॥७३॥ तेथे असे प्रेनूर ग्राम । महादप्पा धोंडे हा शिष्य निस्सीम । चौघे पुत्र संपत्ती महान । गुरुलिंग जंगम सद्भक्त ॥७४॥ गुरु माउली गृहा येता । अतिशय संतोष झाला चित्ता । कितीक दिवस राहविती गुरु माता । जाऊ म्हणता न पाठविती ॥७५॥ जाता तरी दहा मणांचे कणिग । भरोनि आहे तीं चणक । एवढे घोडे खादल्या देख । जावे निष्टंक पुढिल्या ग्रामा ॥७६॥ ऐसा प्रेमळ स्वभाव । तया गृहा येती गुरुदेव । महादप्पा शिष्या अभिनव । नाही पार आनंदा ॥७७॥ सर्वत्री साष्टांगे नमिती । गुरु माउलीसी प्रेमे राहविती । नित्य नूतन

प्रेमा दाविती । राहविती षण्मास ॥२७८॥ सद्गुरूंची अपेक्षा जाणून । सेवा करिती रात्रंदिन । स्थळ परस्थळीचे माहेश्वर जन । नित्य पंक्तीसी तृप्त होती ॥७९॥ ऐसे गणाराधना नित्य । करिती श्रीगुरू प्रेमयुक्त । संतोषउनी शिष्या प्रत । पुढिल्या ग्रामा जाताती ॥८०॥ ऐसे देश संचार करोनी । वर्षाकाळी येती फिरोनी । तव गंगा माता दुथडी भरोनी । नित्य नेमे जातसे ॥८१॥ तया गंगेमाजी एक बेट । धाकुटे असे उंचवट । मनोहर स्थान पाहोनि अवचट । स्थिरावले तयावरी ॥८२॥ तेथेचि अनुष्ठान आरंभिती । आनंदे वर्षाकाळ क्रमिती । भक्तांगृही कंथा भिक्षा आणिती । नित्य नेमे करोनिया ॥८३॥ सकळ जनासी आश्चर्य वाटले । गुरु माउली गंगेमाजी राहिले । वर्षा तरी घनघोर चालले । गंगा भरोनि दुथडीने ॥८४॥ एक दिनी बेटावरुनी । गंगेसी ओहोटी आली भरती । पर्वतही दिसेना न दिसती गुरुमूर्ती । पहाता गंगा भरपूर ॥८५॥ पाहोनिया सद्भक्त जन । अतिशय कष्टी झाले जाण । म्हणती श्रीगुरू लागून । वाहोनि नेली गंगम्मा ॥८६॥ सुवासिनी आरत्या घेवोनि । नारिकेळ फळे तत्क्षणी । माये श्रीगुरु लागोनी । रक्षी म्हणोनि ओवाळिती ॥८७॥ नारिकेळावरी कर्पुर लाउनी । गंगेत सोडीती ते क्षणी । माये श्रीगुरूंच्या चरणी । सदासर्वदा राहसी ॥८८॥ अघमर्षणे पावन होईन । म्हणोनि श्रीगुरुंच्या मस्तकावरून । वाहसी वाटे आम्हा लागून । पतित पावन गंगांबा ॥८९॥ माये गुरू दर्शन घडवी । प्रार्थना करिति सुवासिनी देवी । गंगांबा उतरु लागली ते समई । तटस्थ दिसती गुरु माय ॥९०॥ तव सर्वत्रा आनंद झाला । अभय देती भक्त वृंदाला । ओवाळोनि आरती श्रीगुरूला । साष्टांगे नमोनि जाताती ॥९१॥ ऐसे एकवीस दिवस पर्यंत । तप करिती निश्चिंत । नित्य गंगेसी पूर येत । राहती समचित्त शिवध्यानी ॥९२॥ शेवटी महागणाराधना करोनी । अनुष्ठान संपविती तये क्षणी । मग गंगेसी पूजा करोनी । नारिकेळ अर्पिती ॥९३॥ तव गंगेसी झाला उतार । स्वामी पावती पैलतीर । पुनः गंगा भरोनि भरपूर । पैल खेड्या लागली ॥९४॥ गंगा नदीचा पूर । ग्रामांत शिरले अनिवार । आता आम्हासी सुविचार । श्रीगुरु वाचोनि कवण सांगे ॥९५॥ ग्रामीचे समस्त जन येती । स्वामीच्या चरणावरी लोळती । शरणांगता करुणा मूर्ती । रक्षण कीजे ये समई ॥९६॥ भिऊ नका भिऊ नका । अभय असे तुम्हा देखा । गंगाधराच्या स्मरणी नावेका । स्थिर करावे मनासी ॥९७॥ सर्वांसी घरा पाठविती । स्वामी चरणी रात्र निश्चिती । क्रमावे की सद्भक्ती । परिहार होय विघ्नासी ॥९८॥ आपण ही गंगाधर ध्यानी । स्थिरावले लिंग पूजनी । येई स्वामी दर्शना धावोनी महाद्वारा गंगाबा ॥९९॥ पाहोनी स्थिती ऐसी । धावले तव ग्रामवासी । आता मात्र ग्रामासी । स्थिरता नोहे ये वेळी ॥३००॥ म्हणोनिया चिंतीती । स्वामीसी जन प्रार्थिती । तव स्वामी अभय देती । परी डगमगती सद्भक्त ॥३०१॥ तव गंगा माता येउनी ।

श्रीगुरु चरणा स्पर्शुनी । माघार घेई ते क्षणी । हां हां म्हणता तत्काळ ॥३०२॥ दुर्लभ हे श्रीचरण । आता केवी भेटतील म्हणोन । पुनश्च गंगाबा येऊन । दर्शन स्पर्शने धन्य होय ॥३॥ आजि आमचा ग्राम । वाहोनि जात होते हे नेम । श्रीगुरूच्या कृपे निस्सीम । राहिले की सुखरूप ॥४॥ म्हणोनि पुनः पुनः श्रीगुरू प्रतीं । साष्टांगे प्रणिपात करिती । ऐसेचि पूर्वी इतिहास निगुती । अंकलगींत घडलासे ॥५॥ अंकलगीं नामे ग्रामी । आले असती एक स्वामी । स्रोतस्विनी नदीच्या तीरी जाउनी । शिवध्यानी राहतीं ॥६॥ नदी तीरीं वटवृक्ष । ते ठाई राहतीं निरपेक्ष । सुटला गंधवाह भयानक । वृक्ष पडतीं उन्मळोनी ॥७॥ ऐसा हा भयंकर वादळ । चहूंदिशी भरले धूळ । काळवंडोनि आले मेघ मंडळ । जल प्रळय भासला ॥८॥ मेघ वर्षू लागले मुसळधार । गुरे पळती सैरावैरा । गोपाळे येवोनि सत्वर । स्वामी लागी विनविती ॥९॥ चला स्वामी ग्रामांत । वटवृक्ष राहीना वाऱ्यांत । कासया निश्चिंत । यया ठाई बैसलो ॥१०॥ अतोनात आले पाऊस । पूर येते नदीस । समीप्र असे थडी या समयास । येथोनि जाणे बरे असे ॥११॥ अरे ! मृत्यूचाचि भय जया नाही । नदीस कासया भीतो पाही । गंगार्पण झालिया मही । सार्थक माझा होईल ॥१२॥ गंगाधरे रक्षिणार । तेथे गंगा माता कैसी बुडविणार । माझा असे निर्धार । देवावरी संपूर्ण ॥१३॥ तव गोपाळे ग्रामी जाउनी । ग्रामस्था सुचविती ते क्षणी । नदीच्या काठी एक स्वामी । अनुष्ठानी बसलेती ॥१४॥ नको स्वामीं नदीच्या थडी । नदी भरोनि जाते दुथडी । नदीमाजी देताल बुडी । ग्रामी चला बोलिलो ॥१५॥ बाळानो देवतारी । तया लागीं कोण मारी । घट्ट असेल आयुष्याची दोरी । कैसेही वांचेन ॥१६॥ म्हणोनि बोलती यतींवर्य । आम्ही तरी काय करावे । बोल ऐकोनि महाजन पाहे । बोलताती बाळांसी ॥१७॥ अरे बाबा ते संन्यासी । उदार असती जीवासी । आमुच्या त्या बोलासी । ते उदासी न ऐकती ॥१८॥ ऐसीच रात्र गेली । उठती गोपाळे प्रातःकाळी । नदीसी जाऊरे ये वेळी । साधू लागीं पाहू या ॥१९॥ रात्रीचे पाऊस अनिवार । पडले की मुसळधार । गेला की आहे यतीश्वर । नदीमाजी वाहोनी ॥२०॥ चला म्हणोनि बाळे येती । धावत येऊनी यतींसी पाहती । नदीस आली भरती । येथवरी पहारे ॥२१॥ येथवरी जरी येई पाणी । परसावरी झाले पाणी । साधू गेलारे वाहोनी । बोलिले सर्व व्यर्थ गेले ॥२२॥ कोणी म्हणती येथूनीच संबोधू । असेल तरी ओ दे साधू । मुले म्हणती अहो ! साधू । महाराज बोला की ॥२३॥ हो ! हो ! आहे या । वाहोनि नेली नाही रे गंगा माया । म्हणता मुले जातीं धावोनिया । जंगमा जवळी ॥२४॥ जावोनिया नमस्कारितीं । मंडलाकार परिवेष शुष्क क्षिती । यतींच्या भोंवती । शुष्क जागा दिसतसे ॥२५॥ तव मुले म्हणती । तुमच्यावरोनि पाणी गेले किती । तरी तुमच्या भोंवती ! चिखल पाणी नाही की ॥२६॥ पुनः ग्रामामाजी जाती ।

महाजनासी वर्तमान सांगती । स्वामीच्या वरुतीं । गेली नदी भरोनी ॥३२७॥ तरी यतीं नाही भिजले । खळे भरी रान शुष्क राहिले । जैशाचे तैसे बैसले । आनंदाने ते साधू ॥२८॥ ऐसे बाळांचे वचन । ऐकोनिया महाजन । येतीं स्वामींच्या दर्शना लागोन । ग्रामीणांचे झुंड पैं ॥२९॥ येवोनी साष्टांगे नमितीं । पाहोनि सकळ जन आश्चर्य करितीं । कवणही देखिलो नाही म्हणतीं । इतुकी नदी आलेली ॥३०॥ कितीक झाडे उन्मळोनि पडले । चिंचवट वाहोनि गेले । तरी स्वामी जंथे बैसले । तेवढी जागा शुष्क असे ॥३१॥ धन्य धन्य शिवयोगीं । यांसी म्हणावे वैरागी । माया मोह तोडिलाकी त्यागी । सत्य शिवयोगीं म्हणो यया ॥३२॥ तरी स्वामी चलावे ग्रामी । राहावे आनंदे भक्त प्रेमी । अपेक्षा पूर्ण कीजे स्वामी । उद्धार करावे दीनासी ॥३३॥ तव ते म्हणती यती । तटाकीच राहू निश्चितीं । काय कारण ग्रामा प्रतीं । एकांती असावे साधूनी ॥३४॥ ग्रामकी आरण्य । यतींसी दोन्ही समान । लौकीकांचा सहवास जाण । नको नको त्रिकाळीं ॥३५॥ विजन वासचि आम्हासी बरे । जन संसर्ग नको बारे । येथेचि मजसी जागा द्यारे । थोरसाना विचारुनी ॥३६॥ तव पुरजन आणि महाजन । म्हणत असतीं स्वामी लागून । आपुल्यासी जितुका रान । पाहिजे तितुका घेईजे ॥३७॥ आनंदे येथेचि राहिजे । ग्रामावरी कृपा दृष्टी ठेविजें । म्हणोनि ग्रामीचे जन सद्भावे । साष्टांगेसी नमितातीं ॥३८॥ मग तया नदीच्या काठी । गुंफा बांधोनि जग जेठीं । राहिले आपुले मठी । अनेक महात्मे दावीत ॥३९॥ जयावरी देवाचि दया । सकळ ऐश्वर्य प्राप्त होय तया । गारा धरिता चिंतामणिया । काष्ठे होतीं सुवर्ण ॥४०॥ चहू देशीचे जन येतीं । स्वामी सन्निध जंगमार्चना करिती । मठ बांधिले सद्भक्ती । स्वामी दासोहा कारणे ॥४१॥ चहु दिशी चतुर्द्वार । मध्यभागी देवालय सुंदर । माजी स्थापिले सिद्धेश्वर । महिमा अपार वाढला ॥४२॥ स्वामी लागी मठ बांधिती । पुढे ओसरी सुंदर निर्मितीं । अंतरी गुहा बांधितीं । अनुष्ठाना कारणे ॥४३॥ चहूं दिशी धर्मशाळा । पाकशाळा भोजन शाळा । स्नान शाळा पाठशाळा । पूजा शाळा सुंदर ॥४४॥ ऐसे सौंदर्ययुक्त मठ । बांधितीं सद्भक्त एक निष्ठ । अनेकांचे कष्ट नष्ट । स्वामी कृपे होतातीं ॥४५॥ तव अनेक कुटुंबे येतीं । स्वामींच्या आसपास राहतीं । साधु संत पंडित निगुती । राहती स्वामी आश्रयें ॥४६॥ कोणी आपुले गृह बांधिती । आणिक दुजे दुकान साधिती । ऐसे बहुजन तेथैं वसती । करोनि राहिले स्वामी सर्वें ॥४७॥ आता कुणासी नको म्हणावे । हां हां म्हणता भरले गांव । वस्तु संग्रही व्यवहारी सव । तया ठाई राहिले ॥४८॥ तया नदीच्या तटाकी जाण । राहिले वस्तीसी बहुजन । ग्राम झाले की अरण्य । अगाध महिमा स्वामींचा ॥४९॥ नित्य सहस्र जंगमार्चन येती साहित्य घेवोनि जन । छत्र चामर अब्दागिरी घेऊन । येती भजनीक सद्भक्त ॥५०॥ टाळ मृदंग वीणा घेउनी । पताके नंदि ध्वजा

सजउनी । वाद्यांचे गर्जनी । सोमवारी येताती ॥३५१॥ अति उत्साहेन । दर्शना येतीं सुज्ञ । प्रातः सायं जाण । दर्शन देती सद्भक्ता ॥५२॥ येतीं सकळ देशीचे जन । कोणी अर्पितीं गोधन । कोणी ओपितीं नंदी लागून । आणीक धनधान्य अर्पितीं ॥५३॥ गाड्या भरोनि धान्य येतीं । नित्य जंगमार्चनेसी खर्चितीं । उदयीकाची खंतीं । तिळभरी नाही स्वामीया ॥५४॥ कोणी गोदान करितीं । कोणी हिरण्य दान करितीं । कोणी वस्त्रालंकार अर्पिती । आशिष घेतीं स्वामींचे ॥५५॥ देणार सद्भक्त देतीं । स्वामी माहेश्वरां अर्पिती । धनकनकी आसक्ती । नाही चित्ती स्वामींच्या ॥५६॥ पुनः एके समई । त्रेसष्ट पुरातन पूजा पाही । एकोत्तर शतांची तेही । पूजा समारंभ करिताती ॥५७॥ छत्री पालखी गाई । घोडे बैल उपानह तेही । षोडस दान सर्वही । महेश्वरां अर्पिती ॥५८॥ आणीक सद्भक्त येती । स्वामीना पुत्रेच्छा दर्शविती । कोणी आरोग्य भाग्य मागती । देतीं इच्छित सर्वत्रा ॥५९॥ स्वयें बिल्ववनी । आसक्त असती लिंगार्चनी । प्रीती नाही अशन वसनी । दासोहं भावे वर्तती ॥६०॥ ऐसे दानधर्म दासोह । चालविती नित्य निर्मोहे । ज्यांच्या हृदयी जे आहे । तेचि साक्ष बोलतीं ॥६१॥ मागे कल्याणी बसवराजेंद्र । दासोह चालविले निरंतर । इच्छितार्थ देवोनि परिकर । माहेश्वर तोषविले ॥६२॥ हेही एक चिमकुले कल्याण । वाटे सकळ जना लागून । अडवीं स्वामी हे नामाभिधान । प्रसिद्ध झाले सर्वत्र ॥६३॥ तरी ते हे सदृष्टांत । पाहिलो अडवी स्वामी प्रत । पूरामाजी राहिले स्वस्थ । महा अघटित नव्हे का ? ॥६४॥ तैसेचि पादुका स्वामी आज । ग्रामालागी रक्षिले सहज । स्वामी जरी न राहतीं आज । निश्चय गंगार्पण होतसो ॥६५॥ तरी पुण्यवंतांचे निमित्त । राहिलो आम्ही स्वस्थ । सुदैव आमुचे निश्चित । संशय किंतु नसेची ॥६६॥ मृत्युंजयाची कृपा जयावरी । वनी की रणी शत्रु गृहा भीतरी । जळी की अनळी शरधि माझारी । पर्वताग्री वसो का ॥६७॥ कपटे विष चारविले । विश्वासघाते हिंसा रचिले । विरुपाक्ष कृपा दृष्टी बळे । सर्व विघ्ने पळताती ॥६८॥ पेनूर ग्रामीचे सद्भक्त । होवोनिया कृतकृत्य । परमोच्छाहे जंगमार्चने प्रत । गुरु अज्ञेने करिताती ॥६९॥ दान दक्षिणा यथासांग । देती माहेश्वरा अव्यंग । पादुका स्वामी सवेग । निघती संचारा लागुनी ॥७०॥ भक्तजन सद्गद चित्ती । स्वामी लागी नमस्कार करिती । संतोषे आशिर्वचन देती । प्रयाण करितीं तेधवां ॥७१॥ शिव स्मरणे तये क्षणी । जाती दुजिया ग्रामा लागुनी । सद्भक्ती चित देउनी । पुढती चरित्र श्रवण करा ॥७२॥ इतिश्री हावगिलिंग लीलामृत । श्रवण मुखे प्राशन करा सद्भक्त । होताल जन्म मरणा विरहित । बसवलिंग बोलत भालपुरिचा ॥३७३॥ श्रीगुरु बसवलिंगार्पणमस्तु । श्रीगुरु हावगिलिंगार्पणमस्तु । शुभंभवस्तु । मंगळमस्तु ।

इतिश्री हावगिलिंग लीलामृते पेनूर गंगानिरोध, अकलगी अडवीस्वामी महिमा वर्णनं नाम अष्टमोध्याय संपूर्ण ।

॥ आर्या ॥ पादुका स्वामी अवनी संचारोनि शिराढोणी येतीं । माहेश्वर बहु वसतीं कीजे तृप्तीं म्हणोनिया येती ॥१॥ श्रीगुरूचे प्रसाद । महिमा असे की अगाध । देवादिकां दुर्लभ प्रसिद्ध । शिवभक्ता सुलभ त्रिकाळी ॥२॥ अर्पणा पूर्वी पदार्थ । अर्पण करोनि शेविजे यथार्थ । ते जाणावे पदार्थ । महा प्रसाद ॥३॥ तया प्रसादाचे महत्व । ईशोपनिषद सांगे तत्व । नमस्कारोनि प्रसादास्तव । प्रसाद महत्व निरूपू ॥४॥

॥ श्लोक ॥ ईशावास्य मिदं सर्वं यत्किंचिज्जगत्यां जगत् । तेन त्यक्तेन भुंजीथा मागृधःकस्य स्विद्धनं ॥५॥

ईश, शब्दे, इष्ट प्राण, भावलिंग । रूपांतरे त्रिविध लिंग । तोचि त्रिपान्मूर्ति महालिंग । यत्किंचिज्जगी व्यापक ॥६॥ इदं प्रपंच आघवे । सर्व-स्थावर जंगम जीव सर्वे । आवास केले जेण पाहे । कर्ता ईश्वर तोचि पैं ॥७॥ त्रिविधात्मक महालिंगाने । त्यक्त प्रसाद स्वीकारणे । तेचि शुद्ध शिद्ध प्रसिद्ध जाण । त्रिविध प्रसाद बोलती ॥८॥ भावेष्ट प्राण । तेचि गुरुलिंग जंगम । तयांचा स्वीकृत शेष महान् । देवादिकां दुर्लभ ॥९॥

॥ श्लोक ॥ लिंगस्यादिष्टरूपंतु जंगमः प्राणलिंगकं । भावलिंगं गुरुःप्रोक्तं । त्रिविधंत्वेक मुच्यते ॥१०॥

पंच कृत्याचा अधीश्वर । तोचि जाणा ईशान थोर । सृक्चंदन वनिता परिकर । निर्मिले अठरा भार वनस्पती ॥११॥ जरी तो नाही निर्माता । प्राप्त होतो का जीवा तत्वता । तयाचिया अनुग्रहे आली पात्रता । मानवांसी ॥१२॥ तरी जेणे सकळ पदार्थ निर्मिले । तयासी वंचिजे कां भले । अहंकार त्यागोनि समूळ । शरण जावे त्रिलिंगा ॥१३॥ तुवां जे पदार्थ निर्मिलासी । तुज का न अर्पावे निरहंभावेसी । अनन्ये अर्पोनि त्रिलिंगासी । त्रिप्रसादा सेविजे ॥१४॥

॥ श्लोक ॥ इष्टलिंगार्पितं शुद्धं प्राणलिंग मुखार्पितं । शिद्धंततः प्रसिद्धंहि भावलिंगर्पितं विदुः ॥१५॥
तत्तदर्पणतोलब्धं प्रसादंतत्तदादरात् । भुंक्तेयत्नात्स्वयंविश्व तैजसप्राज्ञरूपतः ॥१६॥



इष्टलिंगार्पित प्रसाद हे शुद्ध । प्राणलिंगार्पित हे सिद्ध । भावलिंगार्पित प्रसिद्ध । प्रसाद त्रिविध जाणावे ॥१७॥ आणिक अर्पणाचा प्रकार । जाणिजे सद्भक्ति सविस्तर । जेणे संशय परिहार । होय साचार श्रोत्यांचा ॥१८॥ रूप अर्पिजे इष्टलिंगा । रुचि अर्पिजे प्राणलिंगा । तृप्ति अर्पिजे भावलिंगा । जाणावेगा अर्पण विधी ॥१९॥ इष्टप्राण भाव । गुरुलिंग जंगम स्वये । त्रिप्रसाद अर्पोनि भावे ।

सेवोनि जीवावे सद्भक्त ॥२०॥ शिव देवाच्या कृपे लब्ध । पदार्थादि विशुद्ध । शिव देवासी न देता बद्ध । सेविल्या अबद्ध कृतघ्न तो ॥२१॥

॥ श्लोक ॥ लिंगार्थं जंगमार्थं वा गुरुवर्थं पाकमुत्तमं । आत्मार्थंयत्कृतं पाकं तदन्नं किल्बिषंभवेत् ॥२२॥

लिंगार्थचि पाक साधिजे । विशेष जंगमार्थ जाणिजे । अथवा गुरुवर्थ कीजे । विशुद्ध पाक निष्पत्ती ॥२३॥ आत्मार्थ जे शिजविती । पाक नव्हे ते किल्बिष निश्चितीं । असुर वृत्तीने जे खादतीं । पापचि खातीं जाणावे ॥२४॥ लिंगधारी सद्भक्त शुद्ध । न सेविजे इतर देवता प्रसाद । पंच कृत्यासी अनधिकारी दैवत । तयांचा प्रसाद न सेविजे ॥२५॥ सर्वही भोग्य पदार्थ । परशिवेचि निर्मिले यथार्थ । ज्याचे तयासी अर्पावे सत्य । इतर दैवत अनधिकारी ॥२६॥ इतर दैवता अर्पिले । प्रसादत्व नये भले । अनुग्रहावीण कोपचि वहिले । प्राप्त होय भक्तासी ॥२७॥ तरी शिवेतर प्रसाद । परित्यजिजे अशुद्ध । गुरुलिंग जंगम प्रसादचि शुद्ध । सेविजे की सद्भक्त ॥२८॥ यत्किंद्वस्तु जात । असमर्पणे न सेविजेत । सर्वेंद्रिय मुखे तत्वता । स्वीकारिजे पदार्थ दोष हरण ॥२९॥ तत्तदिंद्रियामाजी अवछिन्न । लिंग षट्के असती जाण । ते षड्विध पदार्थे सुजाण । षड्लिंगार्पोनि सेविजे ॥३०॥ शब्द स्पर्श रूपरसागंध । पंच तन्मात्रे विशुद्ध । सहावे परिणाम प्रसिध्द । हे षट् पदार्थ जाणिजे ॥३१॥ आचार लिंगा गंध अर्पिजे । गुरुलिंगा रस समर्पिजे । शिवलिंगासी रूप दाविजे । जंगम लिंगा स्पर्शन ॥३२॥ प्रसाद लिंगासी शब्द । महालिंगा तृप्ती अगाध । ऐसे षडलिंगा अर्पोनि पदार्थे विशुध्द । प्रसाद रूपे सेविजे ॥३३॥ इतर दैवताचे नैवेद्य । प्रसादी न स्पर्शिजे अशुध्द । केवल गुरुलिंग जंगम प्रसाद । सेवने मोक्ष लाभतो ॥३४॥ जंगम प्रसादचि सेवी । तो जंगम प्रसादी म्हणवी । जो नित्य जंगम प्रसाद एकदा सेवी । तो म्हणवी नित्य प्रसादी ॥३५॥ अतिथि रूपे गुरु जंगम येती । तव नेमे प्रसाद सेविती । तरी ते समय प्रसादी म्हणविती । सांप्रदायिक ॥३६॥ ऐसिया प्रसादाचा महिमा । न वर्णवे आगम निगमा । जे का दुर्लभ हरि ब्रम्हा । देव दानव मानवा ॥३७॥ जरी कुणासी लाधला प्रसाद । तो जाणावा पुण्यवंत मानद । तया प्रसादाचेनि सुखद । मोक्ष साम्राज्य संप्राप्तीं ॥३८॥

॥ श्लोक ॥ तिल षोडष भागंच तृणाग्रांबु कणोपमम् । पादोदक प्रसादंच सेवनान्मोक्षमामुयात् ॥३९॥

तिल षोडश भाग प्रसाद । तृणाग्र बिंदूपम पादोदक विशुध्द । सेवन केलिया तो मोक्षद । शिवसायुज्य पावेल ॥४०॥

॥ श्लोक ॥ स्वेष्ट लिंगप्रसादिस्यान्नोपवास परो भवेत् । मोहाद्यस्तुचरंस्तस्य प्रत्यवायो महान्भवेत् ॥४१॥

जो का त्रिविध लिंग प्रसादी । एक भुक्तोपवासादी । केलिया महा प्रत्यवाय भेदी । अपराधी तो जाणावा ॥४२॥

 

एकादस्यादि उपवास । सहस्रावधी केलिया विशेष । प्राजापत्यादि हवने अयुत तादृश । केला जरी मानव ॥४४॥ तरी शिवप्रसाद सिक्थासी । न पुरती की कोटयंशी । ऐसा हा प्रसाद सुखराशी । अभक्तांसी दुर्लभ ॥४५॥ जे का गुरु कारुण्ये प्राप्त । तो जाणावा पुण्यवंत । मोक्ष हे तयासी निश्चित । करतळामळक जाणावे ॥४६॥ जो जगदीश जगज्जन्मा कारण । निर्मिले पवित्र रसरसायन । ते अनन्य भावे तयासी अर्पुन । प्रसाद रूपे सेविजे ॥४७॥ ऐसे जे का पवित्र प्रसाद । गुरु कृपे जयासी लब्ध । तो केवल शिवरूपचि अभेद । जाणा प्रसिद्ध आगम वाक्य ॥४८॥ त्रिविधार्पण षड्विधार्पण । आणिकही षटत्रिंशार्पण । तया म्हणतीं मिश्रार्पण । हा शिवानुभव गुरुमुखे जाणावे ॥४९॥ ऐसिया दुर्लभ गुरु प्रसादासी । साष्टांगे नमोनिया अहर्निशी । सेवन करोनि पुनर्मर्जन्मासी । येणे जाणे खुंटिले ॥५०॥ हावगिलिंगा गुरुवर्या । तुमच्या कृपा प्रसादा देऊनिया । उद्धरोनि पापिया । कीर्ती गावया मति दीजे ॥५१॥ श्रोते तुम्ही शिवमूर्ती । अवधान दीजे गुरु चरित्रा प्रती । जेणे वक्त्याची मती । प्रकाशमान होईल ॥५२॥ संचार करीत स्वामी ! आलेतीं शिराढोण ग्रामी । श्रीगुरू हे जंगम प्रेमी । जंगम तृप्तीसी येतातीं ॥५३॥ जैसे बसवराये जंगमा कारण । काश्मीरा गेले कल्याणाहून । तैसे शिराढोणी माहेश्वर जन । वसतीं ऐकोन आगमितीं ॥५४॥ शिष्य संप्रदायही होता तेथ । माहेश्वर असती शतानुशत । होईल जंगमार्चना अपरिमित । म्हणोनि स्वामी आगमिले ॥५५॥ शिष्यां गृही स्थिर झाले । नित्य शिष्ये आमंत्रण चालविले । सबंध माहेश्वरा आमंत्रिले । सांगते झाले स्वामीनी ॥५६॥ आमुचे जितुके असतीं मुक्काम । नित्य पंगतीसी घेइजे श्रम । कुटुंबसह आमंत्रण घेऊन । आवड पूर्ण करावे ॥५७॥ ऐसे नित्य आमंत्रण चालले । परस्थळीचे माहेश्वरही येऊ लागले । सहकुटुंब येतीं ते वेळे । पंगतीं लागी नेमाने ॥५८॥ नित्य नवे मिष्टान्न । भोजने तृप्त होतीं माहेश्वर जन । वाढितीं सदभक्ती रसरसायन । पुरे म्हणता न ऐकतीं ॥५९॥ शेवटी तांबूल दक्षिणा देतीं । सप्रेमे नमस्कारितीं । ऐसे चातुर्मास निगुतीं । राहविले भक्तीं स्वामीसी ॥६०॥ सकळ माहेश्वर मिष्टान्ने तृप्त होतीं । स्वामी मात्र न जेवितीं । तुकडे वरण भात खातीं । देह कष्टवितीं नाना परी ॥६१॥ माहेश्वरां मिष्टान्ने तृप्त करितीं । आपण निरपेक्षे तृप्त होतीं । अजिंक्य ही रसनेची गती । न आकळेतीं सर्वत्रा ॥६२॥ जो का रसनेसी जिंकिला । तो जाणा जगासी जिंकिला । रसातळी नेले मानवाला । ऐसी रसना दुर्धर ॥६३॥ योगिराज पादुका स्वामी । रसना जिंकिले भक्त जन प्रेमी । मिताहारी होउनी । जंगम तृप्तीं करितातीं ॥६४॥ यया परी शिराढोणी । जंगम भक्ती प्रसार करोनी । चातुर्मास संपादुनी । जळकोटासी जातातीं ॥६५॥ तेथील गुरु भक्त देशमुख । स्वामींचे

आगमन पाहोनि देख । सामोरे येवोनि सकळिक । स्वगृहामाजी स्थिराविती ॥६६॥ तेथील सकळ माहेश्वर । पंगतींसी बोलविती निरंतर । पंच पक्वान्नेसी समग्र । तुष्ट करिती महेश्वरा ॥६७॥ सकळ शिष्य समुदाय । गणाराधना करिती पाहे । कांहीं दिन क्रमोनि स्वये । संचार करितीं वाढवणा ॥६८॥ स्वामींचे ऐकोनि आगमना । आनंद झाला भक्त गणा । गुरुवर्यासी स्थान माना । अत्यानंदे करितातीं ॥६९॥ बिनावां करितीं भक्त जन । येतीं पंगतींसी माहेश्वर गण । तुष्ट होतीं मिष्टान्ने जेऊन । म्हणतीं धन्य स्वामीसी ॥७०॥ आपण श्रेष्ठ अधिकारी होउनी । भक्ति मार्गे वर्ततीं अनुदिनी । बसवावतारी अवनी । उद्धारा लागुनी आले म्हणतीं ॥७१॥ स्वामींचे दासोह ऐकुनी । येतीं सद्भक्त दीर्घाचळाहूनि । तव माहेश्वरा लागुनी । आमंत्रितीं स्वामींनी ॥७२॥ माहेश्वर ते कवण कवण । ऐका त्यांचे नामाभिधान । विरक्त करिबसव स्वामी पावन । शिव बसप्पा बसव प्रभू ॥७३॥ चिक्कवीरय्या मठपती । आणीक शिवबसप्पा मोदी । सद्भक्त हावप्पा उदार मूर्तीं । हळ्ळी सिद्धलिंगप्पा संगप्पा ॥७४॥ हेग्गणे संगप्पा चाटी कल्लप्पा जाण । साष्टांगे नमितीं श्रीगुरु लागुन । फल कर्पुरादि ठेऊन । स्वामीसी प्रार्थून बोलतीं ॥७५॥ स्वामींनी आज्ञा कीजे । उचलेल ते घेऊ ओझे । स्वामी म्हणतीं केले पाहिजे । गणाराधना सकळीक ॥७६॥ दोन्ही ग्रामाचे सद्भक्त । मिळोनि करावे आराधनेप्रत । मानोनि आज्ञा सांप्रत । पदार्थ संग्रह करितातीं ॥७७॥ दीर्घाचळीचे वाढवणीचे । भक्त माहेश्वर मिळोनि साच । सिद्ध करोनि साहित्य । आरंभ करितीं गणाराधना ॥७८॥ वाढवणा भक्तींचे माहेश्वर । नित्य श्री पंगतींसी सादर । नूतन मिष्टान्न परिकर । पाकसिद्धी करितातीं ॥७९॥ आठा दिवसा पर्यंत । माहेश्वरां केले संतुष्ट । इच्छित भोजन वाढोनि सद्भक्त । दान दक्षिणे तोषवितीं ॥८०॥ ऐसे करोनिया गणाराधना । भक्त माहेश्वरांसह पहुडले जाणा । श्रीगुरू पाहतीं स्वप्ना । विचित्र तर ते रात्री ॥८१॥ मोदी शिव बसप्पान । स्वामी पुढे करितीं रोदन । स्वामी उठतीं खडबडोन । पहुडले जन स्वस्थ पैं ॥८२॥ प्रातःकाळ हळ्ळे संगप्पासी । सांगतीं दुष्ट स्वप्नासी । ही वार्ता शिवबसप्पा मोदीसी । कळवू नको सर्वथा ॥८३॥ उदयाचळी गेलियावरी । शिवबसप्पासी कळविजे परी । कीजे जंगमार्चना कांही तरी । दुष्ट स्वप्ना निमित्त ॥८४॥ प्रातःसमई उठतीं सज्जन । सर्वत्रासी स्नाने करवुन । तुष्ट करिती मिष्टान्न भोजनें । आज्ञा देतीं सर्वत्रा ॥८५॥ मग सकळ सज्जन । श्री गुरूंचे घेऊनि दर्शन । दीर्घाचळासी तत्क्षण । प्रयाण करितीं सर्वांनी ॥८६॥ तेथे गेलियावरी । शिवबसप्पासी कळविती लौकरी । स्वामींच्या स्वप्ना माझारी । आपण कष्टी झालो म्हणे ॥८७॥ तरी यासी शांती करण । करावे जंगमार्चन । स्वामींचीही आज्ञा जाण । हळ्ळी संगप्पा बोलिला ॥८८॥ तव शिवबसप्पा म्हणे । तिथेचि का सांगू नये । चिंताक्रांत खिन्नमने । जातीं अपुल्या स्वगृहा ॥८९॥ तव भोकणीहूनि

आले तत्काळ । विरूपाक्ष स्वामी ज्योतिषी सोज्वळ । बैसकार देऊनि तये वेळी । स्वप्न स्थिती कळविती ॥९०॥ स्वामी म्हणती हा दुःस्वप्न । पुढे असे हो महा विघ्न । तरी ग्रहानुकूला लागून । जंगमार्चन करावे ॥९१॥ तयासी शांतीचा क्रम । शास्त्री सांगती शिव बसप्पा लागुन । विरूपाक्ष शास्त्री वाढवणा येऊन । स्वामीसी निवेदुनी जातातीं ॥९२॥ इकडे शिव बसप्पा निश्चितीं । साहित्यालागी मिळवितातीं । एकासी एक लागेना प्रयत्नांतीं । करिती चिंता ते समई ॥९३॥ प्रयत्न करिता प्राप्त नोहे । तरी ते कुसमय-जाणावे । होणार ते चुकेना पाहे । कालत्रयी ॥९४॥ हे पुरातनांचे वचन । अनृत नोहे कदापी जाण । आलिया भोगासी स्वागतून । लिंगानंद मानावे ॥९५॥ आपण होवोनि आले । तया लिंगभोग म्हणितले । बळेंचि ओढवोनि घेतले । तया बोलिले अंगभोग ॥९६॥ अंगभोग अनर्पित । लिंगभोग शिवार्पित । हा वर्म जाणिजे निश्चित । शिवानुभवाचा ॥९७॥ सद्गुरूनी जाणून । आंध्र प्रांता क्रमिती प्रयाण । सोडोनिया वाढवण । ते समई ॥९८॥ रुद्रूरचे देशमुख शिवभक्त । शिष्य असतीं परंपरागत । तयांच्या सदनी श्रीगुरू निश्चित । राहताती आनंदे ॥९९॥ ऐसे असता एके दिनी । ज्वर संचरलं श्रीगुरू लागुनी । आयास होत अनुदिनी । नवु दिवस पर्यंत ॥१००॥ स्नान नाही पूजा नाही । जप नाही तप नाही । दीर्घाद्रीसी ते समई । पत्र लिहोनि पाठवितीं ॥१०१॥ पत्र दर्शनी सद्भक्त जन । जैसे गेले वाढवणा लागुन । तैसेचि येतीं रुद्रूरा जाण । सर्वत्रानी तेधवा ॥२॥ उदयगिरीहून । रुद्रूर असे सप्त योजन ! येतीं समस्त भक्त जन । स्वामी दर्शना उच्छुक ॥३॥ साष्टांग प्रणिपात करून । स्वामींचे करितीं मुखावलोकन । चित्ती महा कष्टी होऊन । करितीं दुःख सकळिक ॥४॥ श्रीगुरू म्हणतीं तेधवा । अरे ! कासया दुःख करावा । येईल त्यासी येऊ द्यावा । आशिर्वाद असावा गुरूंचा ॥५॥ अपवाद अर्थनाश । बंधु वैर त्यागिजे देश । महाव्याधी राग विशेष । माझिया भक्तांसी न घडो ॥६॥

॥ श्लोक ॥ अपवाद मर्थं नाशंच विरोधश्च स्वबांधवः ॥ देश त्यागो महाव्याधी मद्भक्तश्च सुलक्षणम् ॥७॥

माझिया सद्भक्तां वरुतीं । संकटांच्या पर्वत राशी पडतीं । तयांसी न जुमानितीं । मग्न असती शिवानंदी ॥८॥ भोगासी रोगाचे भय । सुखासी क्षयाचे भय । धनिकासी राजाचे भय । विद्वाना भय वादाचा ॥९॥ तपासी इंद्रियांचा भय । योषिता रूपाचे भय । रणामाजी रिपुचा भय । मोहा भय शोकाचा ॥१०॥ देहासी मृत्यूचा भय । ऐसे सर्व ठिकाणी असे भय । ज्ञानी हा सदैव निर्भय । भूत भविष्य वर्तमानी ॥११॥

॥ श्लोक ॥ भोगे रोग भयं सुखे क्षय भयं वित्तेपुराज्ञो भयं विद्यावाद भयं तपेंद्रिय भयं रूपाद्भयं योषितां ।

मोहे शोक भयं रणे रिपु भयं कायः कृतांताद्भयं । एवं सर्व भयं क्षितितले ज्ञानी सदा निर्भयं ॥११२॥



आणीक एकावी नीती । धर्म हाचि बंधु निश्चिती । कर्म हाचि वैरी जगती । महाव्याधी मनस्ताप ॥१३॥ धैर्य हेचि सर्व साधन । सांगती नीति शास्त्रानी । योगी की भोगी दरिद्री जन । न सुटे कर्म भोगिल्याविणे ॥१४॥



॥ श्लोक ॥ धर्मं मेको महाबंधु कर्म मेको महारिपुः । मनस्तापं महाव्याधी धैर्यं सर्वत्र साधनं ॥११५॥

आता उठिजे स्नानासी । शिवपूजा करा आनंदेसी । श्रवण करोनि गुरु वाक्यासी । बोलताती सद्भक्त ॥१६॥ सोडोनिया श्री चरण । कैसे करावेजी स्नान । आम्हा लागी समाधान । कैसे होय गुरुवर्या ॥१७॥ तुमची जैसी इच्छा जाण । तथास्तु करीन स्नान । चन्नमल्लप्पा मोदी तत्क्षण । करोनि स्नान आलासे ॥१८॥ स्वामी लागी स्नान करउनी । स्थिर केले लिंगार्चनी । मग सकळ भक्त जनी । करिती स्नान तेधवा ॥१९॥ सकळी शिवपूजा करोनी । सिद्ध झाले चर पादार्चनी । वैभवे पाद पूजा करोनी । पादतीर्था साधिती ॥२०॥ श्रीगुरुदेवा सहित । प्रेमे सेविती पादोदक । लिंगार्पिते होती तृप्त । गुरुदेवासह सर्वानी ॥२१॥ ऐसे चार दिवस झाले । श्रीगुरुसी समाधान वाटले । रुद्रूराहूनि प्रयाण साधिले । कोटगिरीसी तेधवा ॥२२॥ तया ग्रामा जाउनी । बैसले हो अनुष्ठानी । अनिष्ट दुर्भोगा लागुनी । शिवस्मरणे परि हरिती ॥२३॥ अंतीं करितीं शांती । कुंभद्वय क्षीरे अभिषेकिती । आपुलिया इष्ट लिंगाप्रती । रुद्रघोषे करोनी ॥२४॥ यथेष्ट केले जंगमार्चन । आज्ञा देती सद्भक्ता लागुन । आजी दीर्घाचला आपण । प्रयाण कीजे सर्वांनी ॥२५॥ आज्ञा घेवोनि सद्भक्त । येती दीर्घाचला प्रत । मास द्वय कोटगिरीत । क्रमिताती सद्गुरू ॥२६॥ तेथील शिष्या निरउनी । येती उदयगिरी लागुनी । मठामाजी साहित्य ना पाणी । आश्चर्य वाटे सकळांसी ॥२७॥ परस्थळी साहित्य रचिले । ते कवणासी न कळविले । माहेश्वरांचे थवे येऊ लागले । सूचनेसरसी तेधवा ॥२८॥ मठी साहित्य ना स्वयंपाक । येती माहेश्वर विरक्त । आश्चर्य करिती सद्भक्त । स्वामी महत्व न कळे म्हणती ॥२९॥ तव गाड्या बैलावरोनी । स्वयंपाक आणिती भक्त जनी । पाकसिद्धी करिती ते क्षणी । सहस्रावधि जनांचे ॥३०॥ क्षीरान्न शुभ्रान्ने । पक्वान्ने तळिवान्ने । अनेक विचित्र चित्रान्ने । कोशिंबिरी चटण्या बहुविध ॥३१॥ पादुकास्वामींचा पक्वान्न वैभव । वर्णू न शके कवि लाघव । जंगमार्चनेचा भक्तिभाव । गौरव स्वामींचा ॥३२॥ नित्य चाले जंगमार्चन । सहस्रावधि संख्या प्रमाण । सहस्र गडु ताटल्या तत्क्षणा । आणविताती श्रीगुरू ॥३३॥ पात्रे ठेवण्यासी कोठी केले । तयावरी द्वादश जन नेमिले । तुपांच्या घागरी भले । येती अर्ध शताधिक ॥३४॥ जया ग्रामीचे जे वस्त । तत्काळ पाठविती त्या प्रत । उदयकाळी पाहिजे ते वस्त । येवोनि ठेपत महाद्वारी ॥१३५॥

आणीक दशव्यक्ती । घृत कोठीवरी नेमिती । तांदूळ गहू दाळीच्या निश्चिती । कोठे असती वेगळे ॥१३६॥ तयावरी चाळीस जन । श्रीगुरू नेमितीं व्यवस्थे लागून । पंगतीसी वाढण्या कारण । चतुःशत जन नेमिले ॥३७॥ नित्य नवे मिष्टान्न । घृत पक्वान्न तैल पक्वान्न । तयांचा न करवे गणना । म्हणतीं बसवदेव अवतरले ॥३८॥ पूरणपोळी तिळपोळी । खवापोळी सुरळी पोळी । बदाम पोळी चारोळी । खोबरे पोळी खुसखुसीत ॥३९॥ दुग्ध क्षीर गव्हांचा क्षीर । मुग्द क्षीर चणदाळीचे क्षीर । गहुले क्षीर नखुले क्षीर । शेवयाची क्षीर अति सूक्ष्म ॥४०॥ खोबरे बदाम खारीक । खसखस चारोळी सुरेख । सुंठ सोप विलायची सुगंधिक । शर्करा विशेष मिश्रिती ॥४१॥ गुड क्षीर वेगळे करितीं । शेरासी चार सेर गुड घालितीं । सुगंध रुचीने होय तृप्ती । पुनः न मागतां कवणही ॥४२॥ लाडू करंज्या कडबोळे । कोठे भरोनिया उरले । आणीकही रंभाफळे । दश सहस्राधिक आणवितीं ॥४३॥ पापडे सांडगे सेव । बुरबुऱ्यांचा अति गौरव । लिंबु अंबा अवळी लोणचे सर्व । फळांचे ते घालिती ॥४४॥ ग्रामीचे परस्थळांचे दुग्ध । आणवितातीं विशुद्ध । आटवोनिया अति सुगंध । दुग्ध क्षीर करितातीं ॥४५॥ ऐसे नित्य नवे पदार्थ । करोनिया अविश्रांत । माहेश्वरगणा प्रीत्यर्थ । तृप्त करितीं प्रति नित्य ॥४६॥ संगप्पा आणिक शिद्धलिंगप्पा । सत्तेण्णा व हावय्यप्पा । महाजन शास्त्री शिवगिरावप्पा । बसवंतराय भीमराय ॥४७॥ जंगमांचा शिवबसय्या । आणीक मोदी गुरु बसवय्या । तैसेचि जाणा गिरिमल्लय्या । स्वागत करितीं सर्वत्रा ॥४८॥ प्रथम प्रहरीच भोजन व्हावे । ऐसी व्यवस्था करितीं स्वयें । व्यवस्थापकादी सर्व । यथासांग तृप्त होतीं ॥४९॥ ऐसे अष्टादश दिन । चालवितीं जंगमार्चन । नित्य नूतन मिष्टान्न । जेवूनि धाले माहेश्वर ॥५०॥ वरी तांबूल दक्षिणा देतीं । शेवटी समारंभ उरकितीं । लौकिकी जन म्हणतीं । पादुका स्वामी धन्य धन्य ॥५१॥ आय व्यय काय आहे । कितीं जंगमार्चना कैसी सोय । बसवदेवचि आले स्वये । ऐसे वाटे लोकासी ॥५२॥ आणीक त्रिवत्सर गत होता । गणाराधना रचिले तत्वता । चतुर्दश दिन महंता । माहेश्वरां तृप्त करिती ॥५३॥ जंगमार्चना होता शून्य । म्हणती आम्हा येते दैन्य । आणिक आरोग्यासी हान । होते म्हणती सद्गुरू ॥५४॥ कवणे एक नूतन माहेश्वर । येता हर्षती मनी फार । येता अधिक माहेश्वर । आनंदाश्रु गाळितीं ॥५५॥ यथोचित मिष्टान्ने रचोनी । तृप्त करितीं तया लागुनी । हा दासोहं भाव जनी । अत्यद्भुत वाटतसे ॥५६॥ जंगमचि माझे प्राण । जंगमचि माझे धन । जंगम तृप्तींच मज कल्याण । मम दैवत जंगम ॥५७॥ कैसा हा भक्तिभाव । अवतरले दुजे बसवदेव । हा उपजत स्वभाव । महात्म्यांचा जाणावा ॥५८॥ षोडश महा दानामाजी । अन्न दानचि श्रेष्ठ जाणाजी । सत्पात्री देता अन्न सहजी । प्राप्त होय कोटि गुण ॥५९॥ शिकविल्या न येतां । दातृत्व प्रिय वचन नीतां । वीरत्व धैर्य विज्ञान निगुतीं ।

ऐश्वर्यं असोनि भोक्तृत्व ॥१६०॥ गृही असे सुंदर ललना । भोगशक्ती पाहिजे जना । वैभव असोनि दानी । उगेचि कोणी म्हणेना ॥६१॥ तरी पाहिजे पूर्वार्जित पुण्य । घडे दानधर्म अनन्य । ऐश्वर्य उपभोगा लागुन । अनंत विघ्ने असतातीं ॥६२॥ गृहिणी सुंदर पतिव्रता । गृह भरले संपत्तीने तत्वता । भोगी त्यागी आत्मीयता । असे विद्वत्ता कविता चातुर्य ॥६३॥ आणीक ईश्वरी पूर्ण भक्तीं । साधू सज्जनी अति प्रीती । गृह भरोनि असती संततीं । वरिष्ठ कुळी जन्मला ॥६४॥ ऐसे सुख विविध प्रकारे । शिव कृपे घडे सारे । आता स्वर्गामाजी तेरे । उरले काय ॥६५॥ ऐसी आहे की नीतीं । ही तपोबळाची संपत्ती । मा बाष्कळासी कैंची प्राप्ती । तुकडया प्रती दुष्काळ ॥६६॥ साधिले असतीं पूर्वार्जित । प्राप्त होतसे सांप्रत । नाही दिले त्यांच्या पदरांत । दगड धोंडेचि निश्चये ॥६७॥ ऐसे म्हणतीं सुविचारी । स्वामीसी वाखाणितीं अहोरात्री । धन्य जननी धरित्री । स्वामी रत्न प्रसवली ॥६८॥ कवण करील सहन । जंगमांच्या गर्जनें लागुन । इष्टार्थांसी देऊन । कवण भक्तींने वागतो ॥६९॥ स्वामींच्या जंगमार्चनेची कीर्तीं । पसरली की दिगंतीं । चहू देशीचे सद्भक्त येतीं । स्वामी महती ऐकोनी ॥७०॥ सिधा साहित्य घेवोनि । येतीं सद्भक्त धावोनी । अर्पितीं जंगमार्चना श्री चरणी । आशिष घेवोनी जातातीं ॥७१॥ संतानासी येतीं संतानेच्छु । स्त्री प्राप्त्यर्थ कामेच्छु । दारिद्र्य हरणा धनेच्छु । येतीं स्वामी दर्शना ॥७२॥ कुणासी रोगाचा दुर्भोग । कुणा शिव योगाचा सुयोग । कुणा संकल्प विकल्पाचा रोग । अनंत जन येतातीं ॥७३॥ कवणही यावे । जंगमार्चन करावे । इच्छित फळासी पावावे । श्रीगुरू कृपे ॥७४॥ पुत्रार्थ्यांसी पुत्र झाला । जावळ काढण्या वैभवे आला । जंगमार्चन यथासांग केला । जावळ काढिला स्वामी चरणी ॥७५॥ कुणाचे दारिद्र्य गेले । कुणाचे विवाह झाले । कुणाचे भूत पिशाच्च पळाले । स्वामी दर्शन स्पर्शने ॥७६॥ जिकडे पहावे तिकडे । भरोनि येतीं बैलगाडे । स्वयंपाक रचितीं रोकडे । विविध प्रकारे करोनी ॥७७॥ जैशा येती पावसाच्या सरी । परशा घेवोनि येतीं ते अवसरी । जन संमर्द ये आनंद भरी । जंगम तृप्ती कारणं ॥७८॥ ऐसा समारंभ निरंतर । चालला हो घनघोर । जंगम म्हणतीं पुरेपुरे । कवण्या तोंडे जेविजे ॥७९॥ रावणा होते दहा तोंड । आम्हासी दिले एकचि तोंड । का न दिला आणिक तोंड । होते आम्हा बहु सुख ॥८०॥ कोणी म्हणतीं एकचि पोट दिला । आणीक असता होता भला । काय करू ये वेळा । उपाय अमुचा खुंटला ॥८१॥ विनोदे माहेश्वर बोलतीं । नित्य मिष्टान्ने तृप्त होतीं । श्रोतीं ऐकावे गुरु चरित्रा प्रतीं । चित्त देवोनि एकसरे ॥८२॥ मुरकीचा संगप्पा बाळूरे । स्वामी सन्निध आला चिंतातुर । साष्टांगे करोनि नमस्कार । स्वामी लागी विनवित ॥८३॥ कवण संबंध बाधा स्वामी । शिरले आमुच्या गृही नेमी । जन्मलिया बाळा लागोनी । अपहार करीतसे ॥८४॥ यासी काई उपाय सांगिजे । दीनाचे वंश

उद्धरिजे । संपत्ती असोनि काय कीजे । संतती विणे संसारी ॥१८५॥ ऐसी भक्ताची विनवणी । ऐकोनिया श्रवणी । स्वामी म्हणती तया लागुनी । गुरु वचनी भरंवसा असे का ॥८६॥ असेल जरी दृढ निश्चय । मंगळसूत्रा पासोनि कीजे व्यय । जंगमाचेनी तृटी न पडावे । संतान पावे वृद्धीसी ॥८७॥ धन पाहिजे की संतान । एकचि साधेल तुज लागोन । नसता हा दुष्कर्म निःसंतान । करील कीरे निश्चये ॥८८॥ संगप्पा म्हणे श्रीसी । स्वामी यावे आमुच्या सदनासी । आपुली आज्ञा जैसी । तैसा वर्तन स्वामिया ॥८९॥ तथास्तु म्हणोनि श्रीगुरू । मुरकीस जाती सपरिवारू । आस्थान दिधले परिकरू । मठपति यांच्या गृहांत ॥९०॥ संगप्पाच्या गृहामाजी । लिंगार्चन करिती गुरुजी । रुद्रावर्तना लागी । एकादश पंडित बोलविती ॥९१॥ एकादश नारिकेळा । द्वाविंश क्रमुक नागवेल । एकादश रुद्र पूजा सोज्वळ । षोडशोपचारे करितातीं ॥९२॥ एकादश वस्त्रे दक्षिणा । नित्य देतीं पंडिताना । न्यासदिगबंध भूसूक्त विधाना । पठण करिती स्वरासह ॥९३॥ पाणि मंत्र पंच ब्रम्ह मंत्र । मृत्युंजय पंचाक्षर मंत्र । पुरुष सूक्त शतरुद्र । महिमा अपार ग्रंथांतरी ॥९४॥

॥ कैवल्योपनिषद ॥ यःशतरुद्रीयमधीते सोऽग्निपूतोभवति । स्वर्णस्तेयात्पूतोभवति । सुरापानात्पूतोभवति । ब्रम्हंहत्यातःपूतोभवति ।
कृत्याकृत्यात्पूतोभवति । तस्मादविमुक्तमाश्रितोभवति । अत्याश्रमीसर्वदासकृद्वा जपे दनेन ज्ञान
माप्नोति संसारार्णव नाशनं तस्मादेनं विदित्वैनं कैवल्यं फलमश्नुते ॥१९५॥

जो करी शतरुद्रीय पठण । तो होय अग्निपूत सुवर्ण । मुक्त होय सुवर्ण स्तेया पासून । पवित्र होय सुरापी ॥९६॥ ब्रम्ह हत्ये पासाव मुक्त होय । कृत्याकृत्य सर्व दूर होय । भस्म रुद्राक्ष धारण करोनि पाहे । जपे रुद्र सूक्तासी ॥९७॥ सकळ पापा पासोनि । मुक्त होय ततक्षणी । आणीक होय महा ज्ञानी । संसारार्णव पार तरी ॥९८॥

॥ श्लोक ॥ भस्म दिग्ध शरीर स्तुभस्म शायीजितेंद्रियः । संततं रुद्रजाप्येसौ परांमुक्ति मवाप्स्यति ॥१९९॥
रोगवान्पापवांश्चैव रुद्रं जप्त्वाजितेंद्रियः रोगात्पापाद्विनिर्मुक्तो ह्यतुलं सुख मश्नुते ॥२००॥

अंगी भस्म चर्चून । भस्मामाजी कीजे शयन । रहावे जितेंद्रियान । रुद्रावर्तन साधिजे ॥२०१॥ तरी तयाच्या कर कमळी । मुक्ति वसे सर्वकाळी । आणि करोनी पापे सकळी । रुद्रावर्तने विमुक्त ॥२॥ ऐसा हा रुद्र महिमान । मुक्त करी पापांतुन । संतती संपत्ती धन धान्य । समृद्ध होय तया गृही ॥३॥ सविधाने एकादश दिन । आवर्तने करिती गर्जोन । तव संमंध बाधा सांदी धरोन । बैसले लपोन तया गृही ॥४॥ तव स्वामीनी संमंधासी । निघोनि जाण्या आज्ञापिती । समंध गेले निश्चिती । एकादश दिवसांत ॥५॥ ऐसे एकादश दिन । शत रुद्राचे करिती आवर्तन । नित्य नवे पक्वान्ने । तृप्त करिती माहेश्वरा ॥६॥ ग्रामीचे परस्थळीचे माहेश्वरा । विन्मुख जाऊ न

देतीं माघारे । जेवोनि तृप्त होतीं चर । पुरे पुरे म्हणोनी ॥२०७॥ नित्य घृताक्त भोजन । जिभेची रुची गेली जाण । लिंबूचे लोणच्याविणे । घास एक गिळेना ॥८॥ शेवटी केळीचे भोजन । होतेहो समारंभ महान् । एका माहेश्वरा लागून । केळी एक तूटी पडली ॥९॥ ते दिनी सायंकाळी । समंध ये समयाचारी जवळी । ओसरी वरोनि भूतळी । स्वामी लागी लोटिले ॥१०॥ तव समयाचारींचे । दंत पंगती गळाले साच । तव पादुका स्वामीसी उमजताच । क्रोधें भरले अनिवार ॥११॥ मुरकीहूनि निघोनि जाती । जानापुर नदींत प्रवेशती । नदीमाजीच अनुष्ठितीं । मत्स्य खादती सर्वांग ॥१२॥ ऐसे एकादश दिन । तपे तपतीं रात्रंदिन । सरो की मरो म्हणोन । समंध गेले देशोधडी ॥१३॥ तयां जानापुरीच जाणा । स्वतंत्र नेमिती जंगमार्चना । सहस्रावधि केळी आणोन । सहस्र जंगमार्चन करितातीं ॥१४॥ तांबूल दक्षिणा देऊन । तृप्त केले माहेश्वर मन । ऐसे खडतर तपे करून । विपत्क्षालन करिताती ॥१५॥ तया संगप्पाचे समंध गेले पळोन । गृह भरले संतती संपत्तीने । ऐसे परोपकारी अनुदिन । काळ क्रमितीं सद्गुरू ॥१६॥ तेथोनि येतीं उदयगिरीसी । लिंगानंदी राहती अहर्निशी । पुढतीं निघती संचारासी । जगदोद्धारा कारणे ॥१७॥ संचारांत असता जाण । जिथे तिथे करितीं जंगमार्चन । जंगमार्चनचि जीव प्राण । झाला असे स्वामीसी ॥१८॥ संचार करीत करीत । थोटवाडीसी येतीं अकस्मात । बिनावा स्वीकारोनि द्वादश खेड्याप्रत । स्वामी येती तेधवा ॥१९॥ तेथे बहुत शिष्य समुदाय । स्वामीसी राहवितीं पाहे । जंगमार्चन नियमित स्वयें । शिष्य वर्ग चालवितीं ॥२०॥ कांहीं काळ तेथे क्रमोनी । शेळगावा आले स्वामीनी । स्वामींचे आगमन श्रवण करोनी । येतीं बाईसाहेब रुद्रूरचे ॥२१॥ त्यांचे नाव कृष्णाबाई । येवोनि लागतीं श्रीगुरु पायी । रुद्रूरासी ये समई । चलावेजी गुरु राया ॥२२॥ तथास्तु माये म्हणोनी । श्रीगुरू जातीं रुद्रूरा लागूनी । षण्मास क्रमितीं जंगमार्चनीं । देशमुखा भवनी आनंदे ॥२३॥ नित्य चाले जंगमार्चन । मिष्टान्ने करवितीं नित्य नूतन । जंगम तृप्त केले दान दक्षिणं । सहस्र दक्षिणा श्रीगुरुसी दिले ॥२४॥ निराभारी श्रीगुरू । करितीं जंगमार्चनेचा विचारू । प्रस्थ मांडिले परिकरू । सहस्र जंगमार्चनेचा ॥२५॥ आले ते सहस्र धन । जंगमार्चनी व्यय करून । आंध्रा लागी त्यागून । मराठवाड्यां येतातीं ॥२६॥ संचार करीत करीत । येतीं स्वस्थळ उदगिरीं प्रत । स्थिर होवोनि मठांत । प्रस्थ करितीं आठा दिशी ॥२७॥ मरिदेवासी सत्वरी । पाठवितीं संचारो ते अवसरी । मागाहूनि दूता करी । द्रव्य लौकरी आणवितीं ॥२८॥ ऐसे असता एके दिनी । लाळी ग्रामासी दूत पाठवोनी । पत्र दिले शिष्या लागुनी । की शतार्ध धन पाठविजे ॥२९॥ तरी तो शिष्य कृपण । लोटिला माघारे दूता लागुन । पुनः पाठवितीं शतमान । पाठवी धन म्हणोनी ॥३०॥ तवही केला माघारे । द्विशत पाठवी म्हणतीं बरे । [illegible] परतवी माघारे । चतुःशता कारणे पाठवितीं ॥३१॥

म्हणे हो कोठोनिया द्यावे । चपराशा पाठवितीं पुनः पुनः पाहे । काय पुरोनि भरोनि ठेविले आहे । कोठीमाजी धनराशी ॥३२॥ जितुके म्हणजे तितुके मागती । मागण्यासी नाही मिती । मजकडोनि कवडीचीही संप्राप्ती । होत नाही सांगिजे ॥३३॥ तव दूत परतोनि आला । स्वामीनी तयासी बहिष्कार दिला । हे ऐकोनि तयाची अबला । पंचशत धन घेवोनि ये ॥३४॥ तियेची वार्ता ऐकोनी । स्वामी सांगतीं दूता लागुनी । अंतरी येऊ न द्या तिज लागुनी । बहिष्कृत जाण अमंगळ ॥३५॥ तुम्ही मठांत प्रवेशू नये । स्वामींची आज्ञा उल्लंघू नये । ऐसे ऐकता वचन माय । केले काय तेधवा ॥३६॥ शिव बसप्पा मोदी मठपती । तयाच्या गृहासी जाय सतीं । मोदीच्या चरणी साष्टांग निगुतीं । दंड प्रणाम घोलिते ॥३७॥ कवण माये तुम्ही । काय सांगूजी स्वामी । कृपण दुर्जन पापी आम्ही । कोपले गुरुस्वामी आम्हावरी ॥३८॥ इत्थंभूत वर्तमान । सांगे शिव बसप्पा लागुन । दुःखे करी महा रोदन । कृपा संपादना गुरूचिया ॥३९॥ करुणा हृदयी शिव बसव स्वामी । येतीं श्रीगुरूचे आश्रमी । श्रीगुरूंच्या चरणी । नमस्कार करितातीं ॥४०॥ गुरुदेव म्हणतीं उठावे । मोदी म्हणे मज वचन द्यावे । श्रीगुरू म्हणतीं बरवे । तथास्तु ऊठ बाळारे ॥४१॥ म्हणता शिव बसप्पा उठला । बाईचे वर्तमान निवेदिला । क्षमा कीजे अपराध्याला । पंच शत धन घेवोनी ॥४२॥ अरे ! तया गुरु द्रोह्यांचे धन । अमुच्या दासोहा नलगे जाण । शिव बसप्पा वचन । पाळावे की गुरुवर्या ॥४३॥ ऐसा जरी तुझा मानस । दर्शना नाणी तियेस । शुद्धीपत्र देवोनि त्यांस । घेई काणिका तिज कडोनी ॥४४॥ बाईसी देती शुद्धीपत्र । काणिका घेती पवित्र । कोशागारा पाठविती शीघ्र । आज्ञा देती बाईसी ॥४५॥ तयांचा शब्द दोष काढुनी । बाईसी धूळ पादोदक देउनी । आज्ञा देतीं दर्शना लागुनी । पंङ्क्ति पावन करिताती ॥४६॥ उदयीक सहस्र जंगमार्चन । उरकोनि जाइजे गृहा लागोन । तुमचे तुम्ही ध्या करून । निमित्त मज लागुनी केलोतीं ॥४७॥ म्हणोनिया जंगमार्चना आरंभ करितीं प्रेमे जाणा । मिष्टान्ने पक्वान्ने अतिथींना । तृप्त करिती तेधवा ॥४८॥ सहस्र भोजन उरकुनी । बाई जातीं गृहा लागुनी । पतिराया गुरु महात्म सांगुनी । तेही जंगमार्चन करितातीं ॥४९॥ आशा विरहित होऊन । वर्ततीं श्रीगुरु अनुदिन । धन कनक वस्त्राभरण । वमना समान जाणतीं ॥५०॥ जंगमार्चनचि प्राण । होवोनि राहिले निशिदिन । जंगमार्चने वांचोनि शून्य । वाटे दिन वर्ष पै ॥५१॥ त्रिकाळी विरचितीं लिंगार्चन । नित्य नेमे चालवितीं जंगमार्चन । अनुभव शास्त्र सद्भक्ता लागुन । नित्य नेमे बोधितीं ॥५२॥ ऐसा कवण माहेश्वर । विगत कल्मष निरहंकार । आय व्ययाचा नाही विचार । परोपकारचि स्वधर्म ॥५३॥ ऐसी मूर्ती दुर्लभ अवनी । विचरताती निस्पृहे करोनी । दासोहंभावे वर्ततीं जनी । भक्तिमार्ग प्रस्थापितीं ॥५४॥ इतिश्री हावगिलिंग लीलामृत । श्रवण मुखे प्राशन करा

सेवेंत ॥२१॥ तव भृत्यांसी आज्ञापिती । स्वयंपाक कीजे द्रुत गतीं । सुलोचना षटसंमार्जन करिती । रंगवल्ली घालिती प्रेक्षणीय ॥२२॥ भांडे बासन धुवोनि देतीं । भृत्ये स्नान करोनी येतीं । तैसेचि शुद्धोदक आणितीं । संपादितीं पत्रपुष्प ॥२३॥ स्वामीसी म्हणती करावे स्नान । शुद्धोदक ठेविलो स्नाना लागुन । श्रीगुरु जंगम स्नान करोन । धौतांबर नेसतीं ॥२४॥ मग आसनी बैसुनी । निमग्न होती इष्ट लिंगार्चनी । अष्टविध उपचारे पूजा सारुनी । जंगमार्चनी शिद्ध होतीं ॥२५॥ साष्टांगेसी नमन करिती । पाद पूजेसी स्थिर होती । अष्टोपचारे पाद पूजा करितीं । पादोदक साधितीं भक्तीने ॥२६॥ तव चरमूर्ती तये क्षणी । क्रियोदके लिंगाभिषेकुनी । लिंगोदक सद्भावे करोनी । सेवन करितीं चरवर्य ॥२७॥ मागाहुनी श्रीगुरू । पादोदक सेवितीं सुविचारू । मग भृत्य शिष्यादि परिकरू । पादोदक स्वीकारिती ॥२८॥ यजमानासी बोलावितीं । त्यानाही पादोदक देती । पंडितसी बैसवितीं । भोजनासी तेधवा ॥२९॥ सर्वत्रा भोजना बैसविले । लिंगार्पितासी ओगरिले । सकळ पदार्थ वाढोनि ते वेळे । महालिंगार्पित करा म्हणती ॥३०॥ यजमाना सांगतीं नमस्कारी । धन धान्य समृद्ध होवो घरी । केव्हांही एंशाच परी । गुरुचर सेवा करावे ॥३१॥

॥ श्लोक ॥ क्षीर कुंभ सहस्राणि घृत कुंभ शतैरपि । शिवयोगी भिक्षा मात्रेण कोटियज्ञ फलं भवेत् ॥३२॥
विप्रकोटि सहस्रेषु एक घंटा महाध्वनिः । चरलिंगं तृप्तस्या भोज्य भोज्यस्य घंटाध्वनिः ॥३३॥

जयजय पार्वतीं पते । हर महादेव नमस्ते । म्हणोनिया समस्त । लिंगार्पण करितातीं ॥३४॥ आनंदे लिंगार्पित करोनी । तृप्त झाले सकळ जनी । मग आपुले जुने वस्त्रे शिष्या लागुनी । आशिर्वाद देतातीं ॥३५॥ धनधान्य संततीं । सदैव लाभो तुम्हा प्रतीं । ऐसीच गुरु चरणी प्रीतीं । असू द्यावी सर्वदा ॥३६॥ म्हणोनिया आशिर्वादिले । शिष्या लागीं तये वेळे । यजमानासीही भले । आशिर्वचन देतातीं ॥३७॥ तेथोनिया प्रयाण करितीं । एका श्रोतीं श्रीगुरूंची महतीं । श्री आशिर्वाद शिष्या प्रतीं । अनंत रूपे फळले हो ॥३८॥ एका संवत्सरामाजी । दशसहस्रपति झाला सहजी । संताने नव्हतीं गृहामाजी । संतानाने गृह भरले ॥३९॥ दोन क्षेत्रे संपादिले । माजी गुऱ्हाळ पेरिले । दोन मास चालतीं भले । दोन चरके अहोरात्र ॥४०॥ गूळ ठेवण्या जागा नाही । तैसेचि अष्टादश धान्ये तेही । पिकू लागले क्षेत्र पाही । ठाव नाही धान्यासी ॥४१॥ श्रीगुरूंच्या आशिर्वादे । दुग्धा ऊतु यंत मोदे । तैसे शिष्या गृही आनंदे । लक्ष्मी नाचू लागली ॥४२॥ गार्यी वृषभ गोरे बहुत । दुधाळ म्हैसी दुभती बहुत । अन्न वस्त्र दूध दुभते । गृही भरोनि उरले की ॥४३॥ पहा कैसा श्रीगुरूंचा महिमान । न कळे अज्ञ जना लागुन । गुडप्पा कलिशेट्टी कृतार्थ होऊन । गुरु आशिर्वचन आठवी सदा ॥४४॥

श्रीगुरु राया तू सदया । अनिमित्त बंधू सह्रदया । अतिथि रूपे तू येवोनिया । कैसी माया दाविली ॥४५॥ दारिद्र्य वन सहस्र किरणे । शुष्क झाले कीं तृण । अनिमित्त बंधू मेघ वर्षुन । अमृतांकुर फुलविलासी ॥४६॥ कैसे केलो माझी परी । दारिद्र्य गेले देशांतरी । उतराई हो कैशा परी । शिष्य संताप हारका ४७॥ बहुत असतीं गुरु जन । शिष्य वित्तासी करिती हरण । विरळ असतीं सद्गुरू जन । शिष्य संताप हरणारे ॥४८॥

॥ श्लोक ॥ गुरवो बहवस्संति शिष्य वित्ताप हारकाः । गुरवो विरलाःसंति शिष्यसंताप हारकाः ॥४९॥

श्रीगुरुसी चतुर्भाग । अर्पण करी महाभाग । धन धान्य गोवस्त्र तुरग । सकळ संपत्ती पाठवी ॥५०॥ ऐसी निष्ठा धरोनी । वर्ततसे शिष्य सद्गुणी । वार्षीक चतुर्भाग उत्पन्नांतुनी । पाठवीत सदैव ॥५१॥ हे पाहोनि भक्त मंडळी । आश्चर्य करिती सकळी । गुरू कृपेची नवाळी । ब्रम्हादिकां अतर्क्य ॥५२॥ वांझ गायी प्रसूत होती । दारिद्र्य जावोनि येई संपत्ती । शुष्क वृक्ष फलभारे लवती । सकळ संपत्ती गुरू कृपे ॥५३॥ जे गुरू अतिथीसी अवमानिती । दग्ध होय सकळ संपत्ती । नाही त्या विपत्ती । चालोनि येतीं गृहासी ॥५४॥ ऐसे शास्त्रेही बोलतीं । अनुभव असे सकळां प्रतीं । जगी साधू संतांची होय आवृत्ती । जगदोद्धारा कारणे ॥५५॥ पूर्वी ऐसाचि घडला प्रसंग । शिष्य गृहा येती गुरु निःसंग । दारिद्र्ये ऐश्वर्य केले भंग । पक्ष्यांसी धान्य मिळेना ॥५६॥ सांतःकरणे स्वागतिले । सद्गुरुसी ते वेळे । श्रीगुरूंचे धूतले । पद कमळे उष्णोदके ॥५७॥ सतीं द्रव पुसते कवरी भारे । साष्टांगे करितीं नमस्कार । सति पतीं करिती विचार । अंतर्गृही जाउनी ॥५८॥ गृही नाही पसाभरी धान्य । कुणी न देतीं मीठ उसणे । उसण्याची फेडवण । नाही झाले माघारी ॥५९॥ कैसा आला दुर्धर समय । गुरु सेवा कैसेनि करावे । तव उतरंडिया उतरोन पाहे । असेल कांहीं म्हणोनी ॥६०॥ कवण्याही मडक्यांत कांहीं नाही । एका मडक्यांत होते राई । तेचि घेवोनिया पाही । विचार करी तेधवा ॥६१॥ या विरहित कांहीं असावे । तरी शपथचि राहावे । सतींसी म्हणे पतिदेव । कैसे उपाव कीजेल ॥६२॥ मोहरी दळोनि ये अवसरी । करिते तयाची कण्हेरी । निर्वंचक अंतुरी । केली कण्हेरी राईची ॥६३॥ सद्गुरुही सहजानंदी । शिवार्चन करिती प्रेमानंदी । अनपेक्षित प्रसाद सेवोनि आनंदी । आशिर्वादिती ऐश्वर्य ॥६४॥ पुढतीं बहु दिवसा आले । सतीं म्हणे संपत्ती वाढले । तयासी कारण मोहरीच झाले । आजिही तेचि करावे ॥६५॥ तरीही आजी तिख्यांचाचि क्षीर । करोनि वाढू परिकर । म्हणोनि शोधी गृहा भीतर । पसाभरी तिख्या न मिळती ॥६६॥ हिंडोनिया दारोदारी । आणिली की बाई मोहरी । तयाची करोनिया कण्हेरी । श्रीगुरूसी वाढिली ॥६७॥ जितुके होते तितुकेचि राहो । देती आशिर्वाद

गुरुरावो । गारापरी विराली संपत्ती पहा हो । तिल्याही नुरले फोडणीस ॥६८॥ असेल ते निर्वंचक भावे । गुरु चर सेवा करावे । धुंडोनि का आणावे । तिल्ये धत्तूरे इंद्रावण ॥६९॥ गुंडप्पा नोहे दांभिक । तो होता सत्य भक्त । नव्हते तेव्हां निराशे युक्त । असता सर्वही गुरूचे ॥७०॥ सद्‌गुरूनी नाही दिले । तरीही आनंदचि मानिले । आजि गुरूनी दिले । ऐश्वर्य सगळे गुरूचे ॥७१॥ माझे यांत काय आहे । देणार घेणार तोचि पाहे । मी निरंतर सेवक आहे । सद्‌गुरूंचा ॥७२॥ ऐसा जयाचा भाव । तयासीच म्हणावे शिष्यत्व । येरवी गुरुशिष्य भाव । व्यावहारीक जाण ॥७३॥ आणीक एक ऐका इतिहास । कल्याणीचा विशेष । तैलिक मल्लिशट्टी निरास । शिवभक्त निःसीम ॥७४॥ एक बैल एक सती । सकळासी एकेकचि डोळे असतीं । धन धान्य वस्त्रे तापत्री । कष्टी होतीं अहर्निशी ॥७५॥ एकचि बैलाचा घाणा । परी तयासी मिळेना दाणा । घाणा घाणचि जाणा । ऐसा तया संसृतींचा ॥७६॥ कोणी सद्‌भक्तीं दया येउनी । आणीक एक दिधले वृषभा लागुनी । चारविण्यासी एके दिनी । जातसे रानी कलिशट्टी ॥७७॥ वर्षा काळीचे दिन । चिखल झाले मार्गी जाण । चिखलामाजी वृषभ रुतून । पडले बसून न उठती ॥७८॥ पुच्छ धरोनि उठविता न उठतीं । बोलवी वाटसरू प्रती । येवोनि वृषभा पाहतीं । नुउतीं म्हणतीं हे बैल ॥७९॥ ग्रामी जावोनि लोका बोलवी । कोणीही न येतीं संध्या समई । आता करावे उपाव काई । म्हणोनि चिंती कलिशट्टी ॥८०॥ कवणासीही न ये करुणा । तोंड वसरोनि बाहता जाणा । तव शिवयोगियांचा राणा । वेडा रेवणशिद्ध पाहिला ॥८१॥ अरे तू मी होऊन । उठवू ये बैलासी जाण । अरे ! वेड्या दहापांच माणसान । न उठतीं की हे वृषभ ॥८२॥ तुज मज कैसे उठती । दोघालागी अवचितीं । म्हणोनि रेवणसिद्धे हंसतीं । ताडितीं दंडे वृषभासी ॥८३॥ धाडकन् दोन्ही उठले । पुच्छ उभारुनी पळू लागले । तव रेवणसिद्ध हंसू लागले । कारे उठविले नाही तू ॥८४॥ तव कलिशट्टी घाबरला । योगिया विचारू लागला । तू राहतोसी भला । कवण्या ठाई ॥८५॥ कवण स्थळ कवण ग्राम । कवण कुटुंब कवण नाम । सांगे मज सुगम । वेड्यासम भाससी ॥८६॥ तव म्हणतीं रेवणसिद्ध । मी आहे स्वयं सिद्ध । स्थळ की परस्थळ विशुद्ध । देश सबंध माझाची ॥८७॥ सर्वां ठायी माझी वसतीं । बांधलो नाही कवणा प्रतीं । मज नाव वेडापिसा म्हणतीं । लोकामाजी जाणपां ॥८८॥ ऐकोनि गुरुवर्यांचे वचन । कलिशट्टी म्हणे वेड्या लागुन । राहतोसी का आमुच्या गृही ये क्षण । राहेन म्हणती सिद्धगुरु ॥८९॥ दैवेंचि दिधले मजला । म्हणोनि कलिशट्टी संतोषला । वेडा पिसा आहे भला । आम्हा लागी सोबतीं ॥९०॥ जाऊ चला गृहासी । म्हणता येई सुखरासी । संतोष झाला कलिशटटीसी । धान्यासी तुटी असो का ॥९१॥ संतोषामृते जे तृप्त असतीं । ते न लाभे धनिका प्रतीं । खाजी भाजी असेना निगुतीं । आनंदे जेविती रेवणसिद्ध ॥९२॥ ब्राम्ही मुहूर्तीं उठोन । घाणा जुंपी अवसरे रेवण ।

बहुतांचे तैलकण । ततक्षण पिळूनि दे ॥९३॥ गिऱ्हाईक वाढले फार । माझे तुझे म्हणती सत्वर । अविश्रांत उद्यमी तिळमात्र । विश्रांतीसी न घेची ॥९४॥ ऐसा सतत उद्योग करी । घाणा चालवी अहोरात्री । तिळ कारळे करडया घरी । आणोनि व्यापारी ठेविती ॥९५॥ जेथे शिवयोगी काम करी । काय उणे तया घरी । राबतीं वृषभ चारि । गजा परी रात्रंदिन ॥९६॥ ऐश्वर्य वाढू लागले । कल्लिशट्टीसी आनंद झाले । यया वेडयाचे पाउले । ऐश्वर्य वाढले आमुचे ॥९७॥ हूं आणावे तिळकण । आताचि पिळूनि देईन । तृटि न लागता ततक्षण । घाणा उतरोनि देतसे ॥९८॥ एके दिवसी वृषभ । उत्पटिले की स्तंभ । नंदि मुद्रांकित भरोनि कुंभ । सुवर्णाचे निघाले ॥९९॥ तया रेवणे पाहोनी । कांबळी वरती झांकोनी । सतीलागी दे तये क्षणी । कल्लिशट्टीच्या तेधवा ॥१००॥ ययाचेनि धान्य आणोनी । चालविजे घाण्या लागोनी । तुझे दैन्य गेले पळोनी । दिगंतरा माजी पैं ॥१०१॥ दरिद्र कल्लिशट्टी झाला धनवान । आश्चर्य करिती लौकीक जन । तिकडे बिज्जळ गृही लग्न । नेमिले हो तयाने ॥२॥ ग्रामीच्या तैलकारासी । बोलाविलं सर्वत्रासी । आज्ञापिता सकळासी । आले सर्व तैलिक ॥३॥ शरणार्थं म्हणतीं कवण आज्ञा । सांगावेजी सर्वज्ञा । सेवा करू प्राज्ञा । घडेल ते बोलती ॥४॥ तव बोले बिज्जळ राव । आम्हा असे तैलाचा उणीव । शत खंडी तैल अभिनव । सर्वत्रानी अर्पावे ॥५॥ तव म्हणती तैलकार । आजवरी सेवा केली निर्धार । कधी नाही दिला पावसेर । दरिद्र कल्लिशट्टीने ॥६॥ आजवरी होता निर्धनिक । आजि झालासे महा धनिक । आता शत खंडी तोचि एक । तैल संपूर्ण भरावे ॥७॥ झालियावरी देवाची दया । मागे पुढे व्हावे कासया । बोलवावे या समया । कल्लिशट्टी लागोनी ॥८॥ राव बोलवी कल्लिशट्टीसी । आज्ञापिले तयासी । आजवरी दिलं तैलासी । ग्रामीचे हे तैलकार ॥९॥ आम्हासी शत खंडी तैल । तुम्ही एकलेचि द्यावे लागेल । लग्नाचें कार्य सांग पावेल । इतुकेचेनि योगाने ॥१०॥ ऐकोनि रायाचे वचन । कल्लिशट्टी म्हणे विचारून सांगेन । एकना दोन तीन । शत खंडी तैल हे ॥११॥ गृहा येवोनि विचारी वेडयासी । तो म्हणे सांगा रायासी । पाठवा म्हणावं तैलकणासी । अविलंबे करोनी ॥१२॥ राव ऐकोनि शट्टींचे वचन । पाउवी तैलकणा लागोन । मारी मसणी बोलाऊन । तैल रात्रंदिन काढितीं ॥१३॥ सहस्त्रावधि बुदल्या भरितीं । नेणार पुरे पुरे म्हणतीं । घाण्यासी तैलकण न पुरतीं । तैल काढितीं आपुल्या कणे ॥१४॥ लग्नाच्या आधी । सहस्र खंडि तैलनिधी । अर्पी रायासी गुणनिधी । कल्लिशट्टी तेधवा ॥१५॥ सति पतींसी आश्चर्य झाले । दुजियासीही विचित्र वाटले । रात्रंदिन घाणा चालं । आपण लोळे मंचकावरी ॥१६॥ ऐसे असता एके समई । सति पति पाहती वृषभालयीं । सुवर्ण मंचकावरी पहुडले पाहीं । गण गंधर्व सेवा करितीं ॥१७॥ सहस्र किरणांचा तेज । फांकले वृषभालयी तेजःपुंज ।

दिव्य देही पहुडले सहज । वाटले चोज सति पतिसी ॥११८॥ सुवर्ण किरीट कुंडले । झळकताती तेजागळे । कटि पीतांबर झळझळ । कंठी अक्षमाळा इष्टलिंग हृदयी ॥१९॥ मंचकावरी दिव्यास्तरणा । योगिराज पहुडले आनंदाने । किन्नर गंधर्व पाद सेवनी । मी तू म्हणोनी कुजबुजती ॥२०॥ तव कल्लिशट्टी आणि सतीं । तोंडी बोटे घालितीं । ही केवल शिवमूर्तीं । कैसी गतीं आमुची ॥२१॥ कैसे आम्ही शिवद्रोही । अपराध घडला ये समई । सेवा घेतलो तुम्हा करवी । गुरु द्रोही मी झालो ॥२२॥ तुमचिया चरण कृपेन । संपत्ती लाधली दासा लागुन । दीनदयाळो क्षमापन । करोनि दीना उद्धरिजे ॥२३॥ वृषभते डोळस झाले । गजा सारिखे मदे भरले । अपराधी मी गुरुमाउले । चरणी लोळे कल्लिशट्टी ॥२४॥ कैसा हा वेडयाचा बाजार । परोपकारी तनु साचार । झिजविता परी मी अविचार । सेवा तुम्हासी लाविलो ॥२५॥ तुज म्या नाही जाणिलो । सेवक जाणोनि घाण्यासी लाविलो । दयाळो कैसा मी अपराधी झालो । पापी झालो या भुवनी ॥२६॥ मूढत्वे अपराध घडला । क्षमा कीजे पतित बाळा । म्हणोनि रुदन करू लागला । कल्लिशट्टी आक्रोशे ॥२७॥ तव रेवणशिद्ध म्हणतीं । तुझिया कळवळ्यासी पाहोनि चित्ती । उद्धरावया तुज प्रतीं । आलो बाळा तुज सवें ॥२८॥ तरी आता मी जाईन । देश पर्यटना कारण । म्हणोनि जातीं ततक्षण । रेवणशिद्ध जगद्गुरू ॥२९॥ ऐसे शिवयोगियांची लीला । ग्रंथांतरी वर्णिला । कुमठे ग्रामी गुरु लीला । अगाध अपार वर्णितीं ॥३०॥ पादुका स्वामी देश संचार । करोनि येती गुरुवर । उदयाचल मठी स्थिर । लिंगानंदी राहतातीं ॥३१॥ ऐसे असता एके समई । माळेगावाहूनि पाही । अश्वाची शिंगी आणवोनी लवलाही । संरक्षिती अति प्रेमे ॥३२॥ खादविती दुग्ध चणक गोधूम क्षीर । आणविती कोमल दर्भांकुर । मलिदादि खाद्ये अपार । शिंगी उन्मत्त झालीसे ॥३३॥ शिक्षणासी सवार ठेविले । नाचावयासी शिकविले । रेशमी खोगीर करविले । तैसेचि लगाम रेशमी ॥३४॥ साहित्य सर्व सिद्ध करिती । स्वामी शिंगीवर आरूढतीं । दोही बाजू बागडोरे लावितीं । सेवका धरविती तयासी ॥३५॥ शिंगी स्थिर चालेना । उडी मारीं धावण्या । धाम धूम करोनि तये क्षणा । बागडोर हिसकावी ॥३६॥ धावू लागली उड्डाणे करीत । पळत सुटले राजबीदींत । विस्मृती झाली स्वामी प्रत । देहभान हरपले ॥३७॥ संमुख न येतीं कोणी । अडविता पळे अडरानी । जन जत्रा असंख्य मिळोनी । म्हणती स्वामींचा घात होय ॥३८॥ शतावधि जन पाठी लागले । शिंगीच्या कानी वारे भरले । कवण्या झाडासी नेवोनि आदळे । म्हणतीं न कळे जनांग ॥३९॥ गुरूसी परम गुरूचि त्राता । तयाविण नसे की दाता । यया संकटासी परि हर्ता । माता पिता तोचि असे ॥४०॥ इतुकियांत काय झाले । श्रवण कीजे श्रोतीं भले । दिवंगत सद्गुरू समक्ष उभे राहिले । चपराशी वेष बसवलिंग ॥४१॥ दंडाग्रासी पाहता । वारू स्तब्ध झाले तत्वता ।

सर्वत्रांची गेली चिंता । चपराशा पाहता अदृश्य ॥१४२॥ जन म्हणती हो कवण चर । अकस्मात आला समोर । शिंगी स्थिरावली सत्वर । कैसी विचित्र करणी ही ॥४३॥ मागा सत्येंद्र चोळाचा सुत । मंत्रलक्ष नामे गुणवंत । दुजा आमात्यांचा सुत । नाम असे मितवचन ॥४४॥ दोघे अति स्नेहें वर्तती । येता सिंध देशीचे वारू नगरा प्रती । दोघेही दोन वारू घेती । अप्रतिम ते समई ॥४५॥ दोघेही दोन्ही वारूंसी संरक्षिले । वारूंना बाहेर काढिले । नव वारुवांवरी बैसले । जाती शिकारीसी दोघेही ॥४६॥ अनेकारण्य संचारुनी । येती दोघेही पट्टणी । दृष्टी न पडती वारू ते क्षणी । वाऱ्यापुढे धावती ॥४७॥ राजमार्गी एक बाळ । खेळत होता लडिवाळ । वारुच टाप लागोनि तत्काळ । गतप्राण जाहला ॥४८॥ वारू वाऱ्यापरी गेले । कुणी पाहिले न ऐकिले । परी बाळ गतप्राण झाले । धाय मोकलिती माता पिता ॥४९॥ जन सकळ हळहळती । कवण बोलावे थोरां प्रती । हंबरत बाळा घेवोनि जाती । दरबारा प्रती माता पिता ॥५०॥ आक्रंदोनि बाळा दाविती । एकुलत्या चिमुकल्याची ऐसी गती । झाली आमुची दुर्गती । कवणा सांगू ये वेळी ॥५१॥ राव बोले गर्जोनी । कवण अपराधी सांगा ये क्षणी । माता पिता म्हणती राज वारुनी । घेतला प्राण बाळाचा ॥५२॥ राज वारू कवण सोडिले । आमात्यासी विचारिले । आजि मंत्रलक्ष मितवचन गेले । शिकारीसी निश्चये ॥५३॥ बोलवा म्हणताचि दोघांसी । तत्काळ येती गुणराशी । म्हणे या चिमुकल्या बाळासी । वारू कुणाचा तुडविला ॥५४॥ तव मितवचन । पुढे बोले सरसाऊन । माझिया वारुच टापाने । गतप्राण झालाजी ॥५५॥ तव बोले मंत्रलक्ष । मीचि सांगितलो तुज प्रत्यक्ष । की माझे वारुचे पाई तुझा लक्ष । ठेवोनि वारू चालवी ॥५६॥ माझे वचन नुल्लंघोनी । वारुच्या पायी वारू पळवोनी । येता झाली विपरीत करणी । माझ्या वचना अनुरोधे ॥५७॥ तरी तो अपराध । माझा जाणिजे स्वतःसिद्ध । म्हणोनि मंत्रलक्ष विशुद्ध । साक्ष बोले ते समई ॥५८॥ तव राये ते अवसरी । मारेकऱ्यांसी तत्काळ आज्ञा करी । मंत्रलक्षाचे शिर सत्वरी । छेदोनि मजसी दाविजे ॥५९॥ तव प्रधान बोलिला । मितवचनाच्या अपराधाला । शिक्षा विधिले मंत्रलक्ष्याला । हा अन्याय न पाहवे ॥६०॥ म्हणोनि स्वशिर छेदी प्रधान । नेती मंत्रलक्षा मृत्यु घाटा लागून । खड्ग घेवोनि हाती नमःशिवाय म्हणोन । स्वशिर छेदोन दूता दे ॥६१॥ देता शिर दूता करी । नमःशिवाय उच्चारी । शिर नेवोनि ठेविती राया समोरी । बोले सत्येंद्र कैशापरी शिर छेदिले ॥६२॥ ऐसेचि छेदोनि मज दिधले । म्हणोनि दूते स्वशिर छेदिले । रायाच्या पुढती शिर ठेविले । धड पडले भूमीसी ॥६३॥ आपुल्या एका पुत्रा कारण । दो शिर कमळे पडले जाण । म्हणोनि तिरुकुळनाची छेदुन । स्वशिर कमळ अर्पिले ॥६४॥ तितुकियामाजी आमात्य शिर । आपणचि येई सत्वर । पांचही शिर कमळे शिव पंचाक्षर । उच्चारिती पंक्तीने ॥६५॥

मंत्री काय कारण । घ्यावे हो स्वशिर छेदोन । आमात्याच्या शिर कमळा लागून । स्वशिर कमळ नृप अर्पि ॥१६६॥ तत्क्षणी आला मितवचन । सर्वापराधी मी जाण । माझिया वारूचे द्रुत गतींने । इतुके प्राण गेले की ॥६७॥ मीचि जरी शिक्षा भोगितो । हा अनर्थ कासया पाहतो । म्हणोनिया मितवचन तो । स्वशिर छेदिला तात्काळ ॥६८॥ हे अघटित वर्तमान । श्रुत झाले अंत:पुरी जाण । राजपत्नी अमृतवतीं धाउन । हंबरडा फोडित सभेस ये ॥६९॥ युवराज पत्नी सर्व मंगळा । तीही येई तये स्थळा । पति मोही मंत्री पत्नी ते वेळा । स्नुषेसह धावोनि ये ॥७०॥ स्वपतींच्या शिर कमळा समोर । उभे राहती सत्वर । छेदावया स्वशिर । सर्व जणीं सरसावती ॥७१॥ नम: शिवाय म्हणोनी । खड्ग उचलितीं शिर छेदनी । तव पंचब्रम्ह दश भुजानी । पांचही खड्गे आवरिले ॥७२॥ प्रत्यक्ष होवोनि पंचानन । म्हणे धन्य धन्य सत्येंद्र नंदन । सत्यासाठी जें देती प्राण । तेचि जगी अजरामर ॥७३॥ म्हणोनिया मृत्युंजय । सकळांसी कृपा दृष्टी पाहे । शिर कमळे धडासी स्पर्शता पाहे । उठतीं लवलाहे निद्रिस्तांपरी ॥ ७४॥ ऐसा हा शिव भक्तींचा महिमा । गेले सकळी निज धामा । आजिचा हा गुरु महिमा । अगाध दृष्टी पाहिलो ॥७५॥ तेथे गेले सप्त प्राण । येथे धक्का न लागला गोटया लागुन । वाऱ्यापरी राज मार्गांतून । वारू जाता न पाहिले ॥७६॥ जयासी गुरु देव रक्षी । तया काय करी यम पक्षी । ऐसे जनीं जनार्दन साक्षी । बोलताती तेधवा ॥७७॥ तव गुरु माउली परतोनि आले । गुळाचे मुद्दे दोन आणविले । गुरु समाधीसी आरती नारळे । अर्पोनिया गुड वांटितीं ॥७८॥ तव मठालागीं येउनी । सुखरूप असतीं लिंगार्चनी । भालकी देशाईची कामिनी । संमधाने ग्रासली ॥७९॥ स्वामींची ऐकोनि कीर्ती । सतींसी घेवोनि मठासी येतीं । स्वामी पायी लोळण घेतीं । संमंध परिहारा कारण ॥८०॥ तथास्तु येथेचि असावे । लिंगार्चनी संमुख बैसावे । आज्ञापिती स्वामी स्वभावे । देशाईसी ते समई ॥८१॥ देशाई पत्नीसह राहतीं । लिंगार्चनी संमुख बैसतीं । एक मंडळ झालिया वरुतीं । संमंध झाले परिहार ॥८२॥ सकळ जन धन्य म्हणतीं । श्रीगुरुची महिमा गातीं । आणिक ते म्हणतीं । गत इतिहास ऐसा असे ॥८३॥ विजय नगरी राव बल्लाळ । शूर वीर अतुर्बळ । हरिहराचार्य नामे सोज्वळ । आमात्य असे रायाचा ॥८४॥ ऐसे असता एके दिनी । बैसले असता सभास्थानीं । कर घर्षितीं आचार्यांनी । राव विचारी कारण ते ॥८५॥ सभेमाजी कर घर्षण । करणे हें महा अवलक्षण । आमात्य बोले तत्क्षण । वर्तमान हंपीचे ॥८६॥ पंपाधिपती विरूपाक्ष । तेथील असे हे साक्ष । पूजारी ठेविले धूपारतींस । देवालया माझारी ॥८७॥ द्वारी जरतारी वस्त्राच्छादिले । धूपारतींवरी वाते पडले । जळत असता हस्ते घर्षिले । झाले वाउगे यांत काय ? ॥८८॥ म्हणोनिया कर कमळ दावी । मसी लागली तळहाता पाही । भृत्या लागी पंपापुरा पाठवी । साद्यंत वर्तमान घेण्यास ॥८९॥

दूते गेला पंपापुरासी । वर्तमान पुसे पूजारियासीं । पूजारी सांगे येवोनि रायासी । अघटित घट्ना घडली जे ॥१९०॥ स्वामींची पूजा करोनि । धूपारतींत धूप घालोनी । आच्छादोनी महाद्वारा लागोनी । बाहेर नावेक स्थिरावलो ॥९१॥ छाद्यवस्त्र तये क्षणी । पडले धूपारतीवरी जाउनी । पेट घेतला अग्नी । अच्छादिलेल्या वस्त्रासी ॥९२॥ तत्काळ अग्नी शीत झाले । आचार्य येवोनि स्वहस्ते रगडिले । आचार्य निघोनिया गेले । केंव्हाची ॥९३॥ राव ऐकोनि वर्तमान । पूजारियाकरी बहुमान । पाठवोनि पंपा क्षेत्रा लागुन । आचार्य चरणी लागतसे ॥९४॥ कैसा मी दुष्ट अपराधी । स्वामी नाहीं मजला बुद्धी । सेवा घेतलो तुमचेनि दुर्बुद्धी । सहस्र अपराधी होउनी ॥९५॥ नुमजोनि घेतली सेवा । क्षमा कीजे गुरुदेवा । म्हणोनि बल्लाळे तेधवा । वस्त्राभरणा आणविले ॥९६॥ आचार्यासी दिव्या भरणे । लक्षावधि मुद्रा सुवर्ण । आणीक वार्षीक वेत्तन । पाठविण्यासी निर्धारिले ॥९७॥ तव सुखासनी आरूढवोनी । पाठवी आचार्या लागुनी । मार्गी हरिहर ग्रामीण जनी । आग्रहे राहविती आचार्या ॥९८॥ लिंगार्चन करोनिया । सकळा आशिर्वाद देवोनिया । मग जावेजी स्वामिया । स्वग्रामासी आनंदे ॥९९॥ तथास्तु म्हणोनि हरिहर स्वामी । राहतातीं तया ग्रामी । शिवपूजे कारणीं । आज्ञापिती दूतासी ॥२००॥ शिवार्चन शिवार्पण । उरकोनि बसतीं आचार्य जन । तव येतीं ग्रामीचे सज्जन । स्वामींचे दर्शन घेण्यासी ॥२०१॥ एथे असे हरिहर देवस्थान । पूजा अर्चा असे शून्य । देवालयी ब्रम्ह राक्षस शिरोन । उपद्रव करी लोकांसी ॥२॥ म्हणोनिया देवस्थानासी । कोणी न जाती दर्शनासी । ऐकोनिया जन वार्तेसी । देवालया स्वामी निघाले ॥३॥ आचार्याचे पाहोनि आगमन । ब्रम्ह पिशाच घाली लोटांगण । चरण रज स्पर्शता जाण । दिव्य देह पावला गंधर्वाने ॥४॥ आचार्य म्हणती गंधर्वासी । कवण ग्राम नाम देहासी । किं निमित्त मर्त्या आलासी । पावलासी जड देहा ॥५॥ आचार्यासी म्हणे गंधर्व । मज म्हणतीं सुमुख गंधर्व । एके दिनी वन विहारास्तव । आलो होतो विपिनासी ॥६॥ तेथ पिंगल नामे तपोधन । विषय भोग विरहित होऊन । करीतसे तपाचरण । घो.र काननामाजी पैं ॥७॥ हळूचि जावोनि पृष्ठ भागीं । भेडसावलो तया लागी । डोळे उघडोनि तो योगीं । शापी मज लागीं तत्काळ ॥८॥ तव माझे मद उतरले । सामोरे जावोनि चरण धरिले । तव योगिराज बोलिले । उःशापासी तेधवा ॥९॥ जव हरिहरांचे पाहसी चरण । तुज होय शाप विमोक्षण । तदव कृपे पिशाच्च जन्म । पावलोकी गुरुवर्या ॥१०॥ आता तुमचिया दर्शने । झाले शाप विमोक्षण । प्रार्थोनि ऐसा गंधर्व तत्क्षण । स्वस्थानासी गेलासे ॥११॥ ऐसा मागे इतिहास ऐकिला । आता प्रत्यक्ष नयने पाहिला । ऐसा जनसंमर्द बोले । चरणी लागले विनयाने ॥१२॥ तव देशाई म्हणे स्वामीसी । आज्ञा द्यावी आम्हासी । म्हणोनि विनविती गुरुवर्यासी । पति पत्नी तेधवा ॥१३॥ मंदिल धोत्तर शाल । अंगरखा उपरणे

विशाल । शालू नागपुरीं विमल । चोळखण भरजरी आणविती ॥२१४॥ पति पत्नीसी अहेर करिती । देशाई दक्षिणा ठेविती । त्यासी अव्हेरुनि गुरुमूर्ती । देशाईसी चेवविती ॥१५॥ द्वादशाब्दे दीप चालवीन । दिधलासी मागा वचन । तयाचे करोनिया गुणन । दीजे धन या समई ॥१६॥ मासी माड ग्रामींच्या देशाई प्रती । बोलाउनी देशमुख सांगतीं । आपण श्रीगुरूप्रतीं । द्वादश शत धन देइजे ॥१७॥ आज्ञा देवोनि तयासी । देशाई जातीं भालकीसी । घेवोनिया गुरु निरोपासी । आनंदाने पति पत्नी ॥१८॥ गृहा जावोनि देशमुख । गणाराधना करितीं अनेक । बोलिल्या वचनासी देख । द्वादश शत धन पाठवी ॥१९॥ तया द्रव्याचेनि योगे । जंगमार्चना करितीं वेगें । लिंगानंदी अनुभव योगे । काळ क्रमणा करितीं पैं ॥२०॥ श्रोती सिंव्हालोकने करून । ऐका द्रोणापुरीचें महिमान । विरोधी देशाई सुगुण । भाग्य नगरा जातसे ॥२१॥ नाव तयाचें बसवंतराय । तैसे नव्हे तो वसंतराय । नाच रंग विलासे पाहे । सन्निधीचें धन व्रय झाले ॥२२॥ तुरुष्क सिद्धी कडोनी । धन आणोनि व्याजानी । मनमानें खावोनि पिवोनी । वेश्यागना पोशिले ॥२३॥ नवे नवे वस्त्राभरण । जुने करीतसे दान । नाच रंगी गणिकां लागून । अपार धन देतसे ॥२४॥ ग्रहाची सोडोनिया चिंता । निशिदिनी सेवी वारकांता । ऋण भार जाहले आता । अन्न न मिळे खायासी ॥२५॥ द्वारी येवोनि बसतीं दूत । धरदा पैसा म्हणतीं तुर्त । घरसे भेचूंगा म्हणे तया प्रत । विनविताही न ऐकतीं ॥२६॥ मानेंगे नही इस बखत । म्हणोनि द्वारीं बसतीं धूर्त । जैसा चाहे वैसा सूत । देके पैसा लोये हो ॥२७॥ रकम होगई कितनी ! कुछ मालुम है धनी । अब दस हजार गिन्नी । देना होगा आपको ॥२८॥ पाणी नाही फराळ नाही । एकादशी आली पाही । द्रोणपुरीसी ते समई । वर्तमान कळाले ॥२९॥ ऐकोनिया पतिव्रता सतीं । अतीव चिताक्रांत होतीं । धन राशी का आहे गृहा अंतीं । पाठवाया येतसे ॥३०॥ सहस्र की द्वि सहस्र । ऋण म्हणती दश सहस्र । पसा भरी लवणासी भार । झालो आहो ये काळी ॥३१॥ व्यर्थ कर्माचे आयव्यय । सद्‌गुण हेचि संपत्ती निश्चय । दान धर्मं ऋण होय । तरी पुण्य कीर्ती जगांत ॥३२॥ नाही दान नाही धर्म । करोनिया अनेक दुष्कर्म । ऋणाचे भार दुर्गम । उतरी कवण जगांत ॥३३॥ म्हणोनि पतिव्रता चिंता करी । कवण दाता होईल ये अवसरी । विपल्लव तरुवरी । पक्षी कासया बैसतीं ॥३४॥ धनहीन मानव । तो जाणावा निर्जीव शव । आदराचा अभाव । होत असे सर्वत्र ॥३५॥ आता करावे तरी काय । कवण होईल ये वेळी साह्य । हर कोपता गुरु माय । तारी म्हणतीं सर्वज्ञ ॥३६॥ न गुरो रधिक न गुरो रधिक । हा असे शिव शासन देख । तरी द्वादश वर्षे गेले विमुख । गुरु मुख न पाहिले ॥३७॥ दुर्जनांच्या संगतीं बैसुनी । गुरु दर्शन त्यागिले देशमुखानी । जगीं महिमा पुरुष म्हणोनी । डंका वाजे जन मुखे ॥३८॥ गुरु चरणा जे दुरावले । महा नरकी

पचतीं भले । श्वान सूकर योनींत जन्मले । पाहिजे कीं कोटि वेळ ॥२३९॥ असतील गुरु जंगम दुबळे । परी आमुचे गुरू धनवंत सबळ । तयासीचि विनवू ये वेळे । माता पिता जाणोनी ॥४०॥ ऐसा विचार करोनि मनी । पत्रिका लिहितीं तत्क्षणी । श्रीमत् सच्चिदानंद नित्य परिपूर्ण परं ज्योती परशिव परावतार । श्री नंदिनाथ श्री भृंगिनाथ । श्री वीर भद्रादि देव मुख्य । सज्जन शुद्ध शिवाचार संपन्न । शिव समय शरणागत रक्षण धुरीण । श्रीमद्वीरशैवाचार्यवर्य । दुष्ट निग्रह शिष्ट परिपालन महानुभाव सद्गुरूंच्या चरणी साष्टांग नमस्कार मुक्तायीचा । गुरु माता गुरु पिता । जगत्रयी गुरुदाता । गुरुविणे आता गति नाही ॥४१॥ आम्ही आहो सहस्र अपराधी । आपण आहेतीं करुणाब्धी । क्षमा करोनिया ज्ञानाब्धी । अपराध्यासी रक्षावे ॥४२॥ एक बाळ असते अनवाळ । का माता हस्तपाद छेदील । तैसे गुरु माय क्षमा शीळ । बाळा रक्षील संकटी ॥४३॥ फळविला तुमच्या करी । जैसे पाहिजे तैसे करी । कांहीं नुरले आमुचे करी । तारी मारी गुरुवर्या ॥४४॥ सहस्रावधि ऋण भार । घेऊनि बसलेती प्रियकर । कैसे तरी करावे परिहार । देशाईसी सांगोनी ॥४५॥ अपराधी मी आपुली कन्या । विनंती ऐकिजे बहुमान्या । कीजे मज लागी धन्या । कृपा कटाक्षे वीक्षुनी ॥४६॥ मुक्ताईचे पत्र पाहुनी । उत्तर दिले श्रीगुरुनी । सावित्री गाइत्री आणि । सत्पुत्रीणी सौभाग्यवति ॥४७॥ श्रीगुरूंचा असे आशिर्वाद । सुकन्ये मुक्तांबे असावे सुखद । सकळ संकट निर्विवाद । परिहरतीं गुरु कृपे ॥४८॥ तरी ऋण कैसा व किती । आम्हासी कीजे माहितीं । तयाचा उपाय पुढतीं । विचारोनि कीजेल ॥४९॥ श्रीगुरूंचे आशिर्वचन । दूते दिधला मुक्तायीसी नेउन । तव अरब जमादारा लागुन । विचारिता दश सहस्र म्हणे तो ॥५०॥ मागुतीं श्रीगुरुसी कळवितीं । पाहोनि श्रीगुरु सुचवितीं । सेरीकार मिळोनी संप्रतीं । दश सहस्र धन समर्पिजे ॥५१॥ तव दूत उत्तर घेवोनि गेला । साद्यंत वर्तमान कळविला । मुक्ताई बोलवोनि सेरीकाराना । श्री आज्ञेसी सुचविले ॥५२॥ तव सकळी संतोषोनी । श्री आज्ञा शिरी वंदुनी । दश सहस्र धन तये क्षणीं बाईसाहेबा अर्पितीं ॥५३॥ रामय्या नामे साहुकार । तया जवळी ठेविती धन समग्र । जातसे तो जमादार । भाग्य नगरा तेधवा ॥५४॥ जावोनि सांगे यजमाना । जमा करविलोजी दश सहस्र धना । बहोत अच्छा म्हणोनि भोजना । आज्ञा देतीं देशमुखा ॥५५॥ परोपकारी जमादार । नर वाहनी बैसवोनि सत्वर । भाग्य नगराहूनि सहो कोसावर । देशाईसी पाठवी ॥५६॥ वर्तमान सर्व सांगितला । अब तुम जावो घरको भला । ऐकोनि वसंत संतोषला । तेथोनि निघाला स्वग्रामा ॥५७॥ नही हैं ठिकाने पे देशाई । म्हणोनि करितीं एकचि घाई । अरे जावो दौडो म्हणोनि ते समई । शत अरबांसी पाठवी ॥५८॥ तव ते अरब धावत आले । देशाईसी मार्गी धरिले । महवाजी आदमी भले । बिला पूछें जाते हो ॥५९॥ माझ्या सवे

तुम्हीं चलावे । मार्गामाची काय आहे । जाताचि धन पदरी पाहे । दाक्तिोकी तत्क्षण ॥२६०॥ अच्छी बात चलेंगे । म्हणोनि येती ग्रामा वेगे । रामय्यासी बोलवोनि सवेगे । दश सहस्र धन अर्पिला ॥६१॥ दश सहस्र धन घेउनी । उरले विंशति सहस्र ऋणी । दिले पाहिजे ये क्षणी । म्हणोनि तिष्ठती शत अरब ॥६२॥ फौरन् रुपि । दीजियेगा । न होतां फजीता होगा । हम किसीका बात ना मानेगा । रुपिये लेगा इसी बखत ॥३६॥ तोडेंगे मारेंगे । काटेंगे लूटेंगे । खाना पीना बंद करेंगे । रुपिया लेंगे इसी बखत ॥६४॥ दश सहस्रासीची भूमी भार । आणू कोठोनि विंशति सहस्र । देशमुखी विकोनि समग्र ! माधुकरी मागिजे ॥६५॥ देशमुखाच्या उदरी जन्मलो । कैसे तरी नाव केलो । काय परोपकारी झिजविलो । जन्मा लागी येउनी ॥६६॥ म्हणोनिया मुक्ताई । पुनश्च श्रीगुरूसी कळवी । आता नाही गतीं बरवी । आपुलिया कन्येचे ॥६७॥ तव कळवितीं गुरुमाय । टाकू नये तुम्ही हाय । देशाईसी पाठवावे । राजूरासी तत्क्षणी ॥६८॥ सकळ अरबा घेउनी । देशाई जाय राजूरा लागुनी । स्वामीही जाती उदगीराहुनी । राजूरीच्या नबाबाकडे ॥६९॥ नबाबासी मध्यस्त करितीं । तव ते अरब मानितीं । मास त्रया वरुतीं । देऊ म्हणतीं ऋण सर्व ॥७०॥ अच्छी बात हे म्हणोनी । जाती दश सहस्र धन घेउनी । उरल्या दश सहस्रा कारणी । सोयऱ्यासी सुचवितीं ॥७१॥ प्रत्येकी धन सहस्र । पत्र दर्शनी पाठवा सत्वर । म्हणोनिया पत्र । देशमुखासी पाठवितीं ॥७२॥ समय जाणोनिया घोर । पाठवितीं धन सत्वर । जमले ते दश सहस्र । मारवाडिया सोपिती ॥७३॥ आणिक रुपये दश सहस्र । चिठ्ठी देतीं सत्वर । एकूण विंशति हजार । अरबा लागी द्या म्हणतीं ॥७४॥ तव तो मारवाडी । दश हजाराची हुंडी । दहा हजार रोकडी । चुकोतीं अरबाची करीतसे ॥७५॥ विंशति हजाराची पावती । घेवोनि आला निगुती । मोकळीक झाली देशाई प्रतीं । तृतीय मास पर्यंत ॥७६॥ श्रीगुरु माळेगावाहुनी । येतीं दीर्घाद्री लागुनी । येवोनि संस्थानी । लिंगानंदी राहती ॥७७॥ देशाई आला मागाहुन । अरबाची चिठ्ठी घेऊन । तया मारवाडी साहूने । स्वामीकडे पाठवी ॥७८॥ देशाई चिठ्ठी आणोनि देई । श्रीगुरूसी ते समयी । आपण जावोनिया राही । कमळ मठा माझारी ॥७९॥ वारांगना घेवोनी । नाच रंगाची लाविला धुनी । अनिष्ट वर्तमान ऐकोनी । स्वामी झाले रागा रुद्र ॥८०॥ म्हणतीं कैसा दुष्ट जन्मला । लज्जा नाहीकी पामराला । एक ना दोन तीसहजाराला । केला बुडवणूक संसाराची ॥८१॥ नाही केले देवतार्चन । नाही ऐकिले कीर्तन पुराण । दासोहा लागी धन । कवडी नाही खर्चिला ॥८२॥ गुरु जनी नाही प्रीतीं । दुर्गुणे नावाजला क्षिती । नाचे वेश्या दिन रातीं । घेवोनि नाचतां निर्लज्ज ॥८३॥ सहवास नाही गुरु जंगमाचा । नाही कवणा साधु संतांचा । चाड नाही शिवानुभवाचा । नाही पंडितांचा सहवास ॥८४॥ क्रिया नाही ज्ञान नाही । आचार नाही विचार नाही ।

दान नाही धर्म नाही । मुळीच नावडे स्वधर्म ॥२८५॥ अनुभव शास्त्र ऐकेना । गुरुलिंग जंगमा पूजीना । येईना की दर्शना । गुरु जंगमांच्या ॥८६॥ पुण्य नाही पुरुषार्थ नाही । दाने ऋण झाले नाही । दुर्गुण दुराचार दुर्विषयी । निमग्न असतो उन्मत्त ॥८७॥ ऐसा हा जन्मोनि भस्मासुर । नाव बुडविला वंशाचा समग्र । लाविला कलंक सूकर । सद्वंशासी एधवा ॥८८॥ ऐसे गुरु माउली क्रोधे भरले । भालकी यरनळ्ळी देशमुखासह ते वेळे । दर्शना येती त्रिवर्ग भले । मदोन्मत्त दुराचारी ॥८९॥ कालचि धनकोने फजीती केला । ते नाठवे की मूर्खाला । पुनः आमुच्या दर्शना आला । अविचारी निर्लज्ज ॥९०॥ स्वामी असती खोलींत । परदा होता द्वारा प्रत । शिवबसप्पा मोदीसी आंत । पाठविती ते काळी ॥९१॥ फळ कर्पूर घेवोनि हाती । त्रिवर्ग साष्टांगे नमिले असती । आज्ञा दीजे तया प्रती । म्हणे विनये मोदीने ॥९२॥ गुरुवर्य रागारुद्र होउनी । निघ दुष्टा म्हणती येथुनी । मुख न दावी मज लागुनी । येच क्षणी निघोनि जा ॥९३॥ श्रींची क्रोध वाणी ऐकोनी । त्रिवर्ग जाती मठांतुनी । दो दिवस दीर्घाद्रीत राहुनी । खिन्न वदनी जाती गृहा ॥९४॥ आता मागील एका वर्तमान । त्रिमास लोटताची जाण । तगादा करिती स्वामी लागून । अष्ट सहस्र ऋण येता जाता गुरु देती ॥९५॥ नागल गावी ठेवोनिया चंद्रहार । आगलावेच्या येथूनि आणिती धन सत्वर । मागता नाही म्हणोन चंद्रहार । फिरोनि पडला रतनूर्ख ॥९६॥ गुरुसी विश्वास घात केला । निर्वंश तयाचा झाला । अद्यापी नागल गावाला । माहीत असे गुरु महिमा ॥९७॥ पंधराव्या पिढीसी मी येईन । तेव्हा चंद्रहार घेईन । ऐसी भविष्य वाणी बोलोन । ठेविले हो गुरुराय ॥९८॥ आणीक उरले द्विसहस्र । द्वारी दूत बसले सशस्त्र । कवण सांगावे दूता शास्त्र । नौकर अन्न वस्त्राचे ॥९९॥ जंगमार्चनही चालवावे । साहुकारासी निरवावे । ऐसे षण्मास गुरुदेवे लोटितातीं ते समयीं ॥३००॥ मारवाडी निर्धारा आला । दूतासी द्वारी बैसविला । म्हणे श्रीमंत छे स्वामी भला । पैसा घणो भऱ्या छे ॥३०१॥ इमको क्यों सतावणो । रहे दो हजार दे देणो । दरवाजामा बैठणो । मत आवणो रुपिया बिना ॥२॥ ऐसा तगादा साहू चालवी । पाण्यासी बंदी केली पाही । मोदी येवोनि ते समई । महाद्वार उघडिला ॥३॥ स्वामी जवळी जाऊनी । साष्टांगेसी नमूनी । ऐसे बैसता लपोनी । ऋण काहीं चुकेना ॥४॥ तरी आपुल्या जवळीचे अठरा शत । देवोनि टाका साहु प्रत । होईजे ऋण मुक्त । प्रसंग सांप्रत दुर्धर की ॥५॥ कवणाचे द्रव्य कवणा द्यावे । भेद न जाणतां का बोलावे । ते आहे गण द्रव्य । तप्त लोह रसा सम ॥६॥ देव द्रव्य गुरु द्रव्य । साधू सज्जन गण द्रव्य । स्त्री द्रव्य कन्या द्रव्य । अपेक्षू नये सुज्ञानी ॥७॥ अज्ञानें कोणी अपहारी । तयाच्या वंशाची होय बोहरी । ऐसे जाणोनि सुविचारी । सुविचाराने वर्तावे ॥८॥

॥ श्लोक ॥ देव द्रव्यं गुरु द्रव्यं शैव द्रव्यं तथैवच । अदेक्षयाच नरकं भक्षणंच कुलक्षयं ॥३०९॥

आदि गणांची उक्तीं । नीति शास्त्रेही वदतीं । देवस्त्र अपहाऱ्या प्रती । कल्पांतीं मोक्ष नोहे की ॥३१०॥ कासया हो वादविवाद । शिव संबंधीचे द्रव्य विशुद्ध । तया स्पर्शिता नये विवाद । कैशाही दुःखद प्रसंगी ॥११॥ आणीक दो मासा नंतर । देवोनि टाकू ऋण समग्र । ऐसे ऐकोनि स्वामीचे उत्तर । दूत जातीं तत्क्षणी ॥१२॥ आरंभिती गणाराधना । जंगम तृप्तीसी जागा । अष्टाशत धना । व्यय करिती दासोही ॥१३॥ आले कांहीं दान दक्षिणा । बळावोनि मारवाडी यजमाना । अहेर करोनि द्वि सहस्र धना । देवोनि ऋण फेडितीं ॥१४॥ ऐसा हा विचित्र प्रसंग । पाहोनि सद्भक्तीं सवेग । धन्य रे गुरुवर्या अव्यंग । लीला अभंग न वर्णवे ॥१५॥ शिष्ये झिजावे गुरूसी । ही परंपरा सर्व देशी । गुरु फेडिले शिष्याच्या ऋणासी । विपरीत वार्ता नोहे कां ? ॥१६॥ ऐसे सद्भक्त बोलती । आपुल्या माजी आश्चर्य करितीं । धन्य धन्य गुरु मूर्तीं । परोपकृतीं अगम्य ॥१७॥ मागा सोन्नलगीमाजी जाण । घडला ऐसा प्रकरण । कोणी बोम्मय्या नामी बांधवान । केला ऋण अपार ॥१८॥ कांही धन संग्रह करोनी । सोन्नलगीसी अ.ला तये क्षणी । शिद्धरामाचा शिष्य होउनी । आपुले धन लपविला ॥१९॥ बोम्मय्या सोन्नलगींत आहे । हे जाणोनि बांधव । सोन्नलगीसीस्वये । पातले ॥२०॥ तव राजमार्गांतुनी । जात असता बोम्मय्यानी । आडवे होवोनि बंधूनी । चोरत्वे धन आणिले ॥२१॥ आमुचे धन आम्हास देई । हे साधुत्व उपयोगी नाही । बोम्मय्या म्हणे ते समई । माझा द्रव्य आणिलो मी ॥२२॥ तुमच्या द्रव्यासी काय काज । पर द्रव्य नलगे मज । जार चोर नव्हे सहज । सत्य संध असे मी ॥२३॥ येतीं शिद्ध योगी जवळी । बोम्मय्याचे बंधु सकळी । योगिवर्यां वर्तमान ते काळी । बोम्मय्याचे कळवितीं ॥२४॥ बोम्मय्याने अमुचे धन । चौर्ये आणिलासे जाण । आमुचे आम्हा द्यावया कारण । उगीच तंटा करीतसे ॥२५॥ ऐसा ऐकोनि विचार । बोम्मय्यासी म्हणतीं योगीश्वर । का देऊ नये सत्वर । ज्याचे धन तयासी ॥२६॥ तव तो म्हणे बोम्मय्या । आमुच्या वादी न यावे स्वामिया । कर कमळें जोडोनिया । अत्यादरे बोलिला ॥२७॥ उल्लंघिलासे माझें वचन । जावे ययासी घेऊन । तरी तुमचा प्रकरण । महाजन सोडवितीं ॥२८॥ तया बोम्मय्या लागुनी । शिक्षा करितीं महाजनी । मग बोम्मय्या शिव देवळा जाउनी । भोसकुनी घेतला ॥२९॥ मृत बोम्मय्यासी पाहतीं । घाबरोनि आप्त जन येतीं । सिद्ध यतींसी सांगतीं । घडला वृत्तांत सर्वही ॥३०॥ ऐकोनि शिवयोगी तत्क्षण । आणवितीं बोम्मय्याचे धन । देवोनि बांधवा लागून । सांतवोनि पाठवितीं ॥३१॥ बोम्मय्याची समाधी । करिती शिवयोगी त्रिशुद्धि । योगी द्याते निधी । देवविला बोम्मय्या ॥३२॥ यया इतिहासाहून । विपरीत आजिचा प्रसंग जाण। गुरूनीच निर्वहिले

ऋण । दुराचारी शिष्याचे ॥३३॥ ऐसे कैसे आचरण । हा ऐश्वर्याचा मद जाण । बसव प्रभु बोलिले वचन । आठवतसे ये समई ॥३४॥ सर्प द्रष्टासी बोलवेल । भूत धरलिया नाचवेल । जरी ऐश्वर्याचा भूत संचरला असेल । मांत्रिकाचा मंत्र बोध होय ॥३५॥ तो आता न बोले पाही । दारिद्र्य मांत्रिक येइजेल पाही । पाठी लागोनि बोलतो ते समई । पाया पडोनि मार्गस्थां ॥३६॥ ऐसे जे का धनांध । तया म्हणावे दिवांध । गुरुदेव सज्जन प्रबुद्ध । तया लागी दिसतींना ॥३७॥ मन माने वर्तन करावे । वडिलोपार्जित धुवोनि घ्यावे । सरलिया ऋण आणावे । कैसेही साधावे दुराचार ॥३८॥ नाहीं सहस्र द्वि सहस्र । तींस सहस्र ऋण भार । युक्तीने केले परिहार । गुरु अंगावरी घेउनी ॥३९॥ गुरूंचा उपकार । नाठवे जया ऋणाचा भार । वर्ततो दुराचार । जगी निर्लज्ज होउनी ॥४०॥ बसव प्रभूचे वचन । कैसे मार्मिक आहे जाण । शिव चिंता शिव ज्ञान विहीन जन । सहस्र कृमी आमई जन्मती ॥४१॥ संघे राहती ग्रामींचे पशू । तैसेचि राहती वनीचे पशू । अन्न मानवही विचित्र पशू । पुच्छ विषाण हीन तो ॥४२॥ ऐसे चतुर्विध जन । बोलताती सद्वचन । ऋण फेडविला गुरू कडून । निरर्थक जन्म पशूचा ॥४३॥ तया म्हणावे शिवयोगी । धन कनक वनिता विरागी । कांही तरी व्हावे मज लागी । ऐसा विकल्प नये जया ॥३४॥ एकांती भेटता सुंदर नार । मातृ भावे करी नमस्कार । तो नव्हे मानव प्रत्यक्ष शंकर । जगदोद्धारा अवतरला ॥४५॥ यया रीती पादुका स्वामी । विचरतातीं भूमी । सदैव दासोह कामी । जंगम प्रेमी जगदात्मा ॥४६॥ सेवकीं उणे पुरे केले । जरी कुणासी तिरस्कारिले । माहेश्वरा निंदिले । अवचित्ती ॥४७॥ बोलावोनि तत्क्षण । शिक्षा करितीं सेवका लागुन । नसता वृत्ती वरून । तया लागी काढिती ॥४८॥ न्याय निष्ठुरे वर्ततीं । जन थरथरा कापती । अन्ने सरसी काम करितीं । भय भक्तींने सर्वदा ॥४९॥ चालत असता गणाराधना । द्वि गुण देती दक्षिणा । एके दिनी दाना । न मिळे दक्षिणा ग्रामांत ॥५०॥ तव हुमनाबादासी । पाठवितीं चपरासी । आणोनिया ते समयासी । माहेश्वरा अर्पितीं ॥५१॥ नका नका गुरुवर्या । दक्षिणा नका म्हणता तया । पुनः जेऊ घालोनिया । स्वये दक्षिणा देतातीं ॥५२॥ एकदा चालता जंगमार्चना । उणे पडले दक्षिणा । गुरु समाधी जवळी दक्षिणा । जावोनि आणा म्हणतातीं ॥५३॥ जावोनिया दूत पाहतीं । समाधी जवळी असे गंथी । आणोनिया श्रीगुरुसी देती । झाले पूर्ण सकळासी ॥५४॥ ऐसे अनेक महिमान । गुरुवर्यें दावितीं तूर्ण । जंगम वृंद काम दुघ होऊन । त्रिकाळ लिंगार्चनी रमतातीं ॥५५॥ सदैव मुखी गुरु नाम स्मरण । शिवानुभव शास्त्र प्रवचन । सकळ सद्भक्ता उपदेश करून । दासोही काळ क्रमितातीं ॥५६॥ आजीव तनुमन धन । जंगम दासोहा झिजवितीं जाण । परोपकाराय शरीर म्हणून । निरपेक्षपणे वर्ततीं ॥५७॥ गुरु की यतीं जगद्गुरू । समाजाचे अज्ञान कंटक तरू । छेदोनि भवित

कल्प तरू । लावोनि अमर होइजे ॥३५८॥ काय मानवांसी दुष्काळ । देश धर्मासीचि झाले काळ । जन्मोनि माते उदरी निष्फळ । भरिले भूमंडळ अपकीर्तिने ॥५९॥ इतिश्री गुरु हावगिलिंग लीलामृत । श्रवण मुखं प्राशन करावे सद्भक्त । होताल जन्म मरणा विरहित । बसवलिंग बोलत भालपुरीचा ॥३६०॥ इतिश्री गुरु हावगिलिंग लीलामृते । शिष्य ऋण विमोचनं नाम दशमोऽध्याय समाप्तः ।

मंगळ महा श्रीगुरु बसवलिंगार्पण मस्तु श्रीगुरु हावगिलिंगार्पण मस्तु । शुभं भवतु । मंगळ मस्तु ।

-० दशमोऽध्याय समाप्तः ०-

श्रीगुरू विरुपाक्षलिंगायनमः श्रीगुरू हावगिलिंगायनमः श्रीगुरू बसवलिंगायनमः एकादशोऽध्याय प्रारंभः ।

॥ ललित गीत ॥ एके दिवसी पादुकास्वामी निजले असता भक्त प्रेमी ॥१॥ येउनिया तव गुरु बसवेश । आज्ञा करिती सत्पुत्रास ॥२॥ लिंगामाजी समरस व्हावे । समय न उरला आता पाहे ॥३॥ गुरु आज्ञा तव शिरी वंदितीं । लिंगामाजी समरस होतीं ॥४॥

एकचि देव परम शिव । जया म्हणतीं सदाशिव । तयाचा महिमा लाघव । न कळे वैभव निगमागमा ॥१॥ वेदवादी भ्रमले । अग्नीच देव म्हणोनि हविले । सर्वतो मुखे चेतता ते वेळे । गटार जळही पुरती ना ॥२॥ तत्वें केवी होतीं देव । तत्वा अतीत अभव । महद्भूत तो अभिनव । आदि अंत न कळे कुणा ॥३॥ सर्वं व्यापक तो देव । ब्रम्हाधिपती महादेव । जयासी आराधोनि सकळ देव । ऐश्वर्यासी पावले ॥४॥ कवणे पूजिले नयनें । कवणी पूजिले स्तनें । कवणे पूजिले बाणे । धूळ गोट्याने संतोषला ॥५॥ भोळा शंकर उमानाथ । सर्वत्रांचा पुरवी आर्त । आपण विरागी निस्वार्थ । स्मशानवासी म्हणविला ॥६॥ त्रिगुणांचा केला त्रिशूल । अष्टमद गज चर्म विशाल । क्रोध व्याघ्र चर्म विमल । नेसोनि म्हणवी दिगंबर ॥७॥ सत्रावी जीवन कळा । शिरी गंगा वाहे झुळझुळा । दिले अर्धांग हिम नग बाळा । म्हणविला अर्धनारी नटेश्वर ॥८॥ देवादिकां देई अमृत । आपण कालकूट भक्षित । दिव्यालंकार इतरां देत । आपुला श्रृंगार विखारांचा ॥९॥ सकळांसी कामाचा चाड । देव ऋषीही न मोडिती भीड । परी कैसा हा निर्भीड । जाळिला द्वाड तृतीय नेत्री ॥१०॥ ऐसा निःसंगी निर्मोही । निर्विकारी निर्देही । सकळां कडोनि पूजा घेई । विश्वनाथ होउनी ॥११॥ तोचि हा एको रुद्र । ईश सर्व महा उग्र । भीमभव पशुपति समग्र । अष्टाभिधाने जयासी ॥१२॥

॥ श्लोक ॥ याते रुद्र शिवातनूरघोरा पापकाशिनी । तयानस्तनुवा शंतमया गिरिशंता भिचाकसीः ॥१३॥

लिंगंशिवातनु प्रोक्तं । मूर्तिर्घोर तनुस्मृतः । आपापेषुच भक्तेषु तयोर्मध्ये शिवातनुः ॥१४॥

काशते परमेशश्य शिष्टास्ते लिंग धारिणः ।

लिंगाकारचि शिवातनू । कल्याण तम असे जणू । मूर्तींसी म्हणतीं घोर तनू । यजुर्वेदी रुद्रांत ॥१५॥ निष्पाप जे का सद्भक्त । तयांच्या हृदयी प्रकाशत । म्हणोनि शिष्ठ शांत । लिंग धारण करितातीं ॥१६॥ वेद शास्त्र इतिहास पुराणे । अखंड गोळक महालिंगा लागुन । शोधिताही त्रिभुवन । आदि अंत न पावती ॥१७॥ मी पामर मतिमंद । केवी गाऊ गुणानुवाद । मज श्रीगुरुचा आशिर्वाद । वेडे वाकुडे वदवी तो ॥१८॥ दशमोध्याई भक्त माहेश्वर चतुर । गुरु लीलामृत प्राशिलो सुमधुर । तृप्तींचे हे ढेंकर । कळसाध्याय जाणावा ॥१९॥

महेशाहून पर दैवत । महिम्नापर ते स्तोत्र विख्यात । अघोर मंत्राहूनि परते । नास्ति तत्वं गुरोः परं ॥२०॥ गुरु तत्वाहूनि परतत्व । आणीक कोणते निजतत्व । जो भक्तां हृदयी शिव तत्व । प्रकाशवि कृपा बळे ॥२१॥ महा कवी ऐसा बोलत । हा बोबडा केवी बोले तेथ । परी अज्ञ बाळाच्या बोला प्रत । माता कौतुक करिते हो ॥२२॥ तुम्ही श्रोते बाप माय । उदार हृदयी आहेतीं स्वयें । बाळे काय पाई लागावे । कौतुक करावे म्हणोनी ॥२३॥ सिंव्हालोकने करून । कथेसी द्यावे अवधान । गुरू हावगिलिंग दयाघन । फेडिले ऋण शिष्याचे ॥२४॥ जनमनासी आकर्षिले । बहुतांसी भक्तिमार्गी लाविले । अष्टावरणी तत्पर झाले । शिष्य सद्भक्त सज्जन ॥२५॥ केवळ बसव प्रभूचि अवतरला । भूलोकी अवलीळा । पतितांचा उद्धार केला । दासोह भावे करोनी ॥२६॥ धन्य धन्य पादुका स्वामी । निष्काम योगी जंगम प्रेमी । महिमा अगाध तुमचा स्वामी । म्हणोनि सज्जनी गण गाती ॥२७॥ ऐसे शिवानंदी काळ क्रमिता । काय झाले ऐका वार्ता । पादुका स्वामी योगनिद्रेंत असता । गुरु बसवलिंग स्वप्नी येती ॥२८॥ येवोनिया ते समई । म्हणती देहभोग सरला पाही । लोकयात्रा संपवोनि लवलाही । यावे आता निजपदा ॥२९॥ मेरू पर्वत दुरावला । हिमवान् हिमालयीं बैसला । हिम कराच्या कळा । क्षीण झाल्या प्रतिदिनी ॥३०॥ शिव झाला दिगंबर । क्षीराब्धींत विष्णू स्थिर । उदधी झाला क्षार । याचका भेणे जगांत ॥३१॥ महादानी झाले उदास । आमुचा पाड कायसे । बसवादिकांच्या पंचपरुषास । दाद नाही लागला ॥३२॥

॥ श्लोक ॥ मेरुर्दूरगतो हिमाचलगिरी प्रालेयरूपो भवेत् । चंद्रश्च सहजोपि याचक भयात् क्षीणत्वमापद्यते । कौपीनं धृत वान्हरोपि भगवान् विष्णुर्जले शायते । बाराराशिरपेयतामुमगता को नाम दातोऽक्षमः ॥३३॥

यया कारणे सज्जन । आधीच व्हावे सावधान । ऐसे सुचवोनि स्वामी लागून । अंतर्धान होतातीं ॥३४॥ स्वामी खडबडोनि उठतीं । क्षणेक सचिंत बैसतीं । आता हो कायसी खंतीं । आज्ञा दिधले गुरुमाय ॥३५॥ तव जंगमार्चना प्रारंभितीं । महा वैभवे दासोह चालवितीं । दानधर्मे जंगम तोषवितीं । नित्य नेमे करोनी ॥३६॥ पद कमळाचा प्रमाण । काडी देतीं मोडुन । करावे समाधीसी खनन । टाका माजी इये स्थळी ॥३७॥ स्थळाचा निर्देश केले । आगम प्रमाणे खननारंभिले । सुजनी आश्चर्य करू लागले । श्रीगुरु कर्तव्या पाहुनी ॥३८॥ तव शंकरय्या स्वामी येतीं । पादुका स्वामीसी म्हणती । मी तरी आधीच क्षितीं । घोडदरी समाधी बांधिलो ॥३९॥ घोडदरींत समाधी नोहे तुझी । होईल बाजारामाजी । हे लिहूनि ठेवी आजी । माझे वचन गुरु म्हणतीं ॥४०॥ आश्चर्य करितीं सकळ जन । घोडदरीत ठेविले बांधोन । ग्रामी होईल समाधी सुलक्षण । श्रीनी भविष्य बोलती ॥४१॥ शंकर लिंग म्हणतीं स्वामीस । आपण का चालविलो

खननास । गुरूंची आज्ञा झाली आम्हास । यावे स्वपदास म्हणोनी ॥४२॥ कधी लिंगैक्य होणार । सांगा कीजी गुरुवर । गुरुवर्य म्हणती परिकर । पुष्य पौर्णिमा जाणावे ॥४३॥ ऐसा भविष्याचा वाद । वदोनि जाती सहजा सहज । पुढिले समाधीचे काज । प्रारंभिती गुरुवर्य ॥४४॥ पंचपाद चच्चौक । नवपदे घात देख । मध्य वेदिका पदेक । त्रिपाद चौक त्रिकोण ॥४५॥ रुंदी एक पदार्ध । तीन पावटे रचिले शुद्ध । तीन्ही क्रम वृद्धीनें विशद । रचवितातीं श्रीगुरू ॥४६॥

॥ श्लोक ॥ चतुर्विभागश्चतुरेकचरणं । घातं नवंच तन्मध्ये प्रयत्नः । त्रिकोणिकायांतुत्रितयेश घातं निर्धिविशेषोरधसुदीर्घमेतत् । सवेदिकायां त्रयमेवकृत्वा सोपानमेकं प्रथमस्य जातः ॥४७॥ उभयोर्द्वितीयं तिसृष्टंचजीवं घातोन्नतस्तीर्ण तथा प्रकल्प्य ।

चरण गणना चतुर्विध । असीति शत होय शुद्ध । आणीक विंशति पद प्रसिद्ध । घात मुख जाणावे ॥४८॥ त्रिकोणीचे नव पद । त्रिपावटे षटपद । मध्यभागीचा एक पाद । षोडश पाद आगळे हे ॥४९॥ ऐसे षोडशाधिक द्विशत पद । गणनेसी होतीं विशुद्ध । हा नवलिंग सकील संबंध । विशुद्ध जाणा समाधीचा ॥५०॥

॥ श्लोक ॥ त्रिकोणपार्श्वे मुभयोर्वदंती त्रिशन्युगारोहण कक्षयुग्मं । द्वादशमेकं सुसोपान पार्श्वे । युगुळंप्रवक्षंति चत्वारिचत्वं ॥५१॥

आणीक एक प्रकार । चतुर्दश चतुर्विध छपन्न प्रकार । ही अंगस्थळे जाणावे परिकर । चौव्वेचाळीस लिंगस्थळे ॥५२॥

॥ श्लोक ॥ गर्भा कारं नवमिति पदं विष्ठरेरंगमध्ये कमनीयं पंचविंशन्य वेदिकायां निधिः शात् । द्वितीय सोपानंनवमितियुगं निश्रेणितायां । महीवेदंभूत्वा ह्युपरि परिमितं एक मेकं विशेषं ॥५३॥

लिंगस्थळे चौव्वेचाळीस जाण । अंगस्थले सत्तावंन । एकोत्तर शताचा गणन । समाधीचा दुजा हा ॥५४॥ आंतील कोनाड्याची गणतीं । वरील वेदिका निश्चितीं । ही षटत्रिंशतत्वाची मिती । समाधीची साधितीं ॥५५॥

॥ श्लोक ॥ एवं मूर्तिरभंगलिंगमुभयोरेकोत्तरंवा शतं स्थानेनंतुप्रकीर्तितं श्रुतिमतं निश्रेयसद्मंभवेत् । तस्योर्ध्वोपरिवेदिका चरण मेकं विशालं वेष्ठका । षटत्रिंशोन्नत मूर्ध्निमाला रचितं रुद्राक्ष माला स्मृतं ॥५६॥

प्रथम वरील वेदिका चतुरस्र जाण । चतुर्विध वाक्य चतुर्विध पद निःसीम । किंवा चतुर्विध मुक्तींच परम । जाणावे की सद्भक्ती ॥५७॥ प्रथम सोपान भक्ति स्थल। द्वितीय जाग माहेश्वर विमल । तृतीय सोपान प्रसादि स्थळ । ही अंगस्थळे जाणावी ॥५८॥ वेदिकामध्ये प्राणलिंगी । कोणी शरणैक्य विभागी । जाणावे हो लिंगांगी । समाधीचा प्रकार ॥५९॥

॥ श्लोक ॥ रम्यारोहणमादि भक्ति मुभयोर्माहेश्वरंवा तथा । त्रेतायां परम प्रसादि निरुतं सोपानसा वेदिका ।

मध्ये प्राणसुलिंगि वेदिशरण स्थानंतुत्रैकोणीकां उत्तुंगंखलु मल्लिकैश्यसदनं जाने समाधिक्रमं ॥६०॥

पतित पावन करुणा मूर्ती । आगमाधारे समाधी रचिती । आमंत्रोनि माहेश्वरा प्रति । स्वप्न स्थिती बोलती ॥६१॥ आम्हासी गुरु निरोप झाले । शरीर भोगही सरले । ऐक्य होऊ ये वेळे । लिंगामाजी निश्चित ॥६२॥ ऐकताचि गुरु वचन । दुःख सागरी बुडतीं भक्तजन । ऐसेका अशुभ वचन । बोलता हो गुरुवर्या ॥६३॥ सद्भक्तां म्हणती श्रीगुरू । जन्मलिया मृत्यु निर्धारू । हा प्रपंचचि दुःखाचा आगरू । आम्हा लागी भोंवले ॥६४॥ सांतवात्रे मनासी । करावे पुढलिया विवंचनेसी । सर्वत्री उत्तराधिकारासी । निर्धारावे शुभ दिवस ॥६५॥ मग सर्वत्री स्थिर होतीं । स्वामी आज्ञे तिथी निर्णिती । पट्टचरवर्या आव्हानितीं । उत्तराधिकारासी ॥६६॥ तव सर्वत्री मिळोनी । स्वामींच्या आज्ञेवरोनी । बसवलिंग मरिदेवा लागुनी । पट्टाभिषेक नेमितीं ॥६७॥ मठ मंदिर श्रंगारिले । मंटप देवता प्रतिष्ठापिले । पंचाचार्या आव्हानिले । पंच कलश स्थापोनी ॥६८॥ कलशोदके अभिषेकिले । काषायांबर दिधले । भस्म रुद्राक्ष धारण करविले । बसवलिंग स्वामीसी ॥६९॥ पालखीमाजी आरूढवोनी । बाहत्तर ब्रीदावळीसह ते क्षणी । अनेक वाद्यांच्या गर्जनी । काढितीं मिरवणूक ते समई ॥७०॥ महा वैभवे मिरवोनी । मठा येतीं परतोनी । कासपट्टी फोडोनी । अधिकारानुरूप वांटिती ॥७१॥ अनेक गणाराधना करितीं । वस्त्रे दक्षिणा अर्पितीं । अधिकारिया अहेर करितीं । अधिकारा अनुरूप ॥७२॥ अधिकार देवोनि सकळ जन । करिताती पुनरागमन । चालवितीं नित्य जंगमार्चन । पादुका स्वामी नियमाने ॥७३॥ ऐसे चालता एके दिनी । विस्मृति झाली स्वामी लागुनी । देहभान कैसे विसरले म्हणोनी । बसवलिंग स्वामी घाबरले ॥७४॥ तव म्हणतीं कैसे झाले । गुरु माउली देहभान का विसरले । अवसरे श्रीसी स्नान घातले । धारण करितीं भस्माक्ष ॥७५॥ तव लिंगा लागी अभिषेकितीं । गुरु सूत्रे पूजा करिती । जपोनिया मूल मंत्राप्रतीं । स्थिर झाले पादार्चनी ॥७६॥ लगबगे चरपादार्चन । गुरु सूत्रे करितीं जाण । पादोदक संपादोन । स्वीकारितीं गुरु शिष्य ॥७७॥ गुरुलिंगासी अर्पोनी । पादोदक अर्पितीं श्रीगुरु लागुनी । लाविता मुखालागी तीर्था लागोनी । होतीं ततक्षणी जागृत ॥७८॥ तव रागा रुद्र होतीं । भक्त माहेश्वरा पाचारितीं । अवघा वर्तमान सांगतीं । व्रत भंगिले म्हणोनी ॥७९॥ नेम माझा जंगमार्चनेचा । मरिदेवे बुडविले साचा । पादोदक प्रसाद सेवनाचा । नेम स्वतःचा असे हा ॥८०॥ माझे व्रत केले शून्य । आजन्म नेमाचा केला हान । आता मी समाधी सोडून । घेईन जलसमाधी गंगेत ॥८१॥ तुम्हासी झालो भार । म्हणोनि करितसा अविचार । तुम्हासी न सांगता सुविचार । कैसा लिंगैक्य होईन ॥८२॥ ऐकोनिया मरिदेव घाबरले । गुरुवर्या अपराध घडले । म्हणोनिया पाय धरिले । श्रीगुरूचे तेधवा ॥८३॥ मरिदेवे

अपराध केले । क्षमा कीजे गुरु माउले । म्हणोनिया साष्टांगे नमिले । भक्त माहेश्वर शिष्यांनी ॥८४॥ सद्‌भक्त मरिदेवा सांगती । जाग्रत असावे दिनराती । आपुली क्रिया आपणचि निर्वहिती । तत्पर असावे सेवेंत ॥८५॥ श्रुत झाले वर्तमान । द्रोणपुरी देशाई लागून । मूढ बसवंत तये क्षण । म्याना घेऊन आलासे ॥८६॥ स्वामी लागी द्रोणापुरासी । घेवोनि जाऊ या समयासी । म्हणोनिया चंद्रशाळेसी । बैसलासे मदांध ॥८७॥ ऐकता देशाईचे आगमन । नाही दर्शन संभाषण । मध्यरात्रीच बोलाउन । घेतीं भक्त महेश्वरा ॥८८॥ कुटिल खळ अमंगळ । बोलावण्या आला म्हणे कुश्चळ । तुमचा अभिप्राय सकळ । श्रुत करावे ये क्षणी ॥८९॥ आजी तीन तपे होती । द्रोणापुर सोडोनि निश्चितीं । कोणीच नाही आमंत्रिलेतीं । आली प्रीतीं आजि केवी ॥९०॥ आजि आलासे कळवळा । गुरूचिया अंतकाळा । ऐसिया कुटिल खळा । मठी दिधला प्रवेश कवण ॥९१॥ गुरुवर्य रागारुद्र झाले । भक्त माहेश्वर स्तब्ध राहिले । न सुचे कवणाही ते वेळे । उत्तर द्यावे कैसा परी ॥९२॥ तव शिव बसप्पा मोदी । कर कमळ जोडोनि त्रिशुद्धी । विनये बोले सुबुद्धी । सर्व सिद्धी स्वतंत्र ॥९३॥ आपुल्या इच्छे विरहित । कवणाचे होईल जी हित । आत्म तंत्रेचि समस्त । कार्य भाग साधिजे ॥९४॥ तव गुरुराय म्हणती । अशक्त झाली स्थितीं । बळेंचि जरी बलावोनि नेती । कैसी गती आमुची ॥९५॥ ऐसा कैसा नेईल । बळे आशिर्वाद कैसा मिळेल । कार्यभाग तरी कैसा साधेल । जाऊ न देऊ सर्वथा ॥९६॥ जाग्रत असावे सकळ जन । द्रोणापुरासी नाही कारण । ही प्रतिज्ञा मानून । सावध असा येथेची ॥९७॥ स्वामींची आज्ञा घेउन । स्वगृहा जाती भक्त जन । उदया येतीं सकळ जन । मुखमार्जन करोनी ॥९८॥ प्रातः उठोनी देशाई । मेना सिद्ध करितीं पाही । शिव बसप्पा विचारी ते समई । तुमचा विचार सांगिजे ॥९९॥ तव तो देशाई म्हणे । स्वामीसी नेऊ बोलाउन । तरी ते स्वामींचे आज्ञे वरून । की तुमचा असे सुविचार ॥१००॥ ऐसा कैसा होईल । श्रीगुरूंचे आज्ञेचि चालिजेल । सर्व नाशासी मूळ । अवज्ञा ही गुरूची ॥१०१॥ तव मोदी अंतरी जावोनी । साष्टांगे नमी श्री लागुनी । म्हणे द्रोणपुरासी श्री लागुनी । आले बोलावण्या देशाई ॥२॥ तव एक ना दोन । न बोलती सद्‌गुरू वचन । देशमुखे जाणिला श्रींचे मन । निघोनि गेला द्रोणापुरा ॥३॥ स्वामी म्हणती बरवे झाले । आले विघ्न परतोनि गेले । लिंगानंदी स्थिर झाले । स्वाश्रमा माझारी ॥४॥ पुढे नऊ दिवसावरी । पौर्णिमेच्या अवसरी । आयास होतो सत्वरी । षटसंमार्जन करविले ॥५॥ सद्‌भक्तासी बोलाविती । तीव्रता करावी म्हणतीं । रांगोळिया घालितीं । षट्चक्र रेखितीं शुभकर ॥६॥ स्वामी लागी स्नान करविले । धूत वस्त्राते नेसविले । कंबळासनावरी बैसले । लिंगार्चन केले गुरुवर्य ॥७॥ मग चरवर्यांची पूजा । स्वयेंचि करितीं ओजा । म्हणती हा नेम माझा । आजन्माचा सहज पैं ॥८॥ तव पाद पूजा स्वये करूनी । अर्पिती

पादोदक चरवर्या लागनी । प्रसाद रूपे लिंगावधानी । मागुतेनी स्वीकरितीं ॥१०९॥ सकळ माहेश्वरासी । देवोनिया पादोदकासी । आपुल्या सवे पंङ्क्तीसी । लिंगार्पणासी वाढिती ॥१०॥ आनंदे जंगमा लागन । मिष्टान्ने तृप्त करिती जाण । हे अंतिम दासोह जाण । न घडे माझेन पुनरपि ॥११॥ गो कनक धन धान्य । रजत आणि वस्त्राभरण । स्त्रियां पुरुष बाळा लागून । स्वये अर्पिती माहेश्वरा ॥१२॥ सुवासिनी मंगळारतीं । लगबगे घेवोनि येती । स्वामी श्वेत कंबळासनी पहुडती । गात उभे असतीं सुलोचना ॥१३॥ चरवर्यासी बोलतीं । मस्तकी पद ठेवा म्हणतीं । सकळ जन मंगळारती करितीं । पुष्पांजळी म्हणतीं माहेश्वर ॥१४॥ गुरुलिंग जंगम स्मरणी । निरंतर लिंग ध्यानी । कर्पूर ज्योति स्पर्शुनी । ज्योतिरूपी समरसला ॥१५॥ गंगाजळ सागरी मिळाले । घटाकाश महदा काशी समरसले । तैसे श्रीगुरु समरसले । लिंग ध्यानामाजी पैं ॥१६॥ क्षीरामाजी क्षीर । की नीरामाजी नीर । अंबरामाजी नाद सुस्वर । घुमोनि लीन होतसे ॥१७॥ तैसे श्रीगुरु मूर्ती । निःशब्दे लिंगरूपी विलीन होतीं । भक्त माहेश्वर जयजयकार करितीं । गीत गाती सुमंगल ॥१८॥ तव देव दुंदुभी वाजविती । निनादे अंबर गर्जती । देवादिक वर्षितीं । पुष्प वृष्टी तेधवा ॥१९॥ माहेश्वरां विभूति विडा । देतीं नववस्त्रासह रोकडा । चोखाळिला भक्तिमार्ग निधडा । पादुका स्वामी भूलोकी ॥२०॥ प्रेमभक्तीं नयनांबुजळे । सहस्रावधि जन गुरुपद धूतिले । पुनरपि होणार नाही भले । ऐसे गुरू भूलोकी ॥२१॥ दर्शनाचा कल्लोळ । वृद्ध स्त्रिया बाळगोपाळ । येवोनिया पुष्पांजली । श्रीगुरू चरणी अर्पिती ॥२२॥ श्रीमद्राज शालिवाहन । शक १७८६ जाण । रक्ताक्षी संवत्सर प्रमाण । पौष शुक्ल त्रयोदशी ॥२३॥ वार होता गुरुवार । तैसाचि शुभ नक्षत्र । शुभयोग करणी सुचरित्र । साधिले हो लिंगैक्य ॥२४॥ सद्भक्तीं मंटप रचिले । इक्षु रंभा स्तंभ उभारिले । अम्रपल्लवी तोरणे बांधिले । उभारिले ध्वज पताका ॥२५॥ पंच फळे मंटपा बांधिले । पंत्र पल्लवे श्रृंगारिले । पंचवर्णी रांगोळ्या घातिले । श्रृंगारिले शुभ मंटप ॥२६॥ दोही बाजू समया लाउनी । झगझगित ज्योतीं प्रकाशले ते क्षणी । धूपारतीं दशांग घालुनी । सुगंध भरला चहुदिशी ॥२७॥ मनुमथारी गुरुप्रतीं । अमोलिक सोवळे परिधान करितीं । कनका भरण रुद्राक्ष लेववितीं । भस्म चर्चितीं सर्वांगीं ॥२८॥ समयाचार मूर्तीचे चरण । आचार्यांच्या मस्तकी ठेऊन । भक्त माहेश्वर मिळून । पुष्पांजली अर्पिती ॥२९॥ तव आचार्या लागुनी । मंटपामाजी बैसउनी । वस्त्रदाने करोनी । गणाराधना करिताती ॥३०॥ छत्रचामर चौरी । मोरचल शीगुरी अबदागिरी । सकळैश्वर्य परिकरी । शोभायमान करिताती ॥३१॥ भेरी जयघंटा समेळ । शंख गिडिबिडि करताळ । नौबती करडी बाजा कौंसाळ । काळी करणी नफेरिया ॥३२॥ टाळ मृदंग वीणेसहीत । भजनीक भजन करितात । वाद्यांचा निनाद घुमत । चतुर्दिशेमाजी पैं ॥३३॥ स्वामींचे

लिंगानसंधान । दशदिशा ना कळले जाण । वाद्य गजरे येतीं भक्त जन । साहित्य घेऊन दासोहाचा ॥१३४॥ काय भूमीच उलोनि जन । झुंडीच्या झुंडी येतीं तत्क्षण । जिकडे तिकडे वाद्य गर्जन । धाम धूम बंदुकींचा ॥३५॥ आबाल वृद्ध स्त्री पुरुष जाण । दर्शना येतीं अपेक्षून । फल कर्पूर दक्षिणा घेऊन । धावोनिया येतातीं ॥३६॥ उदयगिरींसी मुंग्यांचा रीघ । तैशापरी जन येती सवेग । नारिकेळ कर्पूर दशांग । सुगंध चहुकडे पसरला ॥३७॥ नारिकेळ कर्पूर दशांग धूप । दुकाने लाविले व्यवहारी अमूप । जन येता अमाप । कांहीं न मिळेत बाजारी ॥३८॥ स्वस्थळीचे परस्थळीचे । सद्भक्त धावोनि येती साच । दुर्लभ झाले हो गुरुवर्यांचे । दर्शन म्हणती सकळ जन ॥३९॥ येवोनि मंगळात्यां ओवाळितीं । श्रीगुरुसी दक्षिणा अर्पितीं । धूपाने दिशा समस्तीं । सुगंधित झाल्या की ॥४०॥ शतानुशत सुवासिनी जन । पंचारत्या येतीं घेउन । ओवाळुनी श्रीगुरू लागुन । मंगळ गीते गातातीं ॥४१॥ नारीकेळाचे पाणी । वाहे नदी सम ग्रामांतुनी । गंगेचा उगम श्री चरणांतुनी । वाहे वाटे तीर्थ रूपे ॥४२॥ धूप धूम्रचि मेघ मंडळ । मेघ गर्जनाचि वाद्ये सकळ । सहस्रावधी दीप केवळ । विजा थळ थळ चमकती ॥४३॥ प्रेमाश्रु बिंदूचा मेघ वर्षाव । आला अकस्मात वर्षा काळ स्वये । श्रीगुरूसी भेटण्यास्तव । चोज वाटे सुजनासी ॥४४॥ पूर्वीच निर्मिले समाधी । शुभ्र चूर्णे करिती शुद्धी । सोनकाव लावोनि सविधी । रंगवल्ली घालितीं ॥४५॥ तया समाधी वरुतीं । पंचस्तंभी मंटप घालितीं । पंच पल्लवे शोभवितीं । कपाटे रचितीं अंतर्गृहा ॥४६॥ गुरुलिंगा तये क्षणी । कर्पूर ज्योती ओवाळूनी । पुष्पांजली अर्पुनी । नमस्कार करितातीं ॥४७॥ तव एकचि झाला हाहा:कार । आमुचा दुर्दैव महा घोर । दीनांचे इष्टार्थ पुरविणार । आशिर्वाद देणार कोण हो ॥४८॥ श्री गुरुवर्या कृपाळा । दुर्जनी दुखविले तुम्हाला । त्यागोनिया मठ मान्याला । वनवासी बनलोकी ॥४९॥ देशावरीच काळ । क्रमिलोकी बहु वेळ । तनुमन धन सकळ । दासोहासी अर्पिलो ॥५०॥ जंगम पूजे वाचुनी । मुखी न घातलो अन्न पाणी । लिंगाचे मुख जंगमचि जाणोनी । तृप्तीं केलो चरवर्या ॥५१॥ बसवादि प्रमथांचे आचरण । आचरिलो नित्य नेमे अष्टावर्णे । जंगमचि प्राण समजोन । इष्टार्थ पूर्ण केलोतीं ॥५२॥ निंदेचा मानिला नाही रोष । जाळोनि टाकिलो काम क्रोधास । शत्रु आणि मित्रांस । समदृष्टीने पाहिलो ॥५३॥ द्रोणापुर त्यागिलो । आजि पर्यंत मुख न दाविलो । दुर्जनाचे ऋण ही फेडिलो । दश सहस्र गणतीने ॥५४॥ दरिद्र शिष्यास नाही त्यागिलो । आशिर्वाद बळे श्रीमंत बनविलो । संतान हीनांचा उजळिलो । वंश दीप तपोबळे ॥५५॥ पीठाधिकारी अधिपतीं । ऐसी त्यागोनी अहं कृती । स्वयं जंगमार्चन केलोतीं । भक्ति भंडारी बनोनी ॥५६॥ अनेक स्थळी बसव पुराण । वैभवे करविलो श्रवण पठण । भक्ति मार्ग शुद्ध करून । अष्टावरण स्थापिलो ॥५७॥ जंगमार्चनेचा विस्तार ।

गणना होय लक्ष शाण्णव सहस्र । दासोही तुम्ही रणधीर । झुंजलाती देवा सवे ॥१५८॥ सकळ जनोचा तुम्ही आदर । सकळी मानिले तुम्हा गुरुवर । सकळांचा उद्धार । तुमचिया कृपे जाहला ॥५९॥ अनाथांचे धर्म लग्न । धर्म संस्कार दीक्षा जाण । गोदान सुवर्ण दान वस्त्र दान । अन्नदानाची मितीं नसे ॥६०॥ दुर्गुणी देशमुखाचे । मुख न पाहिलो साच । मठासी येता झालो अनिर्वाच्य । न्याय निष्ठुर सत्य पैं ॥६१॥ श्रीगुरूंचे अनंत गुण । वर्णोनिया स्त्री पुरुष जन । अश्रुपूर वाहोन । भिजोनि गेले वस्त्रें पैं ॥६२॥ श्रीगुरु राया तुमच्या समान । न मिळे सद्गुरू आम्हा लागोन । पूर्व पुण्याच्या गाठीने । पाप्या दर्शन घडले हो ॥६३॥ आता न मिळे गुरु वदन । आता न मिळतीं श्रीचरण । आता न घडे दुजियाचेन । जंगमार्चन गुरुराया ॥६४॥ स्त्रीयां पुरुष वृद्ध बाळे । सकळी करितीं हळहळ । नेत्री अश्रु वाहतीं घळघळ । कोण कोणा तोषवी ॥६५॥ माता जरी निवर्तली । तरी बाळासी कवण सांभाळी । मेघ वर्षेना सकाळी । अंकुर कैसे वाढतीं ॥६६॥ सत्पुरुषाविणे धरित्री । पडतसे महा तापत्री । सद्गुरूविणे अरत्री । सद्गती कैसी होईल ॥६७॥ म्हणोनिया सकळ जन । दुःखाबळे आहळतीं जाण । हरहर महादेव म्हणोन । श्रीगुरु नामे गर्जती ॥६८॥ सहस्रावधि जन । शताधिक वाद्य घोषे करून । बहु पराके गर्जून । मिरवणूक काढितीं ॥६९॥ चौबारीच्या राजमार्गांतूनी । मिरवत येती मठा लागूनी । समार्ध स्थळी तये क्षणी । लिंगदेह उतरितीं ॥७०॥ त्रिकोणीच्या चंचीमाजी । विभूतीं बिल्वपत्र अधो भागी । लिंगदेहा चंचीमार्जी । उतरोनि बिल्व भस्म भरितातीं ॥७१॥ मुख बंधन करितीं । आळवितीं लिंग देहा प्रतीं । गातीं शिवगण सप्रीतीं । समाधीचे तेधवा ॥७२॥ डोलतसे झोकंबा । श्रीगिरिमाजी चौखंबा । मंटप ते भ्रमर गुंफा त्या माजी । डोलतसे झोकंबा ॥७३॥ सहस्र दळा वरुती त्रिदळे एक दळ निश्चिती । डोले पालख पश्चिम प्रांती दोरे बांधिति हंसाचे । श्रीगुरु पहुडले वर साच । डोलतसे झोकंबा ॥७४॥ पंच रत्न दीप । उजळले समया सुखरूप । घातिले नाही तैल वात । प्रकाशे स्वये स्वयं ज्योत ॥७५॥ दशविध वाद्यांचा गजर । चौघडे वाजति घनघोर । नादे भरला अंबर । बिंदू नाद एक स्वर ॥७६॥ ऐशा मंटपी गुरुवर्य जातीं चढुनी त्या सहा द्वार । प्रथम द्वारी पायऱ्या चार । चढुनी जावोनि आचार । लिंग दर्शनी होती स्थीर ॥७७॥ सहा पायऱ्या चढुनि सत्वर । पूजिति गुरुलिंगा । दहा पायऱ्या चढुनी मणिपुरा । जातीं शिवलिंगा दर्शन स्पर्शन करुनि ध्यान जप रमला शिवयोगी ॥७८॥ द्वादश पायऱ्या चढुनी जाती अनुहत मंटपा । जंगमलिंगा पूजुनिया मग जायी विशुद्धीसी षोडश पायऱ्या जाय चढुनिया । प्रसाद लिंगासी । षोडश पूजा अर्पण करुनी जायी महा लिंगा ॥७९॥ पुढच्या पायऱ्या चढतीं दोन त्रिकुट सिखर महा कठीण । दासोहाची दोरी धरोन गेले सहस्र दळा ॥८२॥ ज्योतिर्मय प्रकाश तेजागळे दीपमाळ स्वयं ज्योति झळझळ ।

रवि शशि तेजाहुनि आगळे । स्वयंभु महालिंग ॥१८३॥ स्थूल अर्पिले आचार लिंगा । सूक्ष्म अर्पिले की गुरुलिंगा । कारण अर्पी शिवलिंगा । त्रिदेह निरसोनीं ॥८४॥ महा कारण ते जंगमलिंगा । निर्मल तनु अर्पुनि भव भंगा । निर्विकार होउनी सवेग । गेला प्रसाद लिंगासी ॥८५॥ आनंद तनु अर्पुनि भावे । जप ध्यानादी करुनि स्वभावे । अर्पुनि पुष्पांजलि सद्भावे । महालिंगी समरसला ॥८६॥ ऐसे निरसुनि पांचहि देह । भावा भाव करोनि विलय । होउनिया मग निर्देह । कर्पूरवडी सम रूपी ॥८७॥ महालिंग ज्योति स्पर्शोनी । जोति रूप पावला तत्क्षणी । रूपनिरूप अरूप होउनी । समरसला हो महालिंगी ॥८८॥ सागरांतुनी आला मेघ । तुषार बिंदु अनंत सवेग । ओहळ नदी नद होउनी गाग । सेखी सागरी समावला ॥८९॥ महालिंगातुनी आला अंग । पंचलिंगी विचरोनि शुभांग । अंतीं प्रवेशला महालिंग । ज्योतिर्मय ज्योतींत ॥९०॥ शांभवयोगी समरस झाला । येणे जाणे सर्व खुंटला । बसवलिंगाचा पांग फिटला । श्रीगुरुच्या अभयाने ॥९१॥ तेधवा माहेश्वर जनी । श्रीगुरु लिंग देहा लागुनी । ऐक्यालयी प्रवेश करुनी । त्रिविध पुष्पांजली अर्पिती ॥९२॥ वरती समाधी रचवोनी । चरवर्यांसी मुहूर्त करुनी । बसवलिंग मरीदेव पादपूजा करोनी । पादोदक सेविती ॥९३॥ दुजे दिनी गंध विडा करिती । भक्त माहेश्वरा-दिका प्रतीं । करोनिया मिष्टान्ने तृप्ती । लिंगानंदी राहिले ॥९४॥ ऐसे हे हावगिलिंग लीलामृत । कन्नड भाषेंत होते सुप्त । ते मराठी भाषं प्रत । ओवी बद्ध करविले ॥९५॥ संस्थानीचे वृद्ध बसवलिंग स्वामी । देशिकेंद्र भक्त प्रेमी । येरगींत बंडप्पा जंगम प्रेमी । भेटी कारणी गेलोजी ॥९६॥ तेथेंचि होते स्वामी । दर्शना गेलो आलेत म्हणोनी । बंडप्पादि भक्ता समक्षमी । अज्ञा दिधले दासासी ॥९७॥ अनन्य शिवभक्तांचा दास । मज भाषांतराचा हव्यास । वचन साहित्य मराठी भक्तांस । दुर्बोध वाटोनि मनासी ॥९८॥ प्रथम बसवेश्वर वचन । सहस्र संख्या परिमित जाण । मराठी भाषांतर करोन । तींस वर्षे जाहली ॥९९॥ नाशिवंत संसार । माजी सुख दुःखे अपार । लाथाडोनिया दूर । केलो भाषांतर बहु ग्रंथ ॥२००॥ केव्हाही स्वामी भेटता । सुचवीत होतो तत्वता । की हावगिलिंग चरिता । प्रसिद्ध कांहो करीना ॥२०१॥ माझा तगादा मजवरी टाकिला । भाषांतर करावे मराठीला । काव्य रूप देवोनि तयाला । ओवीबद्ध करावे ॥२॥ जंगम सेवेचा संकल्प । तेचि माझे पूर्ण तप । हे कार्य नव्हे सोपे । धोत्रे पाउड धुण्याचा ॥३॥ धडधडू लागली छातीं । फार आलो काकुळतीं । मज काव्याची मतीं । विशेष नाही गुरुवर्या ॥४॥ माझा आशिर्वाद आहे । गुरु चरित्रा तुम्ही लिहावे । हयगय किमपि न करावे । यया कार्या माझारी ॥५॥ मग श्रींची आज्ञा शिरी वंदुनी । बोलिलो भाषांतरा कारणी । परी मज लागोनी । धैर्य चित्ती नाहीच ॥६॥ गेलो बिदरीच्या कन्नड साहित्य परिषदेस । तिथोनि गेलो उदगीरास । स्वामी दर्शनी भेटता दासास । आनंदलो मानसी ॥७॥ फल पुष्पांसहीत ।

श्रींच्या समाधी समक्ष । देती ग्रंथा प्रत । तव हावगिलिंगा साष्टांग दंडवत । नमस्कार करोनिया ॥२०८॥ समाधी समक्ष पांच ओवी लिहोनि घेतलो ते समई । प्रारंभ करोनि चरित्र पाही । भालपुरा पातलो ॥९॥ नाही मी महाराष्ट्राचा । नाही मी कर्नाटकाचा । नाही मी आंध्राचा । त्रिकूट संगम सीमेचा ॥१०॥ कवण्याही भाषेवरी । अधिकार नाही मज माझारी । थोट धैर्य पुढारी । शास्त्री नामे संबोधिती ॥११॥ परी हा श्रीगुरू सेवेचा भार । केवी उतरोन होऊ पार । कन्नडवार्धीकचे पद एक सहस्र । ओंव्या किती भरतील ॥१२॥ ऐसा हा ता जीवा सोस । स्वप्नी येतीं हावगिलिंग सर्वेश । मागती चपाती पायस । जेवू घाली म्हणोनि ॥१३॥ स्वामी लागी जेऊ घातिलो । दुबळयाची भक्ती अर्पिलो । वरदहस्त पावलो । हावगिलिंग श्रीगुरूंचा ॥१४॥ तव उदय झाले । मज आश्चर्यंचि वाटले । मग एका स्वामीसी वाढिले । चपाती पायस करोनी ॥१५॥ दक्षिणा देवोनी । नमस्कार केलो स्वामी लागुनी । संतोष वाटले ते क्षणी । साक्षात्कारी गुरुवर्य ॥१६॥ स्वप्नी जैसी घेतली सेवा । तैसेचि घेई गुरुदेवा । लेखणी घेवोनि तेधवा । आरंभिलो ग्रंथासी ॥१७॥ कन्नड पद्यांचा भावार्थ । घेवोनिया यथार्थ । बोबड्या मराठी बोलींत । श्रीगुरु चरित्र वर्णिलो ॥१८॥ एकादशाध्याय मूळ कन्नड । तयासीच करोनिया उघड । मराठी ओवी सवघड । जितके तितकेचि लिहियेलो ॥१९॥ आहेती एकादशाध्याय । जाणा एकादश रुद्राध्याय स्वये । एकादश प्रसादचि निश्चये । गुरु भक्तांसी प्राप्त झाले ॥२०॥ श्रीगुरुवर्या हावगिलिंगा । शरणांगत जन पाप विभंगा । तुझिया चरित्रामृता सुभगा । सेवीजोका सद्भक्त ॥२१॥ तयाचे सप्त जन्मीचे पाप । जळोनि होय तो निष्पाप । परिहरती त्रिताप । सत्य सत्य जाणिजे ॥२२॥ पिशाच्च ब्रम्हराक्षस अपस्मार । ग्रह बाधा साडेसाती दुर्धर । दारिद्र्य दुःख निपुत्र । होती परिहार चरित्र श्रवणे ॥२३॥ गृही गुरु चरित्र आरंभ करावे । नित्य जंगमार्चन चालवावे । भक्ति भावे श्रवण करावे । इष्टार्थ होय परिपूर्ण ॥२४॥ एक दोन तीन करावे सद्भावे अकरा आवर्तन । नित्य कीजे पादोदक प्रसाद सेवन । जंगमार्चन यथोचित्त ॥२५॥ काम्यार्थी व्रतस्थ असावे । मग इष्टार्थ पाविजेल स्वये । ये विषई संदेह । करू नये सद्भक्तीं ॥२६॥ श्रीगुरु हावगिलिंग लीलामृत । जे पूजिती गृही सतत । तयांचे क्षुद्रोपद्रव नाश पावत । निःसंशये जाणिजे ॥२७॥ जे सद्भक्त गुरु लीलामृत श्रवणी । सादर असतीं अनुदिनी । सेवा करी निर्वंचकपणी । मुक्ति कामिनीवरी तया ॥२८॥ मी तो मतिमंद मूढ केवळ । कवित्व शक्ती नाही प्रांजळ । परी मनाची तळमळ । कन्नड साहित्य महाराष्ट्रा अर्पावे ॥२९॥ कोणी ओगरिले पक्वान्न । कोणी ओगरिले परमान्न । कोणी दूध भाकर वाढून । तृप्त करी गुरुलिंग जंगमा ॥३०॥ मी तरी दीन दुबळा जाण । गृहा आले अतिथि जंगम । गृही नाही लवण । सरल केलो अंबील ॥३१॥ नावदगीचे गुरु सांगितले ।

कैसी असावी अंबिल। हुळ्ळग वेळ्ळग तेळ्ळग भले। तेचि स्मरले मज आता ॥३२॥ अंतर की शुभ्र पातळ। आदरे अर्पिलो ये वेळे। गुरुलिंग जंगम सद्भक्त दयाळ। अभय देवोनि सेविजे ॥३३॥ फणसफळावरी असती कांटे। अंतरी रसाळ गोमटे। सीताफळासी कवण विटे। बीजविशेष म्हणोनी ॥३४॥ केळी असे वाकुडे। गुऱ्हाळ कठिण रोकडे। नारीकेळावरी खापरडे। अंतरी माधुर्य आगळे ॥३५॥ तैसी माझी आर्ष वाणी। जातिवंत मराठीची नोहे खाणी। मज माजी त्रिवेणी। संगम झाला भाषेचा ॥३६॥ चिखल वाळू खडक। नदीचा रूप ऐसा देख। परी संगमी नाहणे पुण्य दायक। जातो कवण ओलांडुनी ॥३७॥ कवणी म्हणे काळे भोर। देवीचे वणे श्रृंगारिले शरीर। तीन ठिगळाचा चीर। अंगावरी दिसे की ॥३८॥ परी स्नान करोनि विशुद्ध। कुंकुम तिलक विभूती शुद्ध। गोड बोले प्रसिद्ध। अप्पा दादा सकळांसी ॥३९॥ दुजा म्हणेरे महा पतिव्रता। कवण करील तिसी साम्यता। जगी सद्गुणा परता। भूषण आता कोणते ॥४०॥ माय बाप श्रोते सज्जन। गुणग्राही राजहंस जाण। मी तरी केवळ अज्ञान। बाळक जाण आपुला ॥४१॥ गुरु आज्ञे रचिलो ग्रंथ। रूप रंग नाही यया प्रत। कथांमृते होइजे तृप्त। हंस क्षीर न्यायाने ॥४२॥ काक शोधी क्षत। सूकर अमेध्यी रमत। कोंबडू उकरित। उकिरड्यासी ॥४३॥ परळ न जाणे पक्वान्नाची रुची। माकड न जाणे तूळमंचक सुखा प्रती। काक जाता नंदनवना प्रांतीं। कोकिळा कवी होताती ॥४४॥ नदीच्या काठी बक बैसे। नोहे बापा कळ हंस। गारा नव्हती परीस। काचः काचो मणिर्मणिः ॥४५॥ जे का गुरुलिंग जंगमी निष्ठावंत। त्रिविध रूपें एक भावित। प्रसाद पादोदका जीव देत। तो हा गुरु भक्त जाणिजे ॥४६॥ तयांच्या पादुका मस्तकी वंदोनी। नाचेन मी सभांगणी। तयांच्या पद धूळींत लोळोनी। पावन करीन देहाते ॥४७॥ गंगांबा सती माता। रामलिंगस्वामी पंडित पिता। जन्म दिले बसवलिंगा तत्वता। गुरुलिंग जंगम सेवेसी ॥४८॥ शके अठरासे एकेचाळीसी। भूलोक दुरावला त्यांसी। बाळपणी शिक्षण देवोनि मजसी। बीजारोपण केलेतीं ॥४९॥ परनारी पर द्रव्य। माते समान मानावे। सदा करीत असावे। गुरु सेवा विद्यार्जन ॥५०॥ पुढती गुरुपादप्पा शेटकार। पितयांचे शिष्य चतुर। गुरु होवोनि मज साचार। सन्मार्गाते लाविले ॥५१॥ नावदगीचे गुरुवर। रेवयप्पा धर्मवीर। उद्धरिले पामरा सत्वर। षटस्थल मार्ग बोधोनी ॥५२॥ जन्म भूमी भालगुर। उदया आले बसवेश्वर। विद्यावंत पूर्वाचार। ग्रामामाजी वसती पैं ॥५३॥ वडील भगिनी काशम्मा। धाकुटी असे राचम्मा। पुत्र हावगिलिंग कन्या नागम्मा। कळत्र गोपिका जाणावे ॥५४॥ ऐसे धाकुटे परिवार। असे गुरु जंगमांचा धाकुटा पुत्र। मज खाऊ देतीं विशेष मात्र। शेष प्रसाद आपुला ॥५५॥ श्री बंडय्यास्वामी लग्न केले। भगिनी काशम्मा जउ घातिल। नावदगीस्वामी अनुभवामृत पाजिले। प्रसिद्ध केले पादुका

स्वामी ॥२५६॥ ऐसे असे दुबळ्याचे चरित । जया गृही पूजिजेल हावगिलिंग लीलामृत । संतती संपत्ती सौभाग्य सहित । सुखे नांदोत चिरकाळ ॥५७॥ एकादश अध्याय नेमे । श्रवण करील स्वयें । ती रुद्योनुक्तीसी पावे । सत्य सत्य त्रिवाचा ॥५८॥ धनार्थी पावेल धन । पुत्रार्थी पावे पुत्ररत्न । अविवाहिताचे होयील लग्न । नित्य पठणे सर्व सुख ॥५९॥ पादुका स्वामींचे नामे जाण । निर्वंचकपणे करी जंगमार्चन । दारिद्र्य दुःख संपूर्ण । विलया जातीं तत्काळ ॥६०॥ दुभत्या गायीने गोठा भरो । धन धान्याने कोठा भरो । संतती संपत्तीने गृह भरो । सद्भक्तांसी सर्व काळ ॥६१॥ शालिवाहन शक अष्टादश शत । वरुते जाण त्रिंश । प्रवृत्त नाम संवत्सर विशेष । दक्षिणायन कार्तीक प्रतिपदा ॥६२॥ भौमवासर अनुराधा नक्षत्र । शोभन योग-बव करण प्रथम प्रहर । सोमधर कृपे पादुका स्वामी चरित्र । कन्नड भाषेत लिहियेले ॥६३॥ अलदी माजी हिरे मठ । सरगणाचारी सुभट । पीठाधिकारी कर्नाटक पंडित । महंत चरवर्य कथियेले ॥६४॥ तेचि कर्नाटक दुर्घट पद । उकलोनि सरळ विशुद्ध । बोलिला मराठी ओवीबद्ध । बसवलिंग गुरु कृपे ॥६५॥ मज होती रात्रंदिन चिंता । केवी लिहोनि संपवीन गुरु चरिता । दयाळु सद्गुरु महा दाता । आपणचि लिहविला मज हस्ते ॥६६॥ आजि उतरिलो भार । शरीर झाले हळुवार । पुनः पुनः करोनि नमस्कार । गुरुपद कमळी विश्रमतो ॥६७॥ गुरुलिंग जंगमाची सेवा घडो । शरणांच्या सेवेंत शरीर झडो । अंतीं शरीर पडो । पदधूळींत शरणांच्या ॥६८॥ शके अठराशे बेचेंशी । शार्वरी नाम संवत्सरासी । अश्वीन वद्य षष्टी सोमवार दिवसी । अपराण्ह मृगर्क्ष वरियान्योग ॥६९॥ इयं दिनी ग्रंथराज । पूर्ण झाला महाराज । ऋण मुक्त झालो आज । बसवलिंग देशिकांच्या कृपेने ॥७०॥ इतिश्री गुरु हावगिलिंग लीलामृत । श्रवण मुखें प्राशन करावे सद्भक्त । होताल जन्म मरणा विरहित । बसवलिंग बोलत भालपुरीचा ॥२७१॥ इतिश्री गुरु हावगिलिंग लीलामृते । पादुका स्वामी लिंगैक्यं नाम एकादशोध्याय समाप्तः

मंगळ महा श्रीगुरु बसवलिंगार्पण मस्तु श्रीगुरु हावगिलिंगार्पण मस्तु । शुभं भवतु । मंगळ मस्तु ।

—○ एकादशोध्याय समाप्तः ○—

